॥ श्री ॥

# मराठी गद्याचा इंग्रजी अवतार

अथवा

## इंग्रजी अमलांतील मराठी गद्य वाङ्मयाचा निबंधमालेपूर्वींचा इतिहास

( इ. स. १८१०—१८७४ )



लेखकः—

प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए.

अध्यापक ( मराठी व इतिहास )

न्यू पूना कॉलेज, पुणें.



आपुलें स्नेह तेंचि वागीश्वरी। जेया मुकेयातें अंगिकरी ॥
तो वाचस्पतिसीं करी। प्रबंधहोडा ॥ राजवाडी ज्ञानेश्वरी १०-८

प्रकाशकः—ए. पी. बापट, अँड ब्रदर्स—बुकसेलर्स अँड पब्लिशर्स, पुणें.

मुद्रकः—द. ग. खांडेकर, लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणें.

आवृत्ति पहिली.



१९२२ ] कि. रु. २ [ १८४४

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना



प्रोफेसर **द. वा. पोतदार**, बी. ए., यांनीं इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून मराठी गद्याचा प्रसार झाला, त्याचा इतिहास लिहिला आहे. त्यास यांनीं 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' असें विचित्र नांव दिलें आहे. पण नांव कांहीं का असेना, त्याशीं कर्तव्य काय? त्यांत ऐतिहासिक मजकूर दिला आहे तो आपण पाहूं. इंग्रजी अमलापूर्वी स्वराज्यांत शके १७३९ पर्यंत जें थोडेंबहुत गद्य होतें, त्याचाही त्यांनीं समाचार घेतला आहे पुढील इ स. १८१०, विशेषतः १८१८ नंतर १८३६ पर्यंत आणि १८३६ ते १८५७ व १८५७ ते १८७८ पर्यंत असे तीन कालभाग करून त्यांत **एल्फिन्स्टन मालकम** इत्यादिक इंग्रजी ऑफिसरांच्या उत्तेजनानें आणि साहाय्यानें मराठी गद्याचें पाऊल कसकसें पुढें पडत चाललें हें सविस्तर **कथन** केलें आहे. जातां जातां ग्रंथांस व ग्रंथकारांस शाबासकी व क्वचित् तडाखेही दिले आहेत.

ह्या साठ—पासष्ट वर्षांच्या मराठी वाङ्मयरत्नाकरामध्यें अवगाहन करून त्यांतून दत्तोपंतांनीं हल्लींच्या पिढीस अदृष्टपूर्व आणि अश्रुतपूर्व अशीं ग्रंथरूपी आणि ग्रंथकाररूपी नानाप्रकारचीं रत्नें काढून तीं सामान्य वाचकांस व विशेषतः विद्यार्थिवर्गास अर्पण केलीं आहेत. त्यांचा स्वीकार आणि उपभोग महाराष्ट्रमंडळीनें घ्यावा. अदृष्टपूर्व आणि अश्रुतपूर्व असें म्हणण्याचें कारण हें कीं, मराठी भाषेचा अद्भुत कोश वे. शा. **बाळशास्त्री** घगवे, **गंगाधरशास्त्री फडके**, '**दाजी** शास्त्री शुक्ल' इत्यादिक पंडितांनीं बहुश्रमानें तयार केला, त्याचा मागमूस हल्लीं फार थोड्या लोकांस आहे. ह्या बृहत्कोशावरून पुढें **मोल्स्वर्थ, कँडी** यांचे कोश बनले. ज्यांनीं मुंबईस समुद्रतीरीं उभें राहून मिशनरी लोकांच्या कोटीस कोटी करून हिंदूधर्माची महती स्थापित केली, त्या **विष्णुबोवा** ब्रह्मचारी यांचा 'वेदोक्त धर्मप्रकाश' कोणास अवगत आहे? **गंगाधरशास्त्री फडके** यांचें 'मराठी व्याकरण' आणि महा पंडित **बाळशास्त्री जांभेकर** यांचे शून्यलब्धी, लागरतम इत्यादि गणितग्रंथ आणि ब्रिटिश हिंदुस्थानचा इतिहास हीं अलीकडे कोणीं पाहिलीं आहेत? हरी केशवजीचें **यात्रिकक्रमण**, दादोबांची **यशोदापांडुरंगी** टीका व बाबा पदमनजी यांचा **अरुणोदय**, मिशनरींच्या ख्रिस्तीधर्मप्रसारास विरोध म्हणून **गंगाधरशास्त्री फडके** यांनीं लिहिलेलें **हिंदुधर्मतत्त्व, गोविंद**

**नारायण माडगांवकर** यांचा **शुचिर्भूतपणा** हीं पुस्तकें आतां क्वचित्च पाहण्यास मिळतात. पुढें छापखान्याची सुरुवात इकडे झाल्याबरोबर '**प्रभाकर**' '**दर्पण**' इत्यादि महाजन यांचीं वर्तमानपत्रें व **दिग्दर्शन, ज्ञानप्रसारक** वगैरे मासिकें इत्यादिक दिव्यरत्नें वाङ्मयरत्नाकरामध्यें विखुरलेलीं दत्तोपंत यांनीं श्रमपूर्वक जमा करून या ग्रंथांत संगृहीत केलीं आहेत. शेवटील कालभागांत **परशुरामतात्या गोडबोले** यांचें नांव प्रमुखत्वानें येतें. त्यांनीं संपादित केलेले **नवनीत** आणि **सर्वसंग्रह** हीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. **कृष्णशास्त्री राजवाडे** यानीं **उत्सव-प्रकाश** रचिला तो चांगला वठला आहे. बहुश्रुत **लोकहितवादी** ( **गोपाळ-राव हरी देशमुख** ) यांचीं पत्रें ह्या काळांत प्रसिद्ध होत असत; त्यांचाही सत्कार येथें केलेला आहे. उदास यांचें **महाबळेश्वरवर्णन** ( स्थळ आणि इतिहास या दोहोंचें वर्णन ) हा ग्रंथ उत्तम उतरला आहे. अशा प्रकारचीं ग्रंथरत्नें आणि ग्रंथ-कार यांचा उल्लेख सन १८७४ पर्यंत केला आहे. त्यांतून कांहीं ग्रंथरत्नें साफसूफ करून उजळा देऊन पुनः छापण्याच्या योग्य आहेत यांत संशय नाहीं.

या शिवाय या कालांतील वाङ्मयाचा जास्त खुलासा दत्तोपंत आपल्या उपोद्घातांत किंवा समारोपांत करतीलच. याकरितां हे प्रस्तावनारूपी दोन शब्द लिहिले ते आटोपते घेतों.

ग्रंथकारानें उत्तम उत्तम ग्रंथांतील कांहीं उतारे शेवटीं दिले आहेत, त्यांवरून त्या त्या काळीं मराठी भाषेंत ग्रंथ कोणते झाले, त्यांची रचना कशी होती, त्यांत विषय कोणते होते व मराठी भाषेचें रूप हळू हळू कसकसें सुधारत चाललें तें वाचकांच्या ध्यानांत येईल. या ग्रंथांत ग्रंथ आणि ग्रंथकार यांविषयीं माहिती दिली आहे ती अधिक विस्तृत असती आणि हे उतारे निराळे न देतां जेथच्या तेथें दिले असते तर बरें झालें असतें. परंतु अवकाश थोडा, त्यामुळें तसें करणें सध्यां तरी अशक्य होतें. तेव्हां झालें आहे तेंच पुष्कळ झालें असें तूर्त समाधान मानिलें पाहिजे. ह्या ग्रंथाची पुनरावृत्ति निघेल---आणि ती लौकरच निघेल असें वाटतें---तेव्हां ह्या सूचनांचा विचार ग्रंथकार करतील अशी आशा आहे.

हा सर्व ग्रंथ दत्तोपंतांनीं साऱ्या २०-२२ दिवसांत रात्रंदिवस खपून लिहून व छापूनही काढिला ह्या त्यांच्या मेहनतीचें व क्षिप्रकारित्वाचें महाराष्ट्रजन कौतुक करोत आणि अशा अपूर्व ग्रंथाला---पहिल्याच ग्रंथाला म्हटलें तरी चालेल--विपुल आश्रय देऊन ग्रंथकाराच्या श्रमांचें व झटपटगिरीचें चीज करोत, अशी देवापाशीं प्रार्थना करून ही छोटी प्रस्तावना संपवितों.

**काशिनाथ नारायण साने.**

# उपोद्धात



' मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ' हें नांव जरा विचित्र वाटण्यासारखें आहे खरें; पण तें मुद्दामच या ग्रंथाला ठेवलें आहे. इंग्रजांचा अंमल महाराष्ट्रावर एकोणिसाव्या ख्रिस्ती शतकाच्या सुरवातीपासून बसला म्हणावयास हरकत नाहीं. या अमलाचे जे बरेवाईट अनेक परिणाम महाराष्ट्र देशावर व पर्यायानें भाषा धर्म इत्यादिकांवर झाले ते मोठे मननीय आहेत.

पुष्कळ विद्वानांचीही अशी समजूत आढळून येते कीं, मराठी गद्यवाङ्मय ज्याला म्हणतात त्याचा जन्म खरोखर या इंग्रजी अमलाचे सुरवातीसच झाला. किंबहुना त्या अमलांतील ही पहिली महनीय देणगी होय. 'यापूर्वी गद्य वाङ्मय इकडे नव्हतें.' ही समजूत आजची आहे असें नव्हे. आजच्यापेक्षांही तत्कालीन महाराष्ट्रांत ही कल्पना सिद्धांतवत् होती. पूर्वी मराठशाहींत कांहीं गद्यवाङ्मय असेल ही कल्पनाही कोणास या वेळीं फारशी नव्हती. डॉक्टर वुइलसन् यानें बखरींचें अस्तित्व लक्षांत घेतलें होतें त्यावेळीं त्यावर शेरा मारिला कीं, "The Bakhars or chronicles of kings contain strange mixtures of fact and fiction. Something may be got from them of a useful character *though they meet with little attention.*" (Molesworth Dictionary दुसरी आवृत्ति page XXIX) यावरून या वाङ्मयसंपत्तीकडे दुर्लक्ष होत आहे, हें या विचक्षण पंडिताच्या लक्षांत आलें होतें खरें. परंतु ग्रँटडफनें या जुन्या बखरी सर्व पिळून घेतल्या अशी भ्रामक समजूत करून घेऊन म्हणा किंवा New light नवा दैवीप्रकाश महाराष्ट्रावर पाडण्याच्या धांदलींत हे असले grotesque and impure gods and heroes त्याला कुचकामाचे वाटले म्हणून म्हणा, वुइलसनानें किंवा दुसऱ्या कोणी विद्वानानें प्राचीन मराठी गद्याकडे कांहीं लक्ष दिलें नाहीं. अगदीं प्राचीन पंचतंत्रादि गद्य मराठी ग्रंथ सोडून द्या; पण वुइल्सनप्रभृतींचें ख्रिस्ती आंदोलन सुरू असतां मल्हार रामराव आपल्या बखरी सजवीत होता. त्याचाही कोणी नव्या विद्वानानें किंवा ग्रंथप्रसूनें परामर्ष घेतला नाहीं ! हें आंधळें गारूड नव्हे ? असें भ्रांतिपटल कां बरें माजलें ? याचें उत्तर गूढ नाहीं. हा राजकीय आंदोलनांतील हिसक्याचा दुष्परिणाम.

विचार करण्यासारखी गोष्ट आहे कीं, अलिष्टनप्रभृतींनीं नवें गद्य जन्माला घालण्याची सिद्धता चालविली; पण घरचा वारसदार होता त्याचा पक्का पुसतपास केला नाहीं. तो पोरका झाला होता ! त्याचें छत्र विच्छिन्न झालें होतें. हा देखावा पाहिला म्हणजे तत्कालीन राजकीय वैषम्याचा खासा चित्रपट तत्कालीन वाङ्मयावरून चितारतां येतो हा वाङ्मयाध्ययनापासून मिळणारा एक मोठाच लाभ समजावयास चिंता नाहीं.

हेच विचार दृढ करणारें आणखी एक प्रमाण सांगतों. सर्व मराठी राज्य जरी खि. एकोणिसाव्या शतकाचे पूर्वार्धाचे आरंभींच संपुष्टांत आलें होतें तरी साताराच्या गादींत १८४८ पावेतों थोडी धुगधुगी राहिलेली होती. मेलेला बेडूक किंवा साप जसा पुढें कित्येक तास वळवळत राहतो त्यांतला हा चिवट मराठ्यांचा प्रकार होता. साताराच्या गादीवर या वेळीं श्री. प्रतापसिंह महाराज हे होते. ते मोठे महत्वाकांक्षी होते. एखाद्या तरण्या कलेक्टराप्रमाणें टेबलाशीं बसून ते ऐटीनें कारभार करीत म्हणून एल्फिस्टननें त्यांची तारीफ वर्णिली आहे. या प्रतापसिंह छत्रपतीचे सावलींत कांहीं मराठी लेखक प्रसन्नपणें लिखाण करीत होते. अशा लेखकांपैकीं माधवराव मुनशी म्हणून एक होता. त्यानें सन १८१८ ते १८३९ या मुदतींत केव्हां तरी **सभारंजनी** नामक एक ग्रंथ लिहिला तो ' भारतवर्ष ' मासिकांतून छापून प्रसिद्ध झाला आहे. आपल्या प्रस्तावनेंत माधवराव मुनशी लिहितोः—“ श्रीमत् जगदीश्वराप्रति नमन करून ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ करितों कीं, पूर्वी हा ग्रंथ साहेब आलिषान मिस्तर हरनगटन साहेब बहादूर यांणीं शेरअली मुनषी याजकडून उडदू भाषेंत करवून याचें नांव आरायेष महफील असें ठेवून सन १८०४ या सालांत छापखान्यांत देऊन छापविला. परंतु जे लोक पारसी विद्येंत प्रवीण नाहींत त्यांचे समजुतींत येत नाहीं. याजकरितां प्रवृत्तीचे मराठी भाषेंत तरजुमा केला असतां इकडील सर्व लोकांचे समजुतींत चांगला येईल म्हणोन श्रीमन्महाराज क्षत्रियकुलावतंस राजश्री छत्रपती स्वामी यांणीं आज्ञा केल्यावरून माधवराव मुनषी याणें त्यांतील सार अर्थ काढून या पोथीची योजना करून इचें नांव सभारंजनी ( आरायेष महफील याचें हें उत्तम भाषांतर आहे. ) असें ठेविलें. ऐसियास हा ग्रंथ साद्यंत जो कोणी मनन करील त्यास सर्व हिंदुस्थानचें वर्तमान येथपर्यंत समजेल कीं, कोणी सामान्य लोक त्याजपुढें येविषयींची कल्पना बोलूं शकणार नाहीं. प्रार्थना हेंच आहे कीं, कोठें अशुद्ध असल्यास कृपा

करून शुद्ध करावें " या सभारंजनीची छापील १०६ पानें झालीं आहेत. या ग्रंथांत पुष्कळ मौजा आहेत. ( परिशिष्ट पहा. ) अद्भुत व इतिहास यांचें या सभारंजनींत पुष्कळ संमिश्रण झालें आहे तरी हा ग्रंथ वाचनीय आहे. **सभानीति** म्हणून एक दुसरा राजनीतिविषय छोटा ग्रंथ श्री. प्रतापसिंह यांनींच करविला होता. ( शके १७४९—इ. स. १८२७ ) तोही उपयोगाचा आहे. आयव्यय प्रकरणीं असाच एक ग्रंथ त्यांनीं करविलेला रा. शिकंदरलाल आतार यांनीं भा. इ. संशोधक मंडळांत ठेवला आहे.

यावरून निरनिराळ्या खात्यांत जरूरीप्रमाणें ग्रंथ छत्रपती यांनीं करविले होते असें दिसतें. एकतर तसे ग्रंथ करविणें त्यांचें कर्तव्यच होतें व दुसरें त्यांची परंपराही तशीच होती. श्री. थोरले छत्रपतीमहाराज यांनीं राजव्यवहारकोशादि ग्रंथ करवून सुंदर पायंडा पाडला होताच. तोच कित्ता प्रतापसिंहांनीं गिरविला. प्रतापसिंहांच्या कृपाछत्राखालीं वाङ्मयवर्धनाचा चाललेला हा प्रयत्न व याच वेळीं मुंबईकर गव्हर्नर यांचे प्रोत्साहनानें चाललेला दुसरा प्रयत्न यांची **तुलना** अनेक दृष्टींनीं बोधप्रद होईलः—

( १ ) सातारच्या प्रयत्नांत स्वराज्याची परंपरा अखंडित होती. त्यामुळें जुन्या बखरींतील राजकारणी भाषेचें कमावलेलें स्वरूप जीर्णरूपानें कां होईना सभारंजनी, सभानीति इत्यादि ग्रंथांत प्रतिबिंबित झालेलें आढळतें. श्रीशिवाजी महाराजांची बखर लिहिणारा मल्हाररामराव व श्रीसमर्थांच्या गादीवर बसून त्यांचें चरित्र वर्णणारे हनुमंतस्वामी यांचे स्वतंत्र प्रयत्नांत तोच परंपरेचा स्वरूपसंबंध अधिक तजेलदार दिसतो.

( २ ) उलट इंग्रजी सरकारी प्रयत्नाचें स्वरूप पाहतां मराठींत गद्य नवीन जन्माला घालण्याच्या सायासाखालीं मंडळी चेंगून गेलेली दिसतात. मराठींत व्याकरण नाहीं, कोश नाहीं, वाङ्मय नाहीं असा साराच नन्नाचा पाढा त्यांनीं वाचला ! मग या संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारी ! पण हा संन्यास आपण याला घेण्यास लावण्यापूर्वी हा राजलक्ष्मीचा प्यारा दोस्त होता याचें भान या नवीन ' मर्मइकरांस ' बिलकूल राहिलें नाहीं. चटकन् धुळपाटी घेऊन शाळेंत जाणाऱ्या मुलाप्रमाणें स्वतःस पोरें समजून विलायती ' मिशनेरी व क्यापटन ' यांच्यापुढें आमच्या शास्त्री पंडितांनीहि संथा ( ! ) घेण्यास प्रारंभ केला ! हळूहळू नूतन

गुरुजनांची शाबासकी मिळवून ‘ बाळमित्र ’ पंचोपाख्यान इत्यादि महान् ग्रंथ ‘ महाप्रयासानें ‘ लोकहितार्थ ’ निर्माण केले ! तेव्हां गुरूंना आपली व शिष्यांची धन्यता केवढी वाटली असेल ! ! क्यांडीजार्विसप्रभृतींचें प्रामाण्य पंतपंडितांपेक्षां अलबत्ता जास्तच मानलें पाहिजे !

मुंबई-पुण्यास मराठी गद्याचा जन्म झाला. हा त्याचा पुनर्जन्म नसून नूतन जन्म होता व तो* इंग्रजी स्फूर्तीपासून झाला म्हणून त्याला आम्हीं **इंग्रजी अवतार** असें नांव ठेविलें आहे.या नांवांत त्याचा इतिहास आहे व तें साभिप्राय आहे अशी वाचकांची खात्री होईल. आतां या नांवांत कोणास विचित्रपणा न दिसतां सरळपणाच त्यास दिसेल असा आम्हांस भरंवसा आहे. या अवताराची जन्मभूमि मुंबई. ही मुंबई इंग्रजांनीं वसविलेली व वाढविलेली व तेथें इंग्रजी वळणांत वाढलेल्या नवशिक्षितांकरवीं त्यांनीं मराठी वाङ्मयाची प्राणप्रतिष्ठा बायबलांतील मंत्रांनीं केली ! याही मंगलकार्याला खालून पुण्याकडून व जवळून अष्टागरांतून ‘ भिक्षुकगण ’ लोटला खरा पण तो केवळ ‘ दक्षिणार्थ ’ म्हणून या इंग्रजी अवतारांत पन्नास पाऊणशें वर्षे कांहीं म्हणण्यासारखें आत्मीय तेज प्रगटलें नाहीं.

बापू छत्र्यापासून ते बाबा पदमनजीपर्यंत अथवा १८१०-२० पासून तों १८७०-७५ पावेतों जें मराठी वाङ्मय निर्माण झालें त्याची दूर नजरेनें व खोल बुद्धीनें परीक्षा केल्यास त्यांत राष्ट्राला चेतविण्याचें सामर्थ्य कां उत्पन्न झालें नाहीं याचें मुख्य कारण हा या अवताराचा इंग्रजीपणाच होय असें निभ्रांत ठरतें: पण १८७४ त विष्णुशास्त्रयांनीं जेव्हां आपलें शिंग फुंकलें तेव्हां मात्र महाराष्ट्रानें ओळखीचा आवाज पाहून तिकडे कान टवकारून कां पाहिलें याचें गूढ हा ऐतिहासिक चष्मा लाविला म्हणजे रहात नाहीं.

---

*माझ्या अभिप्रायाच्या पुष्ट्यर्थ डॉक्टर वुइलसन ह्यांची साक्ष देतों. ती येणें प्रमाणें:--

“If ( New era in Marathi literature-the era of reformed authorship commenced in 1818 ) numbers among its producers not only the natives of the Maratha country but its devoted friends from distant lands, with whom in fact it originated.”

Molesworth Dictionary Marathi into English p. XXIX.

प्रस्तुत ग्रंथांत सुमारें ७५ वर्षांतील मराठी गद्याचा इतिहास सांगोपांग आम्हीं दिला आहे. रसिकपणानें व सहृदयतेनें आम्ही त्या वाङमयाचें यथाशक्ति, यथामती व यथावकाश परीक्षणहि केलें आहे. परंतु सामग्र्यानें जेव्हां या काळांतील मराठी ग्रंथ व ग्रंथकार आमच्या पुढें उभे राहतात तेव्हां आम्हांस प्रांजळपणानें असें कबूल करणें भाग पडतें कीं, **या पाऊणशें वर्षांत** एकहि अ-**लौलिक किंवा अजरामर ग्रंथ मराठींत झाला नाहीं** लहानसहान सटरफटर ग्रंथ भाराभर झाले. 'तारागण' पुष्कळ उगवला पण तमोनाशक चंद्र मात्र कोठेंच आढळला नाहीं !

वास्तविक वाङ्मय—खरें वाङ्मय—म्हणजे काय? कै. हरिभाऊ आपटे यांनीं आपल्या "'मराठी वाङ्मयाचा अभ्यास' या छोट्या निबंधांत 'वागेव सम्राडिति होवाच ।' ही औपनिषदीय व्याख्या प्रमाण केली आहे! (सदर पृ. ८) या व्याख्येला अभिप्रेत जी वस्तु ती वाङमय अथवा रा. राजवाडे यांच्या परिभाषेनें बोलावयाचें असल्यास सारस्वत. कारण ते म्हणतात "भाषेंत जें जें म्हणून बोललें जातें किंवा लिहिलें जातें तें तें सर्व वाङमय होय. वाङमयांत सारस्वताचा समावेश होतो. बरीवाईट ही छान वाङमयांत नसते ती निवड सारस्वत करतें. उदारललित, अभिजात व नागर गद्यपद्यबंध जो निर्माण होतो त्याला सारस्वत अशी अनन्यसामान्य संज्ञा आहे.........छंद अलंकार-व्याकरण, कोश वगैरे ग्रंथांना साहित्य असें नामाभिमान आहे.........साहित्य सारस्वताची पद्धति होय." (ज्ञानेश्वरी–प्रस्तावना पृ. १३।१४) उच्च वाङमयाची अथवा सारस्वताची जी परम थोर कोटी तिची कसोटी लाविली तर आपण प्रस्तुत ज्या वाङनिर्मितीची परीक्षा करीत आहों ती विष्णुशास्त्रिपूर्वकालीन मराठी गद्य वाक्संपत्ति अथवा तो वाक्संचय काय किंमतीचा ठरेल व कोणत्या पंक्तींत बसेल? सोप्या शब्दांत सारस्वताची व्याख्या आम्ही अशी करूं. **थोर अंथःकरणाच्या खोल खळबळीचें गोड आविष्करण म्हणजे सारस्वत!** असा उदात्त आविष्कार या आपल्या प्रस्तुत पाऊणशें वर्षांत कोणचा झाला? असा वागीश्वर कोण निपजला? मान खालीं घालून स्वस्थ बसणें हेंच याचें उत्तर.

कल्पना करा कीं, झाला प्रकार असा न होता आणि क्षुद्र स्कूलबुकांचा भिकार भाषांतरें निर्जविण्याचा साभिमान हव्यास न धरिता ज्ञानेश्वर मुक्तेश्वर-प्रभृति थोर वागीश्वरांचा 'मागोवा' घेत आणि कृष्णाजी सभासद किंवा कृष्णाजी शामराव यांसारख्या खंद्या बखरनवीसांना 'वाट पुसत' जर आमची मंडळी निघाली असती तर विशाल व अभंग अशा प्राचीन अधिष्ठानावर आरूढ होऊन ते न जाणो ततोऽप्यधिक यशाचे वांटेकरी झाले असते! इंग्रजी सारस्वताच्या जळत्या ज्योतींचीं चिराखदानं आपल्याच मंदिरांत लावून त्यांनीं जुन्या समयांचा व शामदानांचा प्रकाश घटकाभर दिपवून टाकिला असता तरी त्यांत आसनोच्चाटनाची बेअब्रू नसल्यानें शोभेला भरच पडली असती; व आंगीं बळ हि नवीन आलें असतें!

शाळा पुस्तकांचीं भाषांतरें करण्यांत आमची मंडळी गुंग झाली होती, त्यापूर्वी इंग्लंडांत गिबन, जॉन्सन, ॲडिसन, शेक्स्पिअर असे धुरंधर वाक्प्रभु होऊन गेले होते. परंतु त्यांच्या नखांचीहि सर पाऊणशें वर्षांत आम्हांतून कोणीं संपादन केली असें सांगतां येणार नाहीं. मुळीं वाक्यें नवीन लिहावाचावयाला शिकावयापासून आपणाला प्रारंभ केला पाहिजे. असा च भ्रम आमच्या बहुतेक मंडळींना होता. जुनें आधी फारसें नव्हतें आणि भिरकावून दिल्याशिवाय आमची उन्नति व्हावयाची नाहीं अशी बुइलसनकाका प्रभृतींची शिकवण होती. मग १०।२० पानें इतिहास भाषांतर करून लिहिला अथवा एखादें शास्त्रीय पुस्तकाचें सार काढून लिहिलें कीं झाली कृतकृत्यता! बापू छत्रे व बाळशास्त्री अशीं आंगिक करामतीचीं माणसें कांहीं आपणांत झालीं, पण परिस्थितीच्या भोंवऱ्यांत त्यांच्याहि हातून कांहीं विशेष झालें नाहीं. बापूंचें बालमित्र इतकया सर्वांतहि नांवाजण्यासारखें आहे आणि बाळशास्त्री अकालीं न वारते तर आशेला त्यांनीं मोठी जागा करून दिली होती. त्यावेळचें कशाला? अजून तरी इंग्रजी झाल्यास एक पक्कें शतक लोटलें तरी ग्रोट, गिबन्, ॲडिसन् यांचीं भाषांतरेंसुद्धां नाहींत! मग त्या त्या विषयांवर स्वतंत्र रचना कोठली असेल? मागें 'भाषांतर' मासिकांतून असा प्रयत्न रा. वि. का. राजवाडे यांनीं सुरू केला होता. परंतु तो थोडक्या-वरच थबकला. पण जेथें विद्यापीठें कर्तव्यभ्रष्ट, विद्वान् मंडळी भ्रांत व आळशी, तेथें निराळें काय होईल? होईल तर आश्चर्य! 'मायेवांचून रड नाहीं आणि जाळावांचून कड नाहीं' हेंच अखेर खरें.

मराठी गद्याचा इंग्रजी अवतार करविण्यांत अनेक हेतु होते. ज्ञानप्रसाराचा शुद्ध हेतुहि त्यांत होता. पण त्याबरोबर इंग्रजी सुधारणेची भुरळ देशी मंडळी-वर पाडून ती वश करून घ्यावी असाहि एक डाव होता. मिशनरींचा हेतू धर्म-प्रसाराचा होता तो आणखी तिसराच. यूरोपीय विद्याकलांची छाप एकदा मना-वर बसली म्हणजे मग आपोआप मिशनरींचें इष्ट सिद्धीस जाईल असा एल्फिस्ट-नाचा कयास होता. तो म्हणतो:—

I am convinced that the conversion of the natives must infallibly result from the effusion of know-ledge among them." (Quoted by Sir P. M. Mehta —*Vide* his speeches and writings, page 2).

क्यांडीमोल्सवर्थ यांनीं १८३१ त आपल्या कोशाच्या प्रस्तावनेंत

"It was undertaken from a desire to promote the propagation of the glorious gospel." असें या कोशकार्याबद्दल स्पष्ट लिहिलें आहे. सुशिक्षित हिंदी समाज लवकरच ख्रिस्तानुयायी बनेल अशी मेकॉलेसाहेबांचीहि खात्री होती. परंतु फाजील धार्मिक उत्साह दाखविला तर साम्राज्य गडगडून पडेल (Dissolution of the Empire ) असा एल्फिन्स्टनला धाक वाटत होता. यासाठीं शाळेंत ख्रिस्ती शिक्षण उघडपणें देणें म्हणजे ब्राह्मणांना होष्यमाण अनिष्टाची आगाऊ सूचना देणें आहे असें त्याचें मत होतें.

"(The only effect of introducing Christianity into our Schools would be to sound the alarm and to warn the Brahmans of the approaching danger."—*ibid* page 3.

वर दर्शविल्याप्रमाणें त्रिविध हेतु मराठी गद्याच्या इंग्रजी अवताराच्या मुळाशीं होते. परंतु ज्या भूमींत हा अवतार झाला त्या भूमीचा व तेथील अन्न-पाण्याचा गुण त्याला हळूहळू लागल्याशिवाय कसा राहील? पाऊणशें वर्षांत संक-ल्पकांचे हेतू कितपत सिद्धीस गेले तें पुढील इतिहास वाचणारांस कळून येईल. ख्रिस्तीमतें व सुधारकमतें यांची चलती कांहीं दिवस चालली; पण माधव चंद्रोबा,

परशुरामपंततात्या इत्यादिकांनी जुन्या प्राचीन सारस्वताचा पुनर्दर्शनाभ्यास घडविला व मराठी वाङ्मयाच्या आंदोलनाचें नवें क्षेत्र पुण्यास बळावलें. याचा परिणाम बराच झाला व लोकांची दृष्टि निवळूं लागली. पहिली इंग्रजीची भुरळ व छाप उतरत चालली; व विष्णुशास्त्री यांनीं आपल्या तोफा डागल्या तेव्हांपासून सारस्वताच्या स्वरूपांत मोठीच क्रांति घडून आली, जुन्या ऐश्वर्याची जाणीव करून देऊन शास्त्रीबोवांनीं मोठा हुरूप राष्ट्रांत उत्पन्न केला. आपण रामदास—तुकारामांचे वारीसदार, आपणाला स्वतांस हीन कल्पण्याचें बिलकूल कारण नाहीं; इंग्रजी वाङ्मयाचा जीवनरस बलात्कारानें आकर्षून घेऊन पूर्वीच्या दिव्य जीवनानें येणारी पुष्टी आपण द्विगुणित करूं व वाङ्मयक्षेत्रांत नवीन थेंडें नाचवूं अशी ईर्षा राष्ट्रांत उत्पन्न झाली व तेव्हांपासून नवीनच दशेस प्रारंभ झाला. मात्र आपलें भौतिक अधिराज्य पुढेमागें नष्ट झालें तरी आपण इंग्रेजांनीं हिंदुस्थानावर स्थापलेलें बौद्धिक अधिराज्य ( Empire of ideas ) मात्र यावच्चंद्रदिवाकरा कायम ठसवूं असा अभिमान धरावा हा मेकॉलेचा आशावाद मात्र खरा ठरला. इंग्रजी अवतारांतलें नवें इंग्रजी तेज कायम राहिलें. इतकेंच नव्हे तर त्यायोगें अदृष्टपूर्व असें नवें ज्ञान व नवा जोम आम्हांमध्यें उद्भवला. धर्मोपनिषदांच्या गाईंचें पवित्र, कष्मलविनाशक व प्रकृतिमधुर पय म्हणजे आमचें जुनें वाङ्मय. हें श्रुतिमाउलीचें दिव्य दूध सकाळीं प्यावें; संध्याकाळीं पाश्चिमात्य वाङ्मयाच्या 'वाघिणीचें' नव्य व उग्र दूध पोटांत घ्यावें आणि रात्रीं निजतांना पुनः जुन्या गोदुग्धाचा कडकडीत घोट मननाची खडीसाखर घालून घ्यावा, म्हणजे आपण निःश्रेयस् व अभ्युदय हीं दोन्ही हि संपादूं! अस्तु!

सुप्रसिद्ध विद्वद्वर्य न्यायमूर्ति रानडे यांनीं मराठी वाङ्मयाच्या समालोचनपर दोन सुंदर निबंध इंग्रजींत लिहिले आहेत ते त्यांच्या Miscellaneous Writings किंवा संकीर्ण लेखसंग्रहांत १९१५ सालीं प्रसिद्ध झाले आहेत. पैकीं पहिला लेख, म्हटला म्हणजे सन १८६४ पावेतां प्रसिद्ध झालेल्या मराठी ग्रंथांवरील त्यांनी सरकारी हुकुमावरून लिहिलेला रिपोर्ट होय. दुसरा लेख अशाच स्वरूपाचा असून त्यांत इ. स. १८९८ पावेतों प्रसिद्ध झालेल्या मराठी वाङ्मयाचा परामर्ष घेतला आहे. हे दोन्ही निबंध न्यायमूर्तींच्या लौकिकाप्रमाणें विशाल व समतोल बुद्धीनें लिहिलेले आहेत. १८६४ पावेतां प्रसिद्धीस आलेल्या वाङ्मय संपत्तीचें Collective impression [ सदर ग्रंथ पृ. ११ ] म्ह. स्थूल-

निदर्शन त्यांनी दिलें आहे. निरपेक्षतया या संपत्तीची परीक्षा केली तर ही फार हीनस्वरूप ठरते असा त्यांचाहि स्पष्ट अभिप्राय आहे.

(It is true the entire picture thus presented to the view is far from satisfactory if one looks at it absolutely—(*ibid.*)

१८१८ पासून १८६४ पावेतोंच्या पन्नाशींत एकंदर ६६१ ग्रंथ प्रसिद्ध झाल्याचें सरकारी यादीवरून दिसतें. त्यांत ४३१ गद्य व २३० पद्य अशी वांटणी पडते. गद्यांतही पोटभेद केले तर शालोपयोगी ९८ व इतर ३३३; त्यांत इतिहास २३, कथागाथा ३९, निबंध ३३, चरित्रें १०, प्रवासवर्णनें ४, पौराणिक बखरी ११, धर्मतत्त्वज्ञान २०, भौतिकशास्त्रें ११, राजकारण ५, पत्रें, मासिकें १०, संकीर्ण ५६ अशीं सुमारें २२१ पुस्तकं लोकानुरंजक किंवा popular स्वरूपाचीं व इतर किंचित् अभियुक्त जातीचीं. त्यांत शास्त्रीय ६८ ( ६ अर्थशास्त्र २२ वैद्यक, बाकी इतर) कायदा ४१ (२८ कायदेकानूंची व इतर तात्त्विक) अशीं सुमारें *३३० किंवा ३३३ पुस्तकांची विल्हेवारी न्यायमूर्तींनी ठोकळाणें लाविली आहे.

ठिकठिकाणीं ह्या पुस्तकांविषयीं मत प्रदर्शित करितांना न्यायमूर्तींनीं ( of no merit ) तीं बेताबेताचींच असल्याबद्दल लिहिलें आहे. इतिहास घ्या, त्यांत नांवाजण्यासारखा एकही ग्रंथ नाहीं. शास्त्रें घ्या, तत्त्वज्ञान घ्या, सर्वत्र तीच रड. तथापि सुद्धां हा सारा वाग्विस्तार त्यांनीं गौरवाई ठरविला याचें कारण एवढेंच कीं, तो सुलक्षणी दिसत होता. त्याच्या बरोबरीचे सोबती पाहतां ते फारच मागें होतें.

(The stage of advance which the language has at present reached is to be hailed more for the promise it holds out for the future than for any accomplished success of the past. It is only when we look at the short interval of scarce forty years that we feel surprised at the amount of work that has already been done, especially when the comparative poverty of the sister languages of the presidency is taken into account.—M. Writings page 11).

---

* पहिल्या निबंधांत ही संख्या न्यायमूर्ती ३३३ देतात. ( पृ. २ ) दुसऱ्यांत ३२५ ( पृ. १८ ) आणि बेरीज भरते ३३०; पण हे सर्व आंकडे about चे म्हणजे अजमाशी आहेत

एखाद्या मोघळ्या मुलाप्रमाणें या वाग्विस्ताराची स्थिति नसून तो जन्मल्यापासून दोचौ महिन्यांत कुशीवर वळावयास लागला, लगेच पालथा झाला, रांगूं लागला व चरळाईनें बागडूं खेळूं लागून लवकरच अंगापिंडानें भरत चालला. १८७४ पासून तर तो पुढें उफाड्यानें वाढूं लागून चांगलाच थोराड दिसूं लागला. दर दहा वर्षांनीं त्याची प्रगतीच होत गेलेली आढळते. कशी ती पहा:—

१८१८ १८२७–या पहिल्या दशकांत अवघें तीन पुस्तकांचें त्रिदळ होतें, त्याचें दुसऱ्या दशकांत ( १८२७–१८३७ ) दशदळ होऊन तिसऱ्यांत १८३७–४८ ) तें त्रिदशदळ झालें ! १८४७–५७ दशकांत या छोट्या झाडाचीं पानें शेंकड्यावर दोन भरलीं. पांचव्या दशकाच्या आंतच ( १८५७–१८६४ ) ही संख्या ५५० होऊन या वृक्षाच्या पालवीच्या छायेंत बसून थोडका तरी आराम करतां येईल असा तो वाढला ! म्हणजे हा विस्तार न्यायमूर्ति म्हणतात भूमितिश्रेढीनें झाला ! पुढें १८६५–१८७४ या दशकाअखेर छापलेल्या पुस्तकांची संख्या १५३० झाली ! म्हणजे एकं, दहं, शतं असें मान मागच्या पन्नाशींत होतें तें एकदम सहस्रावर चढलें ! या वरील दशकांत वार्षिक पुस्तकप्रसिद्धीची सरासरी १५३ पडली. १८५७–६४ च्या अष्टकांत हेंच प्रमाण ६० होतें तें एकदम दुप्पटीच्याही पुढें गेलें व पुढें वीस वर्षांत तें पांचपटीवर जाऊन बसलें ! ( रानडे सदर पृ. २१–२२ ) न्यायमूर्तींनीं आधारार्थ घेतलेले सरकारी रिपोर्ट किंवा यादी आमच्या अवलोकनांत आल्या नसल्यामुळें त्यांजबद्दल अधिक येथें लिहितां येत नाहीं. मात्र या सरकारी यादी अपूर्ण आहेत एवढें स्पष्ट दिसतें आणि तें सरळही आहे. मुळीं १८६३ सालीं कोर्ट ऑफ् डायरेक्टर्सनीं या विषयाची वास्तपुस्त प्रथम सुरू केली. ‘ अलीकडे हिंदू मंडळी वाङ्मयक्षेत्रांत बरीच चळवळ करीत असल्याचें आढळ्यें. तेव्हां त्याची सरकारी नोंद झाली पाहिजे ’ असें ठरलें व १८६४ सालीं पहिली छापील देशी पुस्तकांची यादी तयार झाली व मग त्या यादीस चातुर्मासिक पुरवण्या जोडण्याचा प्रघात चालू झाला. सर अलेक्झांडर ग्रांट यांनीं विद्याखात्याचे डायरेक्टर या नात्यानें माधवराव रानडे यांजकडून १८६४ त मराठी पुस्तकांची यादी करविली. असा या यादींचा आरंभ झाला. त्यामुळें १८६४ पावेतों छापलेल्या सर्वच पुस्तकांची बिनचूक नोंद यादींत झाली असेल असें वाटत नाहीं. खेरीज Indian Copy Right Act, हक्कनोंदणीचा कायदाही १८४७ त प्रथम पास झाला; त्यामुळें पहिलीं पहिलीं विशीतिशींतील पुस्तकें सर्वच यादींना लागलीं

नाहींत. शिवाय देशी संस्थानें व बंगालसारखे परइलाखे यांत प्रसिद्ध झालेलीं मराठी पुस्तकें या यादींतून साराच नोंदलीं नसतील. तात्पर्य, या नोंदी जरी अशा अगदीं पक्क्या नसल्या तरी स्थूलरूपानें मात्र त्या प्रमाणभूत मानण्यास व त्यावरून सिद्धांत रचण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

हा वाङ्मयाचा इंग्रजी अवतार मुंबईस झाला व अल्फिष्टन्‌वुइल्सन्‌प्रभृति ‘ काकांच्या ’ कृपासावलींत तो वाढला हें लक्षांत घेतलें म्हणजे सुमारें ५०-७५ वर्षांत त्याची प्रगति बरी झाली असें म्हणण्यास अडचण नाहीं; पण एकदा का ज्ञानेश्वर—नामदेव—जनाबाई--मुक्तेश्वर-रामदास--तुकाराम-दासोपंत-श्रीधर-वामन--मोरोपंत या सरस्वतीच्या प्रेमळ पुत्रांचा दिव्य मेळा आपण मागें वळून पाहिला आणि त्याबरोबर गोदाकांठीं प्रतिष्ठानपुरांत किंवा कृष्णाकांठीं कऱ्हाडक्षेत्रांत किंवा शिवथरसारख्या सह्याद्रीच्या घळींत किंवा बुटेदरडीसारख्या गुहांत अथवा बारामतीस नाइकांच्या पुराणगाळेंत अगर भंडाऱ्याच्या टेंकडीवर किंवा नेवाशास श्रीमोहिनीमातेच्या मंदिरांत अथवा श्रीशैलमल्लिकार्जुनाच्या देवळांत ठिकठिकाणीं उठलेले या विश्वगुरूंचे अजून घुमत राहिलेले दिव्यतम ध्वनि ऐकूं येऊं लागले म्हणजे या दोन दृश्यांत केवढा विरोध दिसतो ? कोठें हे अजरामर कवींद्र आणि कोठें हे क्षणभंगुर नवीन कलमबहादूर ! स्वराज्यांतील गद्य या नांवाच्या पहिल्या प्रकरणांत वर्णिलेला महापरिवर्त घडून न येता किंवा येता तरी देखील या जुन्या महनीय अधिष्ठानाचा विसराळूपणानें किंवा अज्ञानानें त्याग न करितां त्याचें च संपूर्ण बल घेऊन जर नवीन अवतार आमच्या मराठी गद्यानें घेतला असता तर विद्रूप इंग्रजी अंगडींटोंपडीं आणि कुंचडीं घालीत बसण्यांत पाऊणशें वर्षें आम्हीं खास फुकट दवडलीं नसतीं ! जुन्या बखरी व जुनीं काव्यें यांतील शब्दसंपत्ति, ज्ञान-संपत्ति इत्यादि सर्व जमेला घेऊन जर आपण इंग्रजी वाक्संपत्तीचें प्रज्ञाबलानें आकर्षण केलें असतें तर आपले किती श्रम व गिरक्या वांचल्या असत्या ? आपली किती शीघ्र प्रगति झाली असती? जुन्याच रस्त्यावर नवी खडी पसरून व प्रसंग पडल्यास लोखंडी रूळ टाकून आपण झट्‌कन् येरझारा सुरू केल्या असत्या ! जुनी राज-कारणी भाषा कमावलेली तयार होती तेव्हां हां हां म्हणतां त्याच सांच्यांत गिबनप्रोट आरण सहज ओतून दिले असते ! तवा तापलाच होता, तेव्हां त्या सिद्धाग्नीवर जुन्या पुरणपोळ्यांबरोबर च नवे रोट भाजून घेणें काय अवघड पडलें असतें ? पण त्या सिद्धाग्नीवर आपण राख साचूं दिली, कचित् पाणीहि ओतलें

व नवीन भट्ट्या बांधण्यासाठीं चिखलमाती तुडवूं लागलों! याला काय म्हणावें? पाऊणशें वर्षे गेल्यावर विष्णुशास्त्र्यांनीं आता फुंकून जेव्हां ही राख फुंकून उडविली तेव्हां मग आपली चूक आपल्या ध्यानांत आली! माधवराव रानड्यांच्या लक्षांत १८६४ तच ही चूक येऊं लागली होती. आणि जुन्या बखरी मुद्रित केल्या पाहिजेत व माधव चंद्रोबांनीं जुनी कविता उद्धरली हें महत्कार्य ह्या काळीं झालें असा दूरदर्शी अभिप्राय त्यांनीं तेव्हां व्यक्त केलेला आढळतो.

( In course of time entire collections of the writings of Tukaram, Moropant, Mukteshwar, Shridhar, and Vamanpandit, will, it is hoped, be published and when completed it will be *the highest claim* of this age to be remembered in all future time Ranade M. W. page 10 and also see page 15 )

रानड्यांच्याच मंडळींतील कीर्तनेबंधूंपैकीं नीळकंठराव (परिशिष्ट पृ. १४ पहा.) यांनी १८६७ तच जुन्या मराठी बखरींचे हस्तलेख वाचून इकडचा कोतेपणा व कोरडेपण सिद्ध केला होता. पण विष्णुशास्त्री येऊन सिंहनाद करीपर्यंत युद्धाला नीटसें तोंड लागलें नव्हतें.

या पन्नासपाऊणशें वर्षांतील वाङ्मयाविषयीं या ग्रंथांत आम्हीं केलें आहे एवढें विस्तृत विवेचन हें पहिलेंच म्हणावयास हरकत दिसत नाहीं. रा. रा. भि. जोशी यांनीं आपल्या 'मराठी भाषेची घटना' या पुस्तकांत व तदनंतर 'मराठी वाङ्मय विवेचन' या छोट्या पुस्तकांत ह्याविषयीं काहीं माहिती व विचार प्रसिद्ध केलेले आहेत. पण ते फार तांत्रिक व त्रोटक आहेत. रा. जोशी यांनीं आपल्या विवेचनांत या वाग्विस्तारांचीं दोन वळणें म्हणून निरनिराळीं वळणें दिलीं आहेत. एक पुणेरी वळण व दुसरें मुंबई ऊर्फ कोंकणी वळण. कृष्णशास्त्री चिपळोणकर हे पुणेरी वळणाचे नामांकित ग्रंथकार व विनायक कोंडदेव ओक हे मुंबई वळणाचे उत्कृष्ट लेखक असें रामभाऊ म्हणतात त्यांचा असाहि समज दिसतो कीं, मुंबईचें वळण आधीं सुरू झालें व जसजसें पुण्यामुंबईत दळणवळण वाढलें, तसतसें मुंबई वळण मागें पडलें व पुणेंवळण सर्वमान्य झालें. मुंबईचें वळण साधें, सोपें व सरळ, त्यांत संस्कृताचा भरणा कमी व वाक्यें लांबट नाहींत; उलट पुण्याचे वळणांत वाक्यें जरा लांबट व ब्राह्मण वर्गाच्या उच्च भाषेंतली शब्दवटिका असे, असा रा. जोशी यांचे विवेचनाचा झोंक आहे.

आमच्या मतें रा. जोशी यांचा जरा घोंटाळा झालेला दिसतो. पुणेरी वळण व मुंबई वळण अशीं स्थळवाचक नांवें त्यांनीं योजिलीं आहेत; परंतु त्यांचें स्वरूप मात्र असें वर्णिलें आहे कीं, त्यांचा स्थळमर्यादेशीं म्हणण्याइतका संबंध नाहीं. बाळमित्रादि ग्रंथांत भाषेचा साधेपणा आहे, परंतु केपिनसानेकृत ' मराठ्यांच्या बखरींत ' तें वळण मुळींच नाहीं. हरिकेशवजींची भाषा व आद्यकोशकर्त्यांची भाषा एक नाहीं. जडगीबडणीला कोशकर्तेशास्त्री किंवा केपिनसाने हे जरा भारी व भरींव भरतील व बापू छत्रे किंवा पुढचे बालबोधकर्ते तितकेच हलके लागतील. हा भेद स्थळभेदाचा परिणाम म्हणतां येणार नाहीं. हा संस्कृतिभेद किंवा रुचिभेद होय. स्थळभेदाचा परिणाम पाहणें असेल तर बापू छत्रे यांच्या लेखांत ' कोंकणी ' शब्द–उ. ओंड ' ( उतारे पृ. ६ ) किंवा तसलीं रूपें किंवा प्रयोग उ. सुपाऱ्यांनीं खळूं (उ. पृ. २१३ ) अथवा शेऊळ (उ. पृ. ४ )—येतात ते परिणाम स्थळभेदाचा होय. हे कोंकणी शब्द बापू छत्रे मुंबईस वापरील किंवा कृष्णंशास्त्री चिपळोणकर हि पुण्यास योजील. (रासेलस पहा. ) उलट पुण्याचे परशरामपंत गोडबोले किंवा खुद्द मुंबईस काम करणारें अष्टांगरांतलें शास्त्रीमंडळ आपल्या संस्कृतीप्रमाणेंच भाषायोजना करील. शास्त्रीकृत कोशाचेंच उदाहरण आपण घेऊं. या कोशाच्या प्रस्तावनेंतून विस्तृत उतारा आमच्या या ग्रंथांत पृ. २३।२४ वर दिला आहे तो पाहिला असतां " महाराष्ट्र देशाचा मध्यभाग पाहतां असतां प्रायः पुणेंप्रांत होतो " " आणि देशभाषेच्या वर्तनाचा असा नियम आहे कीं, स्वदेशाचे मध्यभागीं शुद्ध रूपानें असावें आणि उत्तरोत्तरपर्यंत भागीं तत्तदेशांतरस्थ भाषांचे मिश्रणानें संकीर्णरूपानें असावें " " अतएव " या कोशकर्त्यांनीं **पुणेरी भाषा हीच प्रमाण** मानिली आहे हें उघड होतें. या शास्त्र्यांच्या प्रास्ताविक मजकुराची घडण कशी भरींव व संस्कृती थाटाची आहे तें पहिल्या एकदोन वाक्यांतच दिसतें. हा पुणेरी वळण प्रमाण मानणारा कोशहि मुंबईस च झाला. मग या वेळीं निराळें मुंबई वळण म्हणून कल्पिणें भ्रामक नाहीं काय? तात्पर्य, पुण्याची भाषा हीच प्रमाण भाषा म्हणून प्रथमपासून सर्वमान्य होती. वास्तविक एखाद्या लेखकाची भाषासरणि ( style ) ही प्रसंग प्रतिभा व प्रकृति यांच्या संयोगाचें फळ असून ती स्थळकाळमर्यादित स्वरूप पावत असते. साधें वळण, संस्कृत वळण जुनें वळण, नवें वळण, इंग्रजी वळण, गांवढं वळण किंवा नागर वळण अशीं भिन्नभिन्न शेंकडों वळणें आपणांस कल्पितां येतील. तितक्या सर्व वळणांच्या

छटा आपल्या प्रस्तुत पाऊणशें वर्षांतील लेखकांच्या लिखाणांत आढळून येतील. असा व्यापक व खोल विचार केला म्हणजे त्या काळीं स्थूलपणें पुढील वळणं किंवा सांप्रदाय ठरविणें आमच्या मतें युक्त होईलः—

( १ ) जुनें म्हणजे पेशवाइ गृहस्थी वळण.

( २ ) शास्त्री किंवा संस्कृती वळण.

( ३ ) इंग्रजी किंवा नवें किंवा भाषांतरी वळण.

( ४ ) संमिश्र वळण.

यांपैकीं पहिलं वळण सभारंजनी किंवा चिटणिशी बखर वगैरे ग्रंथांतून दृष्टीस पडतें. पुण्याकडे व इतरत्र सर्व साक्षर महाराष्ट्रांत हेंच वळण आरंभाला प्रचलित होतें. परंतु पेशवाईतच शास्त्रीमंडळींचें एक अवजड वळण गृहस्थ मंडळीहून निराळेंच प्रचलित असे. थोड्याफार फरकानें शास्त्रीमंडळीनें हेंच वळण आजतागायत चालविलें आहे. कोशाची प्रस्तावना किंवा भारतभागवताचीं भाषांतरें यांत हें वळण आपणांस आढळतें. (पहा. उतारे पृ. ५९ ते ६२) या शास्त्रीमंडळाला नवीन देशी विद्वान् व मिशनेरीप्रभृति अस्सल इंग्रजी मंडळी यांचे समवेत अगर हुकमतीत काम करावें लागे. कृष्णशास्त्री चिपळोणकरप्रभृति नवीन शास्त्री यांनीं जुनें अवजड वळण टाकून नवें व जुनें यांचा मनोहर मिलाफ केला. पण तो पुष्कळ पुढें पुढें. प्रथम प्रथम साहजिकच या शास्त्रीमंडळाचे वळणांत त्यांच्या अध्ययनाचा छाप आपणांस दिसावा यांत नवल नाहीं. जाडेजाडे संस्कृत शब्द ह्या 'घटपटादि खटपट' करणाऱ्यांच्या, अहोरात्र तोंडांत बसलेले ओघानेंच त्यांच्या लेखणींतून उतरत, व त्यांचें प्रौढ पांडित्य प्रगट करीत. हा झाला या शास्त्रीय वळणाचा प्रकार. भांडारकरांच्या दख्खनच्या इंग्रजी इतिहासाचें मराठी भाषांतर किंवा त्यांच्या संस्कृत प्रवेशिकादींचीं मराठी भाषांतरें पहा, अजूनहि हा अवजड प्रकार तेथें पाहावयास सांपडेल. तिसरा प्रकार हा मात्र अगदीं नवीन म्हटला पाहिजे. धड जुनी पेशवाई कारकुनीपरंपरा नाहीं किंवा शास्त्रीपरंपराहि नाहीं अशा नवीन मुंबईकर दुभाषा मंडळीवर जेव्हां मराठी लिहिण्याची कामगिरी आली तेव्हां त्यांनीं जी धडपड केली तिचा परिणाम म्हणजे वरील तिसरा नवा प्रकार होय. इंग्रजीचा कित्ता पुढें, शिरजोर परंतु जिज्ञासु व गरजू इंग्रजी मास्तर समोर

बसलेले, अशा पेंचांत सांपडलेल्या नवीन विद्वानांनीं जी अर्धीकची पुंजी, कांहीं नवी कांहीं जुनी, जवळ होती तिचा धांदलीनें उपयोग करून एक गंगाजमनी जोड तयार केला. मग फुरसत मिळत गेली तसे जुने शास्त्री मदतीस घेतले, जुनें वाङ्मय कांहीं उलथेंपालथें करून पाहिलें व अधिकाधिक जम बसविला. इंग्रजी-वरून पद्धत घेऊन तिच्या साच्यांत मराठी बसविण्याचा ओबडधोबड प्रयत्न या नव्या मंडळींनीं केला. तो डाक्तर वुइल्सन् याला सुद्धां rugged वाटला (मोल्स० कोश, प्रस्ता० ) जुन्याचें बळ या नव्यांत फार उणें असल्यामुळें यांची कळकळीची खटपट, म्हणावी तितकी जरी फलद्रूप झाली नाहीं तरी तिच्यायोगानें एक नवीन उचल सुरू झाली व या ओढाताणींत उशीर लागला तरी मराठी वाङ्मयाचा बराच फायदा झाला. नवीन नवीन शब्द तयार झाले—तसलेच जुने जरी शोधून काढण्याची कसोशी विशेष राखली नाहीं तरी—नवी रचना रूढ झाली व मराठी भाषेस एका **सुसंघटित वळणाची जोड झाली.** हा मोठा लाभ समजला पाहिजे. या वळणाचा ओघ आस्ते आस्ते निवळत पण बळावत चालला आहे; व तो अजून वाढताफुगता आहे. तथापि या वळणाचा प्रथमचा ओघ सारा भाषांतरी होता. तो वांकडातिकडाच होता. त्यांत बांधेसूदपणा किंवा गौल्यता कांहींच नव्हती. परंतु जुनें शास्त्री वळण, प्राचीन वागीश्वरांची प्रणाळी, व इंग्रजीचा विविध परंतु नीटनेटका विलास या तिहींचाहि जोर तिहींकडून लागत राहिल्यानें अखेर त्याचा खरखरीतपणा व वेडेवांकडेपणा घांसटत जाऊन तो मऊ, तजेलदार व गोंडस बनत चालला. दादोबा पांडुरंग किंवा कृष्णशास्त्री यांनीं या कामीं वाखाणण्यासारखें यश संपादन केलें. हेंच चवथें किंवा संमिश्र वळण म्हणून जें वर सांगितलें तें.

वाचकांच्या मनांतून अजून एक खुमखुन गेली नसेल. मराठी गद्याचा हा इंग्रजी अवतार जर प्रौढ, गंभीर नाहीं, तर अध्ययनरूपानें त्याची पूजा करण्याचें फल काय? असा प्रश्न साहाजिकच उद्भवतो. त्याचा आतां विचार करूं. खुद्द ह्या अवताराचें स्वरूप पूजनार्ह नाहीं. या वाग्विस्तारांत अंतःकरणाची तळमळ शांतविण्याचें किंवा मनास डोलविण्याचें किंवा त्यास सम्यग्बोध करून गुरुत्व संपादण्याचें सामर्थ्य नाहीं. मग असल्या रडक्या वाङ्मयाचा व्यासंग तरी कशासाठीं करावा आणि इतिहास तरी काय म्हणून वाचावा? या प्रश्नाचें उत्तर असें आहे. जरी हें वाङ्मय स्वभावसुंदर नाहीं तरी याचें अध्ययन एका दृष्टीनें फारच बोधप्रद आहे. प्रख्यात वाङ्मयचंचु डॉ. मोल्टन

यानें असा एक सुयुक्तिक सिद्धान्त प्रतिपादिला आहे कीं एखाद्या राष्ट्राचें वाङ्मय म्हणजे त्या राष्ट्राचें चरित्रचित्रच होय. जसे लोक तसे त्यांचे देव असें जें आपण पुष्कळदा म्हणतों त्यांचें व वरील सिद्धान्ताचें मर्म एकच. भोळ्या लोकांचें वाङ्मय भोळेंच असणार. दुबळया लोकांचें वाङमय दुबळेंच असणार. आणि खुळयांचें खुळेंच असणार. वाङ्मय हा राष्ट्रादर्श आहे. राष्ट्राच्या मनाची, बुद्धीची व कर्तृत्वाची लांबीरुंदी व उंचीजाडी या वाङ्मयाच्या मापानें बिनचूक मापतां येते.[1] इंग्रजी अंमलाच्या सुरवातीपासून आमच्या समाजाची स्थितिगति आमच्या तत्कालीन वाङ्मयावरून उत्कृष्ट कळून येते. स्वराज्य गेलें आणि पाठोपाठ सरस्वतीहि आम्हांस विन्मुख झाली !! नव्या परकी सरकारला, आपली माया लावून आपल्या लगामीं राहील असा नवीन सुशिक्षितांचा एक वर्ग निर्माण करावा लागला. या नवीन वर्गांत बहुतेक भरती नवीन बुभुक्षितांची होती. जुने खानदानी, राज्य भोगलेले मुत्सद्दी, सरदार, वगैरे सर्व अंतर्धान पावल्याप्रमाणें झाले ! राष्ट्राची वाचाच बसली !! ती दांतखिळी उचकटण्याचा पहिला प्रयत्न विष्णुशास्त्री यांनीं केला व नवीन सुशिक्षितांचें मोहपटल त्यांनीं दूर केलें. हा मनोरंजक व अतीव बोधप्रद इतिहास या वाङ्मयाच्या अध्ययनानें मनावर ठसतो. सरकारी किंवा निमसरकारी किंवा मिशनेरी असे प्रयत्न चालू असतानांच माधव चंद्रोबाप्रभृतींचा जो प्राचीनवाङ्मयोज्जीवनाचा स्वतंत्र प्रयत्न चिकाटीनें चालला होता तो मराठा राष्ट्राच्या रक्तांतील चिवटपणाचा व जिवंतपणाचा भक्कम पुरावा होय व त्याचेंच फळ विष्णुशास्त्री ! तात्पर्य, या बाह्यतः त्याज्य वाटणाऱ्या वाङ्मयाच्या उपासनेपासून राष्ट्राचा अंगभूत चिवटपणा जसा प्रत्ययाला येतो तसाच नवीन पाश्चात्य ज्ञानाचा तिखटपणा व तेज हींहि दिसून येतात. राष्ट्राची भूक केवळ जुन्या वाङ्मयगोदोहनानें शांत होणारी नव्हती. त्याला क्षय लागण्याचीं चिन्हें दिसत असून नव्या पाश्चिमात्य विद्येचें ' कॉड लिव्हर आईल ' जुन्या गाईच्या दुधांतून त्यास अवश्य पाजावयास पाहिजे होतें. हें निदान व हा उपाय बिनचूक असल्याची खात्री पटण्यास मराठी गद्याच्या इंग्रजी अवताराच्या मीमांसेचीच अपेक्षा आहे.

येथवर मराठी गद्याच्या इंग्रजी अवताराच्या स्थूल स्वरूपाचा विचार केला. या अवतारांत प्रगटलेले लेखक व त्यांचे ग्रंथ व त्यांत आलेले विचार, किंवा भाषेचें स्वरूप इत्यादिक प्रश्नांचा अधिक सूक्ष्म विचार पृथक्करणरूपानें करतां येण्यासारखा

---

1 " A national literature, it is generally recognised, is a reflection of the national history "— World Literature page 431–Moulton.

आहे. त्याचप्रमाणें गुजराथी, बंगाली, हिंदी वगैरे इतर भाषांत याच काळांत जो वाङ्मयसंभव झाला त्याचा व या मराठी अवताराचाहि तुलनात्मक विचार आपणांस करावयास पाहिजे. परंतु हे व असले पुष्कळ प्रश्न प्रस्तुत तरी या लेखकाला बाजूस ठेवावे लागत आहेत.

लेखकानें हा ग्रंथ लिहून प्रसिद्ध करण्यास एक प्रासांगिक कारणच मुख्यतः उपस्थित झालेलें होतें. बरीच वर्षें धडपड केल्यावर बी. ए. च्या परीक्षेंत "मराठी" भाषेचा कोपऱ्यांत का होईना, परंतु शिरकाव झाला. त्याबद्दल सर्वत्र जरी आनंद दर्शविणें योग्य होतें तरी मिळालेल्या यशाचे प्रमाणानें आनंदाचें प्रमाण फाजील झालें असेंच म्हणावें लागतें. जोंवर "संस्कृत" "इंग्रजी" इत्यादि प्रमुख भाषांच्या बरोबरीनें बसण्याचा हक्क मराठीस प्रांजळपणें देऊन तींत सन्मान ( ऑनर्स) मिळविण्याची वाट विद्यार्थ्यांस मोकळी होत नाहीं तोंवर आमच्या तरुणांना स्वभाषाध्ययनाला मोठी वाव मुंबई विद्यापीठांत झाली असें कधींहि म्हणतां यावयाचें नाहीं व या अर्धवट चवलीपावली सुधारणेनें विशेष लाभ होणार नाहीं. नुसता विडा घेऊन जेवणाची पावती कोण शहाणा देईल ?

असें आहे तथापि विषय ठेवला तेव्हां साहाजिकच तिकडे लक्ष्य पुरवावें लागलें. मराठींत एखाद्या विषयाचें शास्त्रीय अध्ययन-अध्यापन करण्यास अपरंपार अडचणी आहेत. बाहेर मान नाहीं, व्यवहारांत लाभ नाहीं, सरकारांत प्रतिष्ठा नाहीं, म्हणजेच आश्रय नाहीं, उत्तेजन नाहीं. उलट पदरमोड करावी, आणि अपमान सोसावे, असा विपरीत प्रसंग! मग या स्थितींत साधनांची अनुकूलता कितपत असणार हें दिसतेंच आहे! ना धड कोश, ना धड व्याकरण, ना धड टीका, असा सारा दरिद्रीनाम संवत्सरेचा प्रकार! इंग्रजी वाङ्मयाचें अध्ययन करावयास गेलों तर एकाऐवजीं शेंकडों टीका, प्रतिटीका, चर्चा, टिप्पणीग्रंथ, सारांशग्रंथ, चरित्रग्रंथ, कोशग्रंथ आपल्या साहाय्यास सिद्ध असतात. फक्त वाचावयाचें आणि मनन करावयाचें! मराठींत तसें नाहीं. सारा धर्मशाळेंतला संसार! त्यामुळें जी वेडीवांकडी शिधासामग्री मिळेल त्यावर भातपिठलें साधेल तसें उरकून दिवस साजरा करावा लागतो. आज आमची मराठी अशी पोरकी दिसली तरी ती थोरामोठ्याची, कुलीन, शुद्धसत्व आहे, तिचे कोड परमेश्वर पुरविणारा आहे !

अशा प्रतिकूल परिस्थितींत हा ग्रंथ लिहिण्यास घ्यावा लागला. बी. ए. ला १९२२/२३ सालासाठीं ऐच्छिक मराठी घेणाऱ्यांस इ. स. १८१० ते १८५०

था ५० वर्षांतील मराठी गद्य वाङ्मयाचा कालखंड अध्ययनास ठेवला आहे. १८२० किंवा १८७० हेच दोन सन कां पसंत करण्यांत आले हें समजणें जरा कठीण आहे. बा. ए. चा हा साराच अभ्यासक्रम असा सदोष आंखला गेला आहे *

* १८१८ ते १८७० पर्यंतचा गद्यकाल नेमून मग पंडिता रमाबाईनी लिहिलेलें ,' अमेरिकेंतील संयुक्त संस्थानचा इतिहास " हें १८८९ त प्रथम प्रसिद्ध झालेलें २० वर्षांनंतरचें पुस्तक अभ्यासास नेमलें कसें? ज्या प्रवासाचें वृत्त रमाबाईनी लिहिलें तो प्रवासच मुळीं त्यांनीं १८८६ (म्हणजे १८७० नंतर सोळा वर्षांनीं) सुरू केला! मग ग्रंथ नेमणारांची तारीफ आहे कीं नाहीं? तोच आक्षेप "लोक-हितवादी"कृत "पृथ्वीराज चव्हाण" या पुस्तकावर येतो. हेंहि पुस्तक १८७० सालानंतर तेरा वर्षांनीं प्रसिद्ध झालेलें आहे. तरी याची शिफारस विद्यार्थ्यांस कशी केली? लोकहितवादी व रमाबाई[1] पुढें पुष्कळ वर्षे लिहित होत्या. त्यांचे व इतर ग्रंथकारांचे ग्रंथ हि मग कां नेमले नाहींत? मूळ १८७० ची कालमर्यादा घातली तिचा अर्थ काय? पुढील ग्रंथ नेमले तर या मर्यादेची शोभा तरी काय राहिली! १८७० पूर्वींच्या वाङ्मयस्वरूपाचा छाप या सदरील पुस्तकांवर विशेष आहे त्यामुळें तीं पुस्तकें पुढें जन्माला आलीं असलीं तरी स्वभावानें तीं १८७० पूर्वींचीं आहेत असें म्हणावें तर तसा प्रत्यय येत नाहीं. आणि १८७० पुढील मराठी ग्रंथांत एवढीं दोनच पुस्तकें जुन्या स्वभावाचीं आढळलीं? लोकहितवादी व पंडिता यानीं पुढें जे काय ग्रंथ व लेख लिहिले ते सर्व एकजात नव्या वळणाचे? बाबा पदमनजी हे एक जुने ग्रंथकार तेहि पुढें पुष्कळ वर्षे हयात होते. मग त्यांचेहि ग्रंथ पुढें कैक झाले ते कां वगळले? ग्रंथ न पाहतां व शोध न करतां अभ्यासक्रमाची आंखणी बेजबाबदारपणानें झाली असें जर कोणी आतां म्हटलें तर म्हणणाऱ्याकडे किती दोष येईल? गद्याचे बाबतींतच असा ढिसूळपणा झाला असें नाहीं. तर पद्यांतहि तो दिसतो. पद्यकालांचे अखेरीस (इ.स.१७२०) बिचारा महिपती पांच वर्षांचा असेल नसेल तरी त्याला ओढून " तूं मागच्या मंडळींसारखा दिसतोस " म्हणून दडपून दिला. पद्यकाळ १६३० ते १७२० (इ. स.) असा नेमला. महिपतीचा जन्म इ. स. १७१५ त झाला. आमच्या नियमित कालमर्यादांतीं तो पांच वर्षांचा बालक होता! तरी त्याला आमच्या आभ्यासनियामकांनीं "समन्स्" बजाविलें! सारी अंदाधुंदी! तक्रारी केल्या, पण "हम करेसो कायदा" या प्रकारचे "अहं प्रमाणं" जबाब आले!! कोणी शास्तापुस्ता नाहीं!!

१ पंडिता रमाबाई नुकत्याच ( ५ एप्रिल १९२२ ) परलोकवासी झाल्या.

१८१८ त इंग्रजी अम्मल प्रत्यक्ष सुरू झाला यामुळें डॉ. वुइल्सनानें १८१८ स मराठी वाङमयाचा नवीन मनू सुरू झाला म्हणून म्हटलें आहे. (मोल्स. को॰) १८१८ तील राज्यक्रांतीमुळें वाङ्मयक्षेत्रांत नवीन क्रांतीला प्रारंभ होण्यास अवकाश मिळाला हें खरें आहे; तथापि वाङ्मयविस्तराचे कालदृष्ट्या खंड पाडतांना प्रत्यक्ष वाङ्मयक्षेत्रांत ज्या सालीं किंवा कालीं कांहीं क्रांतिकारक प्रसंग घडला असेल तें साल किंवा तो प्रसंग घेऊन वाङ्मयकालाचें आरंभस्थान, मध्यस्थान किंवा अंतस्थान इत्यादि स्थानें निर्गीत करावीं हा प्रशस्त मार्ग होय. या दृष्टीनें इ. स. १८१० त कॅपारेचा कोश झाला तेव्हां इंग्रजींतल्या मराठी गद्याचें तें आरंभस्थान मानावें हें युक्त होईल. इ. स. १८७० या सालांतहि निर्णायक सूचकत्व कांहीं नाहीं. त्या सालांत एखादा नामांकित ग्रंथकार जन्मला किंवा मेला, अगर एखादा नवा प्रकार सुरू झाला किंवा बंद पडला किंवा एखादा वाङ्मयोद्धारक किंवा वाङ्मयविरोधक कायदा किंवा संस्था निघाली असा कांहींच प्रकार नाहीं. यामुळें १८७० हें साल ग्राह्य नाहीं. आम्ही अनेक कारणांस्तव इ. स. १८७४ हें साल या कालखंडाचें अंतस्थान म्हणून ग्राह्य धरलें आहे. त्यांतलें सर्वांत मुख्य कारण म्हणजे या सालीं निबंधमाला सुरू झाली हें होय. १८१० ते १८७४ अशीं सालें आरंभांतांसाठीं आम्हीं ग्राह्य ठरवून ग्रंथ लिहिला आहे. या ६४ वर्षांचे पोट-विभागही पाडले आहेत, ते कां व कोणचे तें मूळ ग्रंथांत त्या त्या ठिकाणीं लिहिलेंच आहे. आमची विचारसरणी सहृदय, विचारी, व विवेचक वाचकांस मान्य होईल असें वाटतें.

हा ग्रंथ लिहिण्यास पुण्यांत साधनें फार थोडीं सांपडलीं. पुण्यांत मराठी ग्रंथालय आहे, परंतु तें अद्यापि मुंबई-ठाण्याच्या फार मागे आहे ठाणें व मुंबई येथील ग्रंथसंग्रहालयांत हा ग्रंथ लिहिण्यास भरपूर साधनें आहेत. परंतु त्यांचा फायदा मला फारच थोडा घेतां आला. सदर दोन्ही ग्रंथालयांच्या चालकांनीं उदारपणानें मला लागेल त्या सवलती दिल्या; तथापि दिक्कालांच्या मर्यादांपुढें कोणी झालें तरी हातच टेंकणार! पुण्याच्या म. ग्रंथालयाच्या व्यवस्थापकांनीं शक्य तें साहाय्य मला दिलें. पुणें ठाणें व मुंबई या ठिकाणांप्रमाणेंच वांई येथेंहि मराठी संग्रहालय

---

२ वाई संग्रहालयांत परशुरामपंतांचें इतिहासावरील सोपी कविता हें पुस्तक ( इ. स. १८६४ ) पाहावयास मिळालें. त्यांत ' क्षमातळीं इंग्लिशासारखा प्रभु नाहीं दूसरा । घ्या सुख आतां दुःखें पहिलीं सर्व तुम्ही विसरा ॥ " येणेंप्रमाणें संतोषोद्गार काढला आहे तो तत्कालीन विद्वानांच्या भुरळलेल्या मनाचा पुरा पुरावा आहे!

चागलें आहे. तेथेंहि एक फेरी मी केली. या चार संग्रहालयांचा यथावकाश उपयोग या ग्रंथासाठीं करून घेतला. भा. इ. सं. मंडळांतील कित्येक दुर्मिळ ग्रंथ मला उपयोगी पडले. तथापि जर मजला माझे रसिक मित्र श्री. आबासाहेब मुजुमदार यांच्या अमूल्य ग्रंथसंग्रहाची जोड झाली नसती तर माझा प्रयत्न अपुरा राहिला असता. खुद्द मजजवळहि स्वतःचा संग्रह बराच होता व माझे मित्र कै. सहकारी कृष्ण यांचा हल्लीं शारदामंडळाकडे आलेला अनेक ग्रंथसंग्रहहि मला फार कामास आला. श्री. आत्यासाहेब मेहेंदळे, यांच्या निवडक ग्रंथसंग्रहाचाहि फायदा घेण्यास मीं सोडलें नाहीं. सुप्रसिद्ध वाङमयसेवक माझे मित्र रा. लक्ष्मणरावजी पांगारकर यांनीं "दादोबांच्या आत्मचरित्रा"ची हस्तलिखित प्रत दिली. रा. पांगारकर यांनीं मिळविलेली ही एक अपूर्व चीज आहे व ती मला उपयोगासाठीं देऊन हा ग्रंथ सजविण्यास त्यांनीं मला मदत केली हा त्यांचा उपकार मजवर फार झाला. याखेरीज "एक एक पुस्तकाची भीक" मला माझ्या कित्येक कृपाळू मित्रांनीं घातलेली आहे आणि म्हणून तर माझ्या ग्रंथांत मला जागोजाग आधार देऊन 'नामूलं लिख्यते किंचित्' अशी प्रौढी मिरविण्यास धीर वाटतो. अशा रीतीनें एतत्कालीन वाङमयाचें स्वरूप नीट जाणण्यासाठीं प्रस्तुत लेखकानें यावच्छक्य प्रयत्न केले. त्यांत कसूर केली नाहीं. ही सारी उभारणी त्यास परिमित अवधींत करावी लागल्यानें तींतील दोष तो जाणून आहे. त्यांबद्दल रसिक वाचक लेखकास क्षमा करतील यांत संशय नाहीं. कारण तो त्यांचा धर्मच आहे. "आपुलिया थोरपणा वरि ठेवुनि दृष्टि" ते वागत असतात. क्षमा केली तरी त्यांनीं लेखकाचे दोष त्यास उघडपणें परंतु उदारपणें दाखविल्यानेंच लेखकाचें कल्याण होईल हेंहि त्यांस त्यानें सांगावयास नको.

हा ग्रंथ पुष्कळ घाईनें लिहून पुरा करावा लागला. प्रथम ५० पृष्ठांचा अजमास धरला होता, तो वाढत वाढत दुप्पट तिप्पट झाला. मग उतारे जोडण्याचा विचार करून आणखी ऐशीं पानें घातलीं. अशी ठिगळजोड करावी लागली तथापि या स्वरूपाचा हाच पहिला ग्रंथ या विषयावर होत असल्यामुळें या दोषांकडे दुर्लक्ष्य केलें. नंतर दादोबादि मराठी ग्रंथकारांच्या पिढीची अखेर डोळ्यांनीं पाहिलेले वयोवृद्ध वाङ्मयोपासक रावबहादूर काशीनाथ नारायण साने बी. ए. यांस या ग्रंथास आशीर्वाद देण्यास विनंति केली. गात्रशैथिल्यामुळें राव-

बहादूर यांस एवढाहि भार सहन होण्याजोगता नव्हता; तथापि मजवर त्यांचा लोभ असल्यानें त्यांनीं आशिर्वाद दिला तो प्रारंभीं जोडला आहे.

या ग्रंथाचें प्रकाशन रा. अनंतराव बापट यांनीं उत्साहानें पत्करिलें व अवघ्या तीन आठवड्यांत ओढून लिहिला गेलेला एवढा मजकूर 'लॉ. प्रिंटिंग प्रेसचे' मालक रा. खांडेकर यांनीं तसाच झपाट्यानें छापून दिला याबद्दल या उभयतांचे आभार अवश्य मानिले पाहिजेत. न्यू-पूना-कॉलेजांतील बी. ए. वर्गांतील माझ्या 'मराठी' विद्यार्थ्यांनीं आपली ओढ अखेरपावेतों चिकाटीनें चालविली नसती तर हा ग्रंथ माझे हातून खचित लिहून होता ना; यासाठीं माझ्या उपरिनिर्दिष्ट साहाय्यकांत मला त्यांचीहि गणना अवश्य केली पाहिजे व इतरांबरोबरच त्यांचेहि आभार मानले पाहिजेत.

मूळ ग्रंथ ११२ पृष्ठें व उतारें ८० पृष्ठें अशीं १९२ पृष्ठें लिहून छापून होतांच माझ्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांचें दडपण उठलें; लागलींच माझा हा उद्योग थांबला; आणि आज दीड महिन्यानें गाडी पुनः जुंपून मी कसाबसा मुक्कामास येऊन पोंचलों. आतां लेखणी जरा दप्तरांत बांधून ठेवतों आणि हा ग्रंथ रसिकांनीं स्वीकारून मला "विसार" दिला तर पुनः गाडी जोडून मी त्यांना अगदीं त्यांच्या आंगणांत नेऊन सोडण्याची उमेद बाळगून आहें, एवढें नम्रपणें सुचवितों.

| | |
|---|---|
| ज्येष्ठ शु. १३।१८४४<br>श्री शिवराज्याभिषेक शके २४८ | रसिकांचा सेवक,<br>**दत्तो वामन पोतदार.** |

---

१ नवनीतादि प्रमुख पद्यग्रंथांचा आम्हीं विचार केला आहे, तेव्हां गद्यवाङ्मयाविवेचनाच्या न्याय्य मर्यादा आम्हीं ओलांडल्या असा एक आक्षेप आमच्या प्रथावर लागू करतां येण्यासारखा आहे. वास्तविक त्या वेळच्या गद्य व पद्य या दोन्ही ओघांची ताटातूट करण्यानें वाङ्मयपुरुषाचें अवयवच्छेदन करण्याचें क्रूरकर्म केल्याचा दोष बळकट पदरीं येतो. आम्हीं जरी पद्यादिकांचा उल्लेख केला आहे तरी त्यास क्षम्य मर्यादेबाहेर हातपाय पसरूं दिले नाहींत नुसता साक्षिभूत म्हणून त्याचा विचार कोठें कोठें आणला आहे. तो मूळ विषयाला उपोद्बलक व्हावा याच हेतूनें.

# मराठी गद्याचा इंग्रजी अवतार

## बाल्य व तारुण्य

शके १७४० ते १७९६

इ. स. १८१८ ते १८७४

## प्रकरण १ लें



[ स्वराज्यांतलें गद्य ]

पृथ्वीवरील संपन्न व समर्थ भाषांपैकीं मराठी ही एक आहे. तिची प्राचीन काव्यसंपत्ति अलौकिक आहे व ही च तिच्या श्रीमंतीचें आद्य कारण आहे. गद्यसंपत्ति तिची यथायथा च आहे. प्राचीन काळीं पद्यप्रवृत्ति च अधिक आढळांत येते. लोकव्यवहार अर्थात् साध्या गद्यांत च होत असला पाहिजे. परंतु तो लेखनिविष्ट होण्याइतपत रसात्मक नसावा म्हणून पद्याचें, काव्याचें म्हणा, एकछत्री साम्राज्य च पूर्वकाळीं सर्वत्र पसरून राहिलेलें आढळतें. त्यायोगें पद्याच्या प्रचंड सावटीखालीं गद्य फोंफावून वाढलें नाहीं. शिवाय महाराष्ट्रांतील लोकव्यवहाराचें क्षेत्र हि यादव-साम्राज्य लयाला गेल्यावर फार च संकुचित झालें असावें. दक्षिण भारतांत यावनी अम्मल खिलजी बादशहांनीं प्रस्थापित केला व पुढें तुघ्लखशाहींत तर देव-गिरिस जुना महंमद राजधानी च करून बसला ! पुढें ब्राह्मणी पातशाही सुरू झाली व नंतर ती पंचधा फुटून अदिलशाही, निजामशाही, बेरीदशाही, इमादशाही व कुतुबशाही अशी विलगली. मराठी सत्ता पार दडपून गेली. फक्त संतमंडळींनीं वैराग्याचा धगधगीत अग्नि पेटवून धर्मबुद्धि जागृत केली. हें महत्कार्य त्यांनीं मायभाषेच्या आश्रयानें केलें, कारण मायभाषेशिवाय खराखुरा पोटउकाला होत नाहीं व तो

तसा झाल्याविना राष्ट्राचें हृदय हलून त्याचें अंतःसामर्थ्य प्रकट होत नाहीं. लोकव्यवहाराचा बहुतेक प्रांत यवनाक्रांत झाल्यावर हि धर्मरक्षणार्थ 'आटी' करणाऱ्या संतमहंतांनीं 'मराठी बोला'चें अमृत वर्षून मराठी घरांचें, भाषेचें व राष्ट्राचें परिरक्षण केलें ! तें च तें आम्हा मराठ्यांचें अलौकिक पद्यसारस्वत !

हें पद्यसारस्वत मुखानें स्रवत असतां तें घोटण्यासाठीं जें गद्य बाहेर पडलें असेल त्याला आपण कायमचे मुकलों आहों ! त्या काळांत संतमहंतांचा व त्यांच्या प्रेमळ भक्तांचा मेळा व कुलीन मराठ्यांचीं सैंपाकघरें सोडलीं म्हणजे ऊर्वरित समाजांपैकीं कित्येक पातशाही मनसबदारींत शिरून तेथला इस्लामी वेष चढवून वावरतांना दिसतात, तर दुसरे ग्रामाधिकारी वगैरे यांनीं यावनी शब्द व्यवहारांत घुसडून मुसलमानी मराठी प्रचलित करून सांधेजोड केलेला दिसतो. त्या वेळचें एवढें च आणि असलें च गद्यलिखाण थोडथोडें अलीकडे उपलब्ध होत आहे. पण याला वाङ्मय म्हटलें तरी हें सारस्वत मात्र नव्हे ! यादवांच्या राजवटींत श्रीकरणाधिप हेमाद्रिपंडित • या व्युत्पन्न पुरुषानें कांहीं मराठी सारस्वत निर्माण केलें असावें असें म्हणण्यास आधार आहे. किंबहुना तसलें कांहीं सारस्वत आपणांपुढें कोठें कोठें उभें राहतें; तरी त्याचा * सांप्रतचा वेष पाहिला तर तो 'हेमाडपंती' दिसत नाहीं, म्हणून मनाचा संशय साफ उडून जात नाहीं. तथापि हेमाडपंतांस प्राचीन मराठी गद्याचे आद्याचार्य समजून चालण्यास तूर्त प्रत्यवाय नाहीं. चामुंडरायादींचे शिलालेख इत्यादि किरकोळ गद्य लिखाण व हेमांडपंत सोडले तर, पुढें 'पंचतंत्र' * भावेकृत महाराष्ट्र सारस्वत पृ. ८४ पहा. भेटतें. याचें रंगरूप बाळसेदार असून तें नाथांच्या पूर्वींचें निभ्रांत दिसतें व तूर्त तरी हा च **पहिला मराठी गद्य ग्रंथ** आपणांस सांपडलासें समजून चालावयास हरकत नाहीं. यांतील भाषा मोठी सोपी व मनोहर वाटते. पंचतंत्र जर रचलें गेलें तर तसले च दुसरे समकालीन ग्रंथ मराठींत झाले असले पाहिजेत असें अनुमान सहज संभवतें. श्री. एकनाथानंतर पंधरा वर्षांनीं पाद्री इस्तीवाँ (Father Thomas Stephens) यानें साष्टी प्रांतीं 'ब्राह्मण मरास्ट्री' भाषेंत 'पैलें व दुसरें पुराण' हीं काव्यें रचून पूर्ण केलीं ( १५३६ शके इ. स. १६१४ ). पाद्री इस्तेवाँचे हि आधीं फादर

---

* टीपः— मजजवळ एक लेखी हेमाडपंती नीति आहे.

आलमेडा यानें लॉरेन्स महात्म्य म्हणून गद्यांत लिहिलें होतें, तें पहाण्यांत नाहीं. इस्तीवॉनें आपल्या मराठी काव्यास गद्यांत प्रस्तावना लिहिली आहे. इस्तीवॉं चाळीस वर्षे ( इ. स. १५७९–१६१९ ) हिंदुस्थानांत होता व तो सत्तर वर्षांचा होऊन वारला. कोंकणी (म्हणजे जिला तो बामनमरास्टी म्हणतो ती ) भाषेचें व्याकरण हि इस्तीवॉनें केलें आहे. इस्तीवॉंचा उद्योग पहातां मोठा च विस्मय वाटतो! या काळचें मराठी गद्य जरी विशेष उपलब्ध नाहीं तरी भाषेंत त्याचा प्रचार सडकून असला पाहिजे. कारण श्रीसमर्थांनीं आपल्या ग्रंथांत पद्याबरोबर च गद्याचा उल्लेख [कवित्वें गद्यपद्याचीं ( श्री. स. क. पृ. ४१० ) गद्यपद्यें बहुविधें (पृ. ३८२ सदर) ] जागोजाग केला आहे. पूर्वी दडपलेले मराठे या काळांत पुढें सरसावत होते. शहाजी 'महाराज' पदवी पावून निजामशाहीचीं सूत्रें धडाडीनें हालवीत होता; भावी स्वराज्याच्या अरुणोदयाचीं सुखद स्वप्नें लोकांना पडत होतीं. लोकव्यवहार पुनरपि लोकाधीन होऊं लागला तों तों सारस्वताला तेज चढत चाललें व मुक्तेश्वरसमर्थादिकांचे गंभीर व भेदक बोल आपला प्रभाव दाखवूं लागले. या काळचें व्यावहारिक गद्यवाङ्मय हातीं लागत चाललें आहे, परंतु सारस्वतांत मोडेल असें कांहीं उपलब्ध झालें नाहीं. तथापि या व्यावहारिक वाङ्मयाची चिकित्सा करून त्याचें पूर्वीचें फारसी किंवा यावनी स्वरूप पालटून तें शुद्ध मराठी कसें होत चालल्याचें स्पष्ट दिसतें तें सुप्रसिद्ध इतिहासाचार्य रा. राजवाडे यांनीं विस्तारानें सिद्ध केलें आहे ( म. इ. सा. खंड ८ प्रस्तावना पहा. ).

श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या आगेंमागें चक्रधराचा मानभावी पंथ महाराष्ट्रांत जोरावत होता. या पंथाचें वाङ्मय गुप्तसंकेतांच्या दुर्भेद्य संदुकांत दडून बसलें होतें. परंतु रा. राजवाडे यांनीं अलौकिक बुद्धीची किल्ली लावून हे संकेत फोडले, तेव्हांपासून मानभावी वाङ्मयाचा आपणांस परिचय होऊं लागला. या पंथाच्या वाङ्मयांत कित्येक उत्कृष्ट गद्यग्रंथ हि आहेत. लीळासंवाद हा अशांपैकीं च एक ग्रंथ होय. तो प्रसिद्ध होईल त्या वेळीं प्राचीन मराठी गद्यवाङ्मयांत फार अलौकिक भर पडेल. 'श्रीचक्रधराची दिनचर्या' रा. राजवाडे यांनीं भा. इ. सं. मंडळामार्फत प्रसिद्ध केली आहे. ती किंवा आमचे मित्र रा. आबा चांदोरकर यांनीं त्या च मंडळामार्फत प्रसिद्ध केलेलीं मानभावी सूत्रपाठादि इतर गद्य प्रकरणें वाचलीं म्हणजे या मानभावी वाङ्मयाची अपूर्वता प्रत्ययास येते. एखाद

दुसरा आदिलशाही किंवा निजामशाही मराठी कागद जरी अलीकडे उपलब्ध होऊं लागला आहे, तथापि श्रीज्ञानेश्वरादिकांचे वेळचे कांहीं च व्यवहार कागदोपत्रीं पुढं येत नाहींत! बीड पैठण इ. प्रांतीं कसून शोध होईल तर कांहीं तरी साधनें मिळाल्याखेरीज राहणार नाहींत.

पंचतंत्र व मानभावी ग्रंथ यांची भाषा पाहिली तर तिचा मुख्य विशेष असा आढळतो कीं—

( १ ) तींत वाक्यें लहानलहान, सुटसुटीत व साधीं आहेत. यामुळें क्रियावाचक पदें त्यांत फार येतात.

( २ ) हिचें स्वरूप शुद्ध मराठी आहे. यावनी शब्दांची भेसळ नाहीं. संस्कृत शब्द हि थोडके च आहेत.

परंतु श्रीएकनाथांचे कालापासून ( एकनाथी अर्जदास्त एकवार पहाण्यासारखी आहे ) महाराष्ट्रावर मुसलमानी अमलाची दाट छाया पसरली असल्यामुळें वाङ्मयावर त्याचा परिणाम सहजीं च झाला. दरबारी मुत्सद्दी किंवा कारकुनपेशा मंडळीच्या व्यवहारांत फारसी प्रबळ झाली व त्यामुळें मराठीचा संचार फक्त सामान्य लोकानांच धरून होऊं लागला. या च सामान्य लोकांत महाराष्ट्रीय संतकवींनीं आपल्या वीर्यवती वाणीचा अद्भुत विलास प्रगट केला व त्यांचीं हृदयें भरुन व भारून टाकिलीं! आणि असें अवीट आणि अक्षय्य, पवित्र आणि प्रखर वाङ्मय निर्माण केलें कीं, सारें भूमंडळ डोलूं लागावें! ज्ञानेश्वरांनीं उभारलेली गुढी परचक्राच्या वावटळींत अदृश्य होते कीं काय अशी धास्ती पडली होती. तिला नाथांनीं सोडवून तिची प्रभा सर्वत्र फांकेलसें केलें! नाथांचे नातू मुक्तेश्वर यांची निर्मळ वाग्गंगा धोंधों वाहूं लागली. तिच्या त्या प्रचंड निनादानें भगीरथाबरोबर खालीं येतांना तिचा जो मूळचा आवेश तो च जणूं सर्वांच्या कानांत घुमूं लागला. हा च आवेश आर्यापति मोरोपंतांपर्यंत प्रज्वलित राहिला. पंतांनीं ' तसि हे मयूर नाहीं तरि लोकांना न दीसती आर्या ' असें म्हणून डंका गाजविला हि!

एकीकडे वागीश्वर आपल्या सरस्वतीचे अमृतालाप काढीत होते तों च दुसरीकडे श्रीशिवाजीबाजी आपल्या रणडिंडिमाच्या घनगर्जितानें महाराष्ट्र दणाणून टाकीत होते! असो!

संतकवींच्या वाणीचा लय पद्यांत च लागून गेला! तथापि गद्याला हि बाळसें चढल्यावांचून याकाळांत राहिलें नाहीं. कृष्णाजी अनंत सभासदासारखे "पुरातन माहितगार" यांनीं शिवाजी महाराजांसारख्या पुण्य पुरुषांनीं "आदलशाई, कुतुबशाई, निजामशाई, मोंगलाई ह्या चारी पातशाहा व समुद्रांतील बेवीस पातशाहा असे जेरजप्त करून नवें च राज्य साधून" "मराठा पातशाहा सिंहासनाधीश छत्रपति" अशी कीर्ति मिळवून "ये जातीचा कोणी मागें जहाला नाहीं पुढें ही होणार नाहीं" असें सर्वमुखें कसें वदवून घेतलें त्याची सरळ, बिनपाल्हाळिक बखर आपल्या देश-बांधवांस सादर केली व तिच्या लेखकपाठकांस फलश्रुति ही सांगितली कीं "... अपेशी यांस यशवंत होतील ...... यशस्वी असतील ते दिग्विजयी होतील!" जिला नव्वद कलमी म्हणतात ती वाकेनिशी बखर ही याच वेळची आहे. श्रीसमर्थांच्या हि बखरी अशा च बऱ्या च त्या वेळीं झाल्या असाव्या. राक्षसतागडीची बखर म्हणून विजयानगरच्या साम्राज्याचा विध्वंस वर्णन करणारी जी बखर कै. नानासाहेब चांदोरकर यांनीं छापिली तीवरून तर अशा बखरी या वेळीं आणखी असाव्यात असें दिसतें. कै. बाळ गंगाधर टिळक यांना मिळालेली जेधे शकावली एकदृष्टीनें या च सदरांत जमा धरण्यास चिंता नाहीं. श्रीशिवाजीमहाराज व मोरो त्रिमळ, बाळाजी आवजी, रामचंद्र अमात्य, पंताजी सिवदेव, महादेव मतिमत्प्रधान, पालकर, दहातोंडे, पासलकर, कंक इत्यादि मुत्सद्दी व वीर मंडळी यांचा पत्रव्यवहार पुष्कळ च असला पाहिजे. जो थोडाथोडका आज उपलब्ध आहे त्यावरून त्यांत या वीर मुत्सद्यांनीं आपलीं अंतःकरणें ओतप्रोत ओतलीं असलीं पाहिजेत अशी च अटकळ बांधतां येते. गद्यांत, पद्यांत, घरांत, रणांत सर्वत्र अपार धीरोदात्तता उचंबळलेली दिसते. ह्या काळांतील ओजस्वी गद्य लवकर हातीं लागावें अशा तळमळीनें चित्त वारंवार संकुल होतें।

थोरल्या आबासाहेबांनीं जो स्वराज्यवृक्ष लावला तो पुढें एक शतक सव्वा शतक पावेतों चांगला च फोंफावला. महाराष्ट्राचें महत्तरराष्ट्र या काळांत झालें. सर्वत्र महाराष्ट्राचा वचक व दरारा 'न भूतो' ... बसला! त्या काळांतील बाळाजीपंत नाना, बाजीराव, नानासाहेब, माधवराव, हरिपंत तात्या, पटवर्धन मंडळी, भाऊसाहेब, चिमाजीआप्पा, हिंगणे, नाना फडणवीस, माणकेश्वर, विंचूरकर, शिंदे, होळकर, दाभाडे, जाधव, आंगरे, भोसले, धायगुडे, रास्ते, गायकवाड, बिवलकर, घोरपडे, कानडे, रघुनाथराव दादा, गोपिकाबाई, अहिल्याबाई, आनंदीबाई, गंगाधर

यशवंत, जिवबादादा, पानसे इ. इ. शेंकडों वीर मुत्सद्यांचीं हजारों पत्रें मिळालीं असून त्यांचे पांचपंचवीस खंड छापून प्रसिद्ध आहेत. तीं वाचून पाहतां फारसी भाषा पोटीं पचवून पुनरपि संस्कृताभिमुख होऊन आमचे वीरमुत्सद्दी कशी डौलदार, घाटदार, ऐटबाज व 'राजश्रियाविराजित राजमान्य' भाषा बोलूं लिहूं लागले होते त्याचा ठसठशीत प्रत्यय येतो.

स्वराज्याचें साम्राज्य झालें ! व्यवहार अफाट झाला. ' राजकारणें ' दाही दिशाला खेळूं लागलीं ! त्यामुळें वाणीला वैभवाचें तेज चढलें ! तिला विलासाची ही चटक लागली व ती अधिक नटवी, लज्जतदार व प्रौढ झाली. नानासाहेब पेशवे, चिमाजीआप्पा, नाना फडणीस इत्यादिकांचीं पत्रें, खलिते वगैरे वाचतांना युरोपियन मुत्सद्यांच्या डिस्पॅचेसची आठवण होते. पूर्वीचीं तीं लहान लहान साधीं, सोपीं, वाक्यें व शुद्ध मराठी वळणाचे शब्द जाऊन, प्रौढ संस्कृतसमास व लांबलचक व घोंसदार वाक्यरचना त्या जागीं आली. व्याकरणाचा बांधेसूदपणा येण्याला यांत कोठें च अवकाश नव्हता. कारण हे वीरमुत्सद्दी परस्परांचीं मनोगतें एकमेकांस कळविण्यासाठीं च लिहीत होते; वाङ्मयसेवा करण्यासाठीं कांहीं प्रवृत्त झाले नव्हते. सरस्वतीचे उपासक अद्याप छंदांच्या बहारदारींत च गर्क होते. श्रीज्ञानेश्वरप्रभृतींनीं जो वीणा एकदा झाडला त्याचा च आवाज अजून त्यांच्या कर्णरंध्रांत घुमत होता व त्या च समाधींत ते डोलत होते. बाहेर मराठी घोडा चौफेर दौडत होता व तोफांचा गडगडाट होऊन दशदिशा धुंद होत होत्या, तरी भारतभागवतांतल्या त्या दिव्य पुरुषांना च आमची कविमंडळी पुनः पुनः आग्रहानें आंवतणें देत होतीं व त्या च दिव्य कथा गाईल्या तरी 'पुनः गावें ची ऐसें करी' म्हणून देवाला काकुळतीनें संबोधीत होतीं. ' निरंकुश' कवींना व्याकरणाचा अंकुश कोण चालविणार? त्या वेळचें शिक्षण पाहिलें तर लिहिणें वाचणें व हिशेबठिशेब यांपलीकडे फारसें अवडंबराचें नव्हतें. संस्कृताचा अभ्यास मात्र वैदिक व शास्त्रीमंडळांत होत असे. ही शास्त्री मंडळी तेवढी व्याकरण पढत असत. संस्कृत व्याकरण पढल्यावर देशी भाषेचें म्हणून निराळें व्याकरण पढण्याचा प्रघात नव्हता व त्याचें तादृश प्रयोजन हि नव्हतें. मजजवळील एका जुन्या बाडांत कांहीं संस्कृत प्रयोग देऊन त्यावरून मराठीची व्याकरणपद्धति शिकविण्यासारखी थोडीशी तांत्रिक व त्रोटक बनविलेली दिसली त्यावरून तसे प्रयत्न थोडथोडे कामापुरते होत असावे. तंजावरच्या सरस्वतीमहालांत मराठी भाषेचें एक संस्कृत

व्याकरण असल्याचें नमूद आहे. विद्येकडे तंजावरच्या मराठी राजवंशाचें चांगलं च लक्ष्य असे. सरस्वती-महालांत तेथील विद्याभिलाषी राजांनीं उत्तमोत्तम मराठी, संस्कृत, इंग्रजी, तामील वगैरे भाषांतील नामांकित ग्रंथांचा अमूल्य संग्रह करून ठेविलेला अद्यापिही अपूर्व च आहे. या तंजावरी राजांपैकीं एकानें लक्ष्मीनारायण कल्याण नाटक म्हणून एक छोटें नाटक रचून किंवा रचवून ठेविलेलें सुप्रसिद्ध संशोधकाचार्य राजवाडे यांनीं ग्रंथमालेंत छापलेलें आहे. हें च **मराठींतील पहिलें नाटक** म्हणावयाचें. तसेंच सरफोजी राजे हे इंग्रजींत उत्तम निष्णात असल्याबद्दल उल्लेख आहेत. सुप्रसिद्ध नाना फडणीस यांनीं सवाई माधवराव यांच्यासाठीं नारायणव्यवहारशिक्षा नामक सुंदर नीतिग्रंथ रचविला होता तो राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेला आहे. उत्तरपेशवाईच्या काळांत च भारतभागवत या ग्रंथांचीं मराठी गद्यांत भाषांतरें तयार झालेलीं होतीं. कृष्णमहात्म्यासारखीं कित्येक पौराणिक प्रकरणें ही मराठींत उतरलेलीं आढळतात. हीं भाषांतरें प्राय: मोडींत उतरलीं व भारताची बखर, भागवताची बखर अशा नांवानीं संबोधलीं जात असत. अलीकडे भारतादि ग्रंथांचीं नवीन भाषांतरें करवून छापण्यांत आलेलीं आहेत. पन्नास साठ वर्षांपूर्वीं हि असा च प्रयत्न शिळाछापावर झालेला आढळतो. परंतु हीं जुनीं भाषांतरं कोणी च जमवून छापण्याचा उद्योग कां केला नाहीं समजत नाहीं. अद्यापि कोणी तरी हें काम केल्यास बरें पडेल. पौराणिक बखरीप्रमाणें च ऐतिहासिक बखरींचा शिलशिला यथापूर्व चालू च होता. कृष्णाजीशामराव कृत भाऊसाहेबांची बखर किंवा रघुनाथ यादवाची पानिपतची बखर ह्या तत्कालीन आहेत. यांची भाषापद्धति समकालीन पत्रव्यवहारांत आढळणाऱ्या भाषेसारखी च, किंबहुना त्यापेक्षांही अधिक रसाळ, प्रौढ व व रमणीय आहे. भाऊसाहेबांच्या बखरींतील युद्धाच्या ‘ तमाशा’चें वर्णन वाचतांना स्फुरण होत नाहीं किंवा पानिपतचा पळ वाचतांना गहिंवर येत नाहीं असा पाषाण कोणी आढळणार नाहीं. मराठी गद्याला या बखरकारानीं मोठी च श्रीमंती आणली आहे यांत संशय नाहीं.

जुन्या गद्य वाङ्मयाची याहून हि एक निराळी परंतु महत्वाची शाखा आतां सांगतों. आपल्याकडे अशी समजूत आहे कीं, आपला भगिनीवर्ग आपण अज्ञानांत ठेवला. हा समज सर्वांशीं यथार्थ नाहीं. जुन्या मराठी अमदानींत पुष्कळ स्त्रिया शिकत असत. गोपिकाबाई, राधाबाई, आनंदी-

बाई वगैरे स्त्रियांचीं तर अस्सल पत्रें च प्रसिद्ध झालेलीं आहेत. मातुश्री ताराऊसाहेब किंवा जिजाऊसाहेब यांचीं हि पत्रें—स्वलिखित नसलीं तरी—उपलब्ध आहेत. त्यावरून जरी त्यांस अक्षरविद्या अवगत नसली तरी त्या सुविद्य नव्हत्या असें म्हणतां येत नाहीं. या च स्त्रीवर्गानें जुन्याकाळीं आमच्या अनक्षर शाहीरां-प्रमाणेंच स्वयंस्फूर्तीनें देवादिकांचीं गोड गाणीं रचलेलीं अद्यापि हि पाठांत आहेत. तसें च उखाणे, म्हणी वगैरेंचा या वर्गानें निर्माण केलेला व जतन केलेला दांडगा संग्रह पाहिला म्हणजे त्यांच्या बुद्धिमत्तेचें व शहाणपणाचें फार कौतुक वाटतें. आम्ही विद्वत्तेच्या घमेंडींत राहून अद्यापि हि हा म्हणी–उखाण्यांचा बहुमोल संग्रह शोधपूर्वक करून त्याचें ऊर्जित करीत नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे. या च आमच्या स्त्रीवर्गांत 'कहाण्या' म्हणून गोष्टी प्रसिद्ध आहेत. हें कहाण्यांचें वाङ्मय मराठींत फार नामींपैकीं आहे. वाङ्मयदृष्टीनें अद्यापि कोणी हि तिकडे लक्ष्य पुरविल्याचें आढळलें नाहीं. कहाण्यांतील सोपी, सरळ, रसाळ व शुद्ध मराठी भाषा वाचून फार आनंद वाटतो. त्यांतील नीत्युपदेश फार च मार्मिक आहे. तेव्हां या नवीन शाखेचा हि समावेश प्राचीन मराठी गद्यांत अग्रेसरत्वानें करणें अगत्याचें आहे. मला तर कैक वेळा असें वाटतें कीं, या कहाण्या म्हणजे मराठी उपनिषदें च होत अशी यांची अव्याजमनोहरता व माधुरी अलौकिक आहे. नमुन्यासाठीं एक च लहानी कहाणी देतों:—

## कहाणी धरित्रीची.

ऐका, परमेश्वरा! धरित्रीमाय! तुझी कहाणी. आटपाट नगर होतं; नगरांत एक ब्राह्मण होता. त्या ब्राह्मणाची स्त्री काय करी? धरित्रीमायेचें चिंतन करी, वंदन करी, "धरित्रीमाय, तूं च थोर, तूं च समर्थ; कांकणलेल्या लेकी दे, मुसळकांड्या दासी दे, नारायणासारखे पांच पुत्र दे, दोघी कन्या दे; कुसुंबीच्या फुलासारखं स्थळ दे." हा वसा कधीं घ्यावा? आखाड्या दशमीस घ्यावा, कार्तिक्या दशमीस संपूर्ण करावा; किंवा श्रावणी तृतीयेला घ्यावा, माघी तृतीयेला संपूर्ण करावा. सहा रेघांचा चंद्र काढावा, सहा रेघांचा सूर्य काढावा, सहा गाईचीं पावलें काढावीं व त्यांची रोज पूजा करावी. संपूर्णाला काय करावं? वाढाघरची सून जेऊं सांगावी; कोरा करा, पांढरा दोरा, चोळीपोळीचं वाण द्यावं; आणि आपल्या वशाचं उद्यापन करावं. ही धरित्रीमायेची कहाणी साठा

उत्तरांची पांचा उत्तरी सुफळ संपूर्ण ! ! हें वाचतांना ( वैयक्त कहाण्या, भाग १ ला, पृ. ३३, निर्णयसागर. )

किती गोड भाषा ! केवढा साधेपणा ! पृथ्वीपूजेची कल्पना केवढी उदात्त! भूमातेच्या सेवेचें पथ्य बाळकडू ! ! हें वाचून अथर्वातल्या पृथ्वीसूक्ताची आठवण कां होऊं नये ?

या कहाणींतील शब्दांचीं रूपें अर्वाचीनलेलीं आहेत यांत संशय नाहीं. या कहाण्या जुन्या आहेत, परंपरेनें आपल्या देवघरांतून, माजघरांतून, शेजघरांतून व सैंपाकघरांतून स्वच्छंदपणें वावरलेल्या आहेत ! त्यांचा वेष जरी आपल्या सहवासानें बदलला असला तरी त्यांच्या शब्दरूपांच्या आंतून जिव्हाळ्याचा शुद्ध मधुर ' शब्द ' कानीं येतो व तें त्यांचें अंतस्वरूप पाहतां हें ' जुनें ठेवणें ' असून ' मी'पणानें आपणांस आकळलें नाहीं असें निभ्रांत मनांत येतें.

* एकंदरींत पाहतां शके १७३९ ( १८१७ इ. स. ) त पेशवाईची समाप्ति होईपावेतोंच्या स्वराज्यअमदानींत मराठी गद्याचा जो स्वरूपाविष्कार दिसतो तो जरी नीटस, रेखींव किंवा घोंटीव नाहीं, तथापि आहे तो जोरकस, भरदार, रसदार व इभ्रतदार असा च आहे असें कोणास हि अवलोकनांतीं कळून येईल; आणि स्वराज्य-वृक्षाच्या शीतल छायेखालीं तो आराम करीत असतां त्या वृक्षावर च वीज कडाडून तो वृक्ष च जर खाक न होता तर त्याचा डौल अधिक वाढून त्याचें तेज सर्वत्र पसरून तुम्हाआम्हांस सुखवीत राहिलें असतें. स्वराज्य-गंगा एकदम आटली त्याबरोबर तिच्या च तळांतून वाहणारा मराठी वाक्प्रवाह एकदम गुप्त झाल्यासारखा झाला. स्वराज्याच्या सुखद व निर्भय वातावरणांत सरस्वतीचा वीणा छेडीत बसलेल्या कविमंडळाच्या मांडीवरील ती वीणा हि या

---

* मल्हार रामरावकृत चिटणीसी बखर ऊर्फ श्रीशिवाजी महाराज यांचें सप्तप्रकर्णात्मक चरित्र हें इ. स. १८१० त त्यांनीं रचलें व श्रीहनुमंतस्वामीकृत रामदास स्वामींची बखर ही प्रथम शके १७१५ व मागाहून मल्हार रामरावांचे आग्रहावरून वाढवून शके १७४० त तयार झाली. अर्थात् इ. स. १८१७।१८ त च ही बखर तयार झाली. परंतु स्वराज्य-लोपांत ती हि तेव्हां गडप झाली. ( श्री. सां. वि. विषय, धुळें, खंड १ ला, पृ. ११२ पहा. )

धामधुमींत कोणी पळविली कीं काय कोण जाणे ! जिकडे तिकडे सामसूम झालें ! सरस्वतीच्या वीणेवरचे कवींचे ते मधुरालाप, ते मराठी सेनेंतील तोफांचे दणदणाट व घोड्यांचे थयथयाट व शस्त्रास्त्रांचे खणखणाट स्तब्ध झाले, ते खलबतखाने, धुसळखाने सारे ओस पडले, राष्ट्रावर प्रेतकळा चढली, शनवार वाड्यावर ' देखत देखत, फिरंगी बाहुटा लागला, आणि अल्पिष्टनसाहेबांकडे कुलमुखत्यारी आली ! महाराष्ट्रांत असा महापरिवर्त झाला ! !

---

# प्रकरण २ रें.

## छत्रे आणि मंडळी.

## ( इ. स. १८१०–१८३६ ).

अल्पिष्टनसाहेबांची अमदानी सुरू होण्यापूर्वी ढाकाबंगाला प्रांतांत एक मोठें आंदोलन सुरू झालें होतें. त्याचें मुख्य ठिकाण श्रीरामपुर (Serampore) हें होय. येथें क्रिस्ती मिशनरी मंडळींनीं निशाण रोंवून आपला उद्योग जारीनें चालविला होता. या उद्योगाचें मराठी वगैरे देशीभाषांचीं कोशव्याकरणें तयार करून प्रसिद्ध करणें हें एक प्रमुख अंग होतें. डॉ. वुइलियम् कॅरे ( D. William Carey ) हा मिशनरी पंडित या मंडळींत अग्रेसर होता. ज्यासालीं प्रख्यात प्राच्य विद्या विशारद सर विल्यम् जोन्स्—ज्यानें बंगाल्यांत सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधीशाचें काम परकरून फुरसतीच्या वेळांत आरबी, संस्कृत इ. भाषांचें ज्ञान नव्हतें तें संपादून व होतें तें वाढवून कलकत्यास एशियाटिक सोसायटीची स्थापना केली व शाकुंतल, हितोपदेश इत्यादिकांचीं भाषांतरें इंग्रजींत प्रसिद्ध केलीं तो—हिंदुस्थानांत वारला त्या च सालीं क्यारे शुभवर्तमानाचे प्रसारासाठीं हिंदुस्थानांत उतरला. सन १८०१ मध्यें हा उद्योगी पंडित कलकत्यास संस्कृताचा प्रोफेसर झाला. जोन्स्, क्यारे, वुइल्सन्, इ. पाश्चिमात्य पंडितांचे वृत्तांत वाचतांना ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे कीं, त्यांनीं केवढी प्रबळ जिज्ञासा प्रगट करून परदेशांत जन्म काढून परभाषा अंकित करून घेतल्या ! तेच आमचे तत्कालीन

पंडित पाहिले व त्यांचा तो 'न वदेत्यावनीं भाषां प्राणैः कण्ठगतैरपि ' असला दुराग्रह व त्याचें विपरीत पर्यवसान पाहिलें म्हणजे मोठा विस्मय व खेद वाटतो. पाद्रीइस्तीवॉ घ्या किंवा क्यारे घ्या, यांचा दीर्घोद्योग व जिज्ञासा यांत च त्यांच्या देशाच्या ऊर्जिताचें बीज आहे व आमच्या कूपमंडूकवृत्तींत आमचा नाश लिहि-लेला आहे यांत संशय नाहीं. वास्तविक स्टेफेन्स्, क्यारे यांना म्हणजे कसला च दुराग्रह नसेल असें नाहीं. परंतु जबर महत्वाकांक्षा व दुर्दम जिज्ञासा यांच्यायोगें त्यांचे दोष त्यांस तेवढे बाधक झाले नाहींत. असो. डॉ. क्यारे यानें इ. स. १८१० मध्यें श्रीरामपुर येथें मराठी-इंग्रजी कोश छापून प्रसिद्ध केला. या कामीं त्यांस विद्यानाथ नामें देशी पंडिताचें—the chief Maratha Pundit in the college of Fort William—साहाय्य झालें. या अत्यंत दुर्मिळ ग्रंथाची एक प्रत मुंबईमराठीग्रंथसंग्रहालयांत दर्शनीय पुस्तकांत ठेविलेली आहे.

मुखपृष्ठावर क्यारे यास मराठी व बंगालीचा प्रोफेसर असें म्हटलें आहे. या ग्रंथांत मराठी शब्द **मोडी ठसे** करून छापले आहेत. इंग्रजी प्रस्तावनेंत डॉ. क्यारे यांनीं युरोपियन विद्वानांस इकडील देशी भाषा व त्यांना आधारभूत संस्कृत भाषा यांचें महत्व वर्णिलें आहे. एकंदर ग्रंथ साधारण डेमी आकाराचीं ६५२ पृष्ठें आहे. एक शब्दाचा नमुना देतोंः—

राज्यनीति The constitution of a Kingdom.

सन १८१४ मध्यें सिंहासनबत्तिशी "मोडींत रामपुरीं छापा झाली." हिजवर "वैजनाथशर्मणा क्रियते" असा शेरा आहे. हा वैजनाथशर्मा म्हणजे च विद्यानाथ-मागें क्यारेचा मराठी पंडित सांगितला तो—असावा.

'रघूजी भोसल्याची वंशावळी' नांवाचा एक डेमी १०३ पृष्ठांचा मोडी ठशांनीं छापलेला बखरवजा ग्रंथ भा. इ. सं. मंडळांत आहे. त्याचीं मलपृष्ठें नाहींत. मलपृष्ठें असलेली सदरची एक प्रत कै. बाळ गंगाधर ठिळक यांनीं प्रेसओनर्स असो-सिएशनचा क्लास उघडला त्या दिवशीं दाखविली होती. त्यावरून सदर पुस्तक श्रीरामपुरास च मुद्रित झालें व तें या च सुमारचें असावें असें स्मरणांत आहे.

या च सुमाराचा म्हणजे १८१० मध्यें छापलेला **गीताभावचंद्रिका** (कृष्णार्जुनसंवाद) नांवाचा एक दुर्मिळ ग्रंथ मुं. म. ग्रं. सं. त आहे. हा रामचंद्र-

शास्त्री मुंडले यांचे साह्यानें बाळजी सुंदरजी* यार्णी करून गणपत कृष्णाजीकडे छापला. यांत गीतेचा सरळ गद्यांत अर्थ दिला आहे. उदा० यत्र योगेश्वरः कृष्णः इ० = " जेथें योगेश्वर कृष्ण, जेथें धनुर्धर पार्थ, तेथें श्री, विजय, ऐश्वर्य आणि सुनीति राहतात अशी माझी मति होय" या भाषांतरांत बारकावा कांहीं च दिसत नाहीं. तथापि आज छापील मराठी ग्रंथांत हा च बाळजीचा ग्रंथ जुना समजला पाहिजे. छापण्याची कला हळुहळू मुंबईत पसरत चालली होती. गणपत कृष्णाजीचा छापखाना हा अत्यंत जुना व सर्वप्रसिद्ध असून नुकता च कांहीं वर्षांपूर्वी बुडाला. या छापखान्यांतून शेंकडों मराठी ग्रंथ बाहेर पडले. विलायतेंत वर्तमानपत्रें छापखाने यांच्या परंपरा अविच्छिन्न कैक शतकें चालतात तसें आमच्या इकडे होऊं लागेल तो सुदिन !§

अशा प्रकारें मराठी भाषेंत हळुहळू ग्रंथ प्रसिद्ध होत चालले होते. इतक्यांत अल्फिष्टनची कारकीर्द सुरू झाली. अल्फिस्टन बाजीरावसाहेबांचे अमदानींत च पुण्यास रेसिडेंट म्हणून आला होता. त्याची तडफ, हुषारी व नेकजादी पाहून मुंबई इलाख्याची सुभेदारी ( Governorship ) त्यास च बहाल करण्यांत आली. सन १८२० ते १८२७ हीं सात वर्षें महाराष्ट्र देशाच्या इतिहासांत फारच क्रांतिकारक गणलीं पाहिजेत. नव्या इंग्रजी मनूच्या सुरवातीचीं हीं वर्षें होतीं. अशा वेळीं मौंटस्टयुअर्ट एल्फिन्स्टनसारख्याची जोड या इलाख्यास झाली, त्यामुळें इंग्रजी साम्राज्यास फार फायदा झाला. हा अल्फिस्टन जसा दीर्घव्यासंगी तसा च थोर मनाचा पुरुष होता. किंबहुना विलायतेंत या वेळेस कॅनिंग-ग्रे-रेसेलप्रभृति प्रागतिक व उदार राजकारणी पुरुषांची छाप विलक्षण पडली होती व तिचेंच प्रतिबिंब हिंदुस्थानांतल्या अल्फिस्टन–मनरो–बेंटिंकप्रभृति इंग्रजी मुत्सद्यांवर पडलें होतें. कै. रमेशचंद्र दत्त म्हणतातः—

" The same moving force determined events in both countries ; the extension of privileges to

---

* " बाळाजी सुंदरजी परभू " ते च हे असतील तर दादोबांचे आत्मचरित्रावरून ( पृ. १८ ) इ. स. १८१० त यांनी ग्रंथ करणें संभवत नाहीं. मग १८१० हा सन म्यां चुकीचा उतरला कीं काय असा संदेह मनांत येतो—

§ इ. स. १८२३ त एक मराठी गद्य विदुरनीति " मुंबई नगरीं कुरिअर छापखान्यांत " मुद्रित झाली. ती मुं. म. ग्रं. सं. त आहे.

the people of India during this period is the counterpart of the Reform Act in England; and Munro. Elphinstone and Bentinck were inspired by the same refoming spirit and the same desire to benefit humanity as Canning Grey and Lord John Russell" (England & India p. 39)

मुंबई इलाख्यांत इंग्रजी राज्य बद्धमूल करण्यासाठीं लोकांचे पोटांत शिरून त्यांचे ठायीं त्याबद्दल माया उत्पन्न करण्याचें काम एल्फिन्स्टनसाहेबाप्रमाणें कोणी हि क्वचित्च केलें असेल. स्वतः ग्रीक-लॅटिन तसेंच फारसी इत्यादि भाषांचें अल्पि-स्टनसाहेबांचें ज्ञान चांगल्यापैकीं असून तो विद्येचा खरा भोक्ता होता. हिंदुस्थानाला विद्यादान करणें आपलें श्रेष्ठ कर्तव्य होय व हिंदुस्थानची सुधारणूक व्हावयाची असेल तर त्यास एक व एक च उपाय शिक्षण असा त्याचा ठाम सिद्धांत होता. तो एके ठिकाणीं लिहितोः—"There is but one remedy for all this which is education" (Cotton's Elphinstone, Rulers of India, p. 194) शिक्षणानें हिंदी लोकांचे डोळे उघडले म्हणजे त्यांची महत्वाकांक्षा जागृत येऊन ते या विद्यासंजीवनीच्या सामर्थ्यानें ब्रिटिश साम्राज्याचें कदाचित् पोट फाडून हि बाहेर येतील, अशी भीति पुष्कळ इंग्रजी साम्राज्यभक्तांस तेव्हां हि वाटे. परंतु एल्फिन्स्टन म्हणे कीं, प्रेमानें व न्यायानें जर आपण वागूं तर आपल्या फारखती हि गोडींत व सख्यांत होतील. फारखत ही झाली च पाहिजे व ती पोट फाडून होण्यापेक्षां सख्यानें घडेल असें च आपल्या राजनीतीचें धोरण असलें पाहिजे.* या आत्यंतिक उदार धोरणाप्रमाणें एल्फिस्टनसाहेबानें आपलें धोरण ठेविलें हें त्यांस ‡भूषणावह होय. या धोरणाचें एक

---

* "A time of separation must come and it is for our interest to have an early separation from a civilized people, rather than a violent rupture with a barbarous nation" (Elph. R. pp. 186).

‡ एकदा ले. ब्रिग्ज हे एल्फिस्टनच्या भेटीस आले असतां भोंवतालीं पडलेला नवीन छापलेल्या मराठी पुस्तकांचा भारा पाहून विस्मित झाले. "हें

फळ म्हणजे ' बाँबे नेटिव्ह एजुकेशन सोसायटी ' या प्रसिद्ध संस्थेची स्थापना हें होय. ही संस्था ता. २१ आगस्ट सन १८२२ रोजीं मुंबईस स्थापन झाली. विद्यादानाचा हा च पहिला संघटित प्रयत्न महाराष्ट्रांत इंग्रजी अमदानींत झाला. या " सोसैटी "ला ५,००० पौंडांची सरकारी मदत त्यानें देवविली, यांतून बक्षिसें यावीं व नवीं पुस्तकें छापावीं असा हेतु होता. या प्रयत्नांचा थोडा इतिहास ऑकेजनल रिपोर्ट नं. २ पृ. २४ वर मे. काव्हन्र्टन यांनीं दिला आहे. तो येणेंप्रमाणें:—

" A real step in advance was taken when in 1820, " The Native school Book and school society, A came in to existence as a branch of the Bombay Education Society. In 1822 the former society separated itself from the latter and in 1827 changed its title to "the Bombay Native Education Society" which remained until 1840 when the Society's Schools were incorporated with those attached to the Elphinstone institution (स्थापना १८२८ ) and came under the supervision of the new Board of Education. "

मराठींत पुस्तकें मुळीं च नव्हतीं व जीं होतीं म्हणून मागें सांगितलें त्यांची माहिती हि कोणास फारशी असावीसें दिसत नाहीं. किंबहुना तो वाङ्मयप्रवाह लुप्त झाला व सर्व मंडळी इंग्रजीच्या नव्या अवताराच्या झळाळीनें दिपून गेलीं ! त्यांतून गणितादि शास्त्रें किंवा व्याकरणकोश यांसारखीं पुस्तकें सुद्धां मराठींत नाहींत, तेव्हां संन्याशाच्या मुंजीला शेंडीपासून तयारी पाहिजे, यासाठीं ती खटपट

---

कशाला? " म्हणून त्यांनी पृच्छा केली. " To educate the natives but it is our high road back to Europe " !! असें तो उदार पुरुष उद्गारला! परंतु सावध इंग्रजी राज्यकर्ते यांनीं लवकरच उमजून ती पाळी अद्यापि येऊं दिली नाहीं ! ( Speeches and Writings of Sir P. M. Mehta page 1 )

सुरू झाली. या खटपटीचें च फळ म्हणजे इंग्रजी अमदानींतले पहिले **मराठी गद्यग्रंथ** होत. असा हा महाराष्ट्रांतील विद्याप्रसार व ग्रंथोत्पत्ति यांचा अन्योन्याश्रय संबंध निकट आहे म्हणून च विद्याप्रसारकार्याची ठोकळ माहिती व धोरण वर दिलें आहे.

ने. स्कू. सो. चे पहिले 'सक्रतार' (Secretary) कॅपटन जॉर्ज जर्व्हिस हे होते. या गृहस्थांनीं सोसैटीचें काम बऱ्या तऱ्हेनें केलें असें दिसतें. जर्व्हिससाहेब या कामावर एकसारखे सात वर्षे होते. मग त्यांची पुण्यास बदली झाली. सन १८२८–२९ सालच्या या संस्थेच्या पांचव्या रिपोर्टावरून त्या सालीं या संस्थेचे अध्यक्ष नामदार मालकमसाहेब—मुंबईचे गव्हर्नर—हे होते. खेरीज ६ उपाध्यक्ष ( यांत सुरतेचे नबाब एवढे च देशी गृहस्थ होते ) व व्यवस्थापक मंडळांत १३ युरोपियन व ११ एतद्देशीय गृहस्थ होते. या देशी मंडळींत जगन्नाथ शंकरशेट, सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे व धाकजी दादाजी ही तीन मराठी मंडळी होती. सदाशिवराव छत्रे हे पेन्शनांत जाण्यापूर्वी याच संस्थेचे नेटिव्ह सेक्रेटरी होते. त्यांचे जागीं डेप्युटी ने. से. म्हणून बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांची नेमणूक झाली. युरोपियनांत मोल्सवर्थ, कँडी व जर्व्हिस इ. मंडळी होती. ग्रंथप्रकाशन-पोट-मंडळींत फक्त बापू छत्रे एवढे च मराठी गृहस्थ होते. मराठी ग्रंथ जे या वेळीं झाले ते सर्व बहुधा बापू छत्रे व जॉर्ज जर्व्हिस या जोडीनें च तयार केल्याचें नमूद आहे. दर रिपोर्टावरून या ग्रंथांची यादी च देतों: —

| नांव. | वर्णन. | कर्ता. | शेरा. |
|---|---|---|---|
| १ बाळगोष्टी | ३ ते ८ वर्षांपर्यंतच्या मुलांसाठीं | टौनशेंड | |
| १ बोधकथा | ताराचंद दत्ताच्या पुस्तकांचें भाषांतर. | बापू छत्रे | |
| १ बोधवचन | लहान मुलांस सोपा, योग्य उपदेश. | बापू छत्रे | |
| १ * गणित भाग १–२ | शास्त्रीय व शालोपयोगी | जॉर्ज जर्व्हिस | |
| १ लीपीधारा | मूळाक्षरें व पंचाक्षरी शब्द इ. | सोसायटीचें पंडितमंडळ. | |
| १ शालापद्धति | शाळांच्या व्यवस्थेवर | मोल्सवर्थ. | |
| १ वर्णमाला | | पंडितमंडळ. | |
| १ महाराष्ट्र कोश | मराठी मराठी – पं. मं. | | ( किं. रु. ४० ) |
| १ बाळमित्र–फराशिश्–चितड्रेन्स् फ्रेंडवरून | | बापू छत्रे | |
| १ नीतिकथा ( इसाप ) | | | |

| | | |
|---|---|---|
| १ मराठे यांची बखर ग्रांटडफचें भाषांतर | | कॅ. केपीन. |
| १ पदार्थविज्ञान | . | शास्त्रीय हरि केशवजी |
| १ व्याकरण | | पंडितमंडळ. |
| १ कोश | इंग्रजी-मराठी-उलटसुलट | ले. क. केनेडी |
| [ हा स्वतंत्र होता. फक्त विक्रीकरितां सो. कडे ] | | ( किं. रु. १२ ) |
| १ कोश | मराठी इंग्रजी | मोल्सवर्थ कँडी |
| | | ( किं. रु. ९० ) |
| १ व्याकर्ण | छापण्यास तयार | पंडितमंडळ. |

* यांखेरीज जर्व्हिस यांनीं अंकगणित, कर्तव्यभूमिति (Practical Geometry) अधिकरण भूमिति (Elements of Geometry) बीजगणित, त्रिकोणमिति, क्षेत्रफळघनफळ, प्रिलिमिनरी ट्रिटाइज ( to the Library of useful knowledge) लाग्रतम् (Logarithms) शिक्षामाला ( a course on Mathematics in 2 vols. ) व न्यूमरत्स् ( पंडितमंडळ) असे ग्रंथ केले होते. असेच ग्रंथ सोसायटीनें गुजराथींत हि तयार करविले खेरीज संस्कृत, फारसी, इंग्रजी, तुर्की, ब्रह्मी इत्यादि ग्रंथ हि तिनें छापविले. असा सोसायटीचे कामाचा पसारा दांडगा होता. जमाखर्चाची उलाढाल पाऊण लाखाचे घरांत होत असे.

ठाणें मराठी ग्रंथसंग्रहालयांत जर्व्हिसचा "गणितमार्ग" म्हणून इ. स. १८२६ तलें पुस्तक आहे. त्यावर तें जगन्नाथशास्त्री क्रमवंत यांचे सहाय्यानें महाराष्ट्र भाषेंत केलें असा उल्लेख आहे. "हें पुस्तक छापण्याची ही प्रथमावृत्ति बापु गंगाधर जोशी चिपळोणकर यांचे हातानें लिहवून दगडावर छापिली" असें त्यावर म्हटलें आहे. जर्व्हिसची गणिताचीं पुस्तकें हटन व बोनिकॅसल यांचे मूळ ग्रंथावरून रचली होती जर्व्हिस हा शिल्पशाळेवर ( School of Engineering ) मुख्य होता व तेथें त्यास या ग्रंथांवांचून शिक्षणाचें काम चालविणें अवघड पडलें म्हणून त्यानें हे बरेच गणितग्रंथ, कोष्टकें वगैरे करवून घेतलीं. या ग्रंथांनीं नवीन गणितविद्येचा पाया महाराष्ट्रभाषेंत भरला. शिल्पविद्येप्रमाणें च औषधिविद्येविषयीं हि खटपटी चालू होत्या. सोसायटीनें त्याबद्दल विशेष हालचाल केलेली जरी दिसत नाहीं, तथापि डॉ. मॅक् लेनान् Mc

Lennan यांनीं शास्त्रीमंडळीच्या मदतीनें इ.स. १८२८ त एक ग्रंथ ( Nosology ) निदानावर छापला. याची एक प्रत भा इ. सं. मंडळांत आहे. पुणें मराठी ग्रंथालयांत एक शारीरावरील ग्रंथ शिळेवर छापलेला आहे तो हि या मॅकलीनचा च दिसतो.

एक फार मोठा सुमारें ५००।६०० पृष्ठांचा निघंटुसारखा वैद्यक ग्रंथ पुणें म. ग्रं. त आहे. त्यांत वैद्यकनिघंटु संपल्यावर मग शारीर व औषधियोजना हि आहे. यांत यंत्रवर्णनांत सुंदर चित्रें घातलीं आहेत. शारीर पृ. ८ वर पुढील शेरा आहे. "हें शारीर संक्षेपेंकरून शार्ङ्गधर ग्रंथांतील दिलें आहे. विशेष चरकसुश्रुतादिक आचार्यांनीं केलेलें शारीर लिहावें तर ग्रंथ फार विस्तृत होतो म्हणून लिहिलें नाहीं. जास विशेप पहावयाची इच्छा असेल त्यानें जॉन् मक्लिन्साहेब यांनीं बाळकृष्ण शास्त्री **सोवनी अष्टागरप्रांतस्थ** यांचे सहाय्यानें इंग्रजी शारीर महाराष्ट्र भाषेंत छापविलें आहे तें पहावें." डॉ. मॅक्लेनन् यांनीं निदान व शारीर यांप्रमाणें च Materia Medica वर हि एक ग्रंथ करविला होता असें कै. न्या. रानडे यांचे शेऱ्यावरून कळतें ( Remarks on the Marathi Catalogue, Ranade's M. writings, page 7). त्यांनीं एक निघंटु प्रकाश हि मराठींत झाल्याचें लिहिलें आहे. तो च हा कीं काय न कळे. मॅक्लेनानचें शारीर (Anatomy) इ. स. १८५२ त छापलें ( प्रत श्री. आबासाहेब मुजुमदार यांजजवळ आहे. ) त्यावरून "of these, three were translated, so far back as 1829 by Dr. Mc. Lennan, on Materia Medica, Nosology and Anatomy" हें रानड्यांचें विधान अंशतः बाधित होतें.

ग्रँटडफ्‌ची मराठ्यांची बखर ( भाषांतर ) ही कॅप्टन् केपन यानें इ. स. १८२९ तच तयार केली. कै. न्या रानडे व रा. रामभाऊ जोशी यांना केपननें ही केली ही माहिती नसावीसें दिसतें. "कप्तान केपीन साहेब यांनीं बाबा साने याचे सहाय्यानें......मराठींत लिहून मुंबैमध्यें छापिली" असा यांत शेरा आहे.

बॉंबे नेटिव्ह–स्कूल बुक अँड स्कूलसोसायटीला मराठींत "मुंबईची हिंद शाळा शाळापुस्तकमंडळी व, गुजराथींत मुंबईनु हिंद निसाळ निसाळ पुस्तकमंडळी असें म्हणत. या संस्थेचें "जार्वीस सकवी" George Gervis

secretary) असून त्यांनीं " तेरीख ८ आप्रिल सन १८२५रोजीं " इंग्रजी-मराठी-गुजराथी असें त्रैभाषिक प्रसिद्धीपत्रक काढून ग्रंथ मागविले आहेत. सदर पत्रक फार वाचनीय आहे. त्यांतला कांहीं भाग येथें उतरतों:—

१ " बालबोध ग्रंथ अथवा प्रौढ ग्रंथ—चांगलीं भाषांतरें किंवा नवीन ग्रंथ. बालबोधास बक्षीस १०० तें-४०० रु. प्रौढग्रंथ...२ ते ५ हजार रुपये-याहून हि विशेष केल्यास विशेष शिफारस गौरनर यांस होईल." ही हकीकत वाचून आमच्या अलीकडील ग्रंथकारांना छत्रेजांभेकरप्रभृतींचा मोठा हेवा वाटेल व त्यांच्या तोंडाला खचित पाणी सुटेल !! गरजेचा महिमा विलक्षण आहे खरा !!

पुढें:—

" या देशांतील लोकांचे चालीस व समजुतीस जसें नीट येईल तसें कोठें कोठें मूळ ग्रंथ थोडा थोडा फिरवून अर्थ संपूर्ण येईल असें केलें पाहिजे. पृ." ३

" परस्पर इरेस पडून एक ग्रंथ अनेकांनीं आरंभावा हें या मंडळीस बरें आहे."

" जी देशभाषा सर्व लोक समजतात ती ग्रंथांस घ्यावी. **प्रौढ भाषेचे शब्द घालून दाटून अवघड करूं नये.**" मराठी—मग—संस्कृत व मग नाइलाज तर " इंग्रजी शब्द हि घेतल्यास चिंता नाहीं " असें सुचविलें आहे.

शिकंदरनामा ( फारसी ); गुजराथचा वृत्तांत; मराठे लोकांचा वृत्तांत; ( नवा ग्रंथ ); ऑर्म याचा मराठे यांना वृत्तांतावर ; आईन अकबरी; गोल्ड्स्मिथ-रोम वगैरे इतिहास; गुजराथचा इतिहास; माल्कमचा इराण—संक्षेप अथवा वेंचे; वुइल्फुस् याचा कुमार देशाचा वृत्तांत, आर्ब, चीन, बर्म, इ. देशांचे वृत्तांत; Blackstone's Commentaries सारखा न्यायग्रंथ; Treatise on martial law योधकांचे न्यायाविषयीं; **प्रकीर्ण विषयः**—शाळा शिक्षापद्धति—पीनाक—शाळापुस्तकें इ.; पदार्थविचार, न्याय, आणि नीति; " हिंद देशांतील गरीब लोक यांणी स्थितिरिति कशी ठेविली असतां त्यांचे गरिबीस उपयोगी पडेल यावर नवा ग्रंथ; स्त्रियांस विद्या व नीतिशिक्षा देण्यास आवश्यकता व त्यापासून हित किती आहे ( नवा );" इ. इ. पुस्तकें मागविलीं व सुचविलीं आहेत; त्यांत फ्रेंच वगैरे पुस्तकें हि आहेत. एकंदर या प्रसिद्धीपत्रकावरून दिसतें कीं, त्यावेळीं पाऊल तर बरावर उचललें होतें; परंतु पुढें रंग बदलला. प्रारंभाप्रमाणें जर सोसैटीचे

हेतू पुढें सिद्धीला गेले असते तर एव्हांना आपण कोठच्या कोठें असतों! पण मध्यें च आमचें दुर्दैव आडवें आलें!!

सदर पत्रकांतील विचार व्यापक असून सूचना शहाणपणाच्या आहेत. बहुकाळी ( ancient ) इत्यादि कित्येक नवीन शब्द आज हि नवीन च वाटतील. वर जो वृत्तांत दिला आहे त्यावरून वाङ्मय नवीन कोणच्या धर्तीवर निर्माण करण्याची खटपट या हैंदशाळा मंडळीनें सुरू केली तें कळतें व त्या कार्यांत मंडळीस काय यश आलें तें हि ध्यानांत येतें. एकंदरींत हा प्रयत्न मोठा नामांकित झाला यांत संशय नाहीं. महाराष्ट्रांत एक नवीन चैतन्याचा ओघ या मंडळीनें उत्पन्न केला. हा प्रयत्न नवें 'कुंपिणी सरकार' व त्यांची मुंबईतील ऋणानुबंधी देशी मंडळी यांनीं केला. यात नाना शंकरशेट प्रभृती देशी धनाढ्य व सुज्ञ पुढाऱ्यांची जोड मिळाली व बापू छत्रे, हरि केशवजी प्रभृती देशी लेखकमंडळ व जारव्हिस, मोल्सवर्थ प्रभृती सरकारी आस्थेवाईक अधिकारीमंडळ यांचें भरपूर व उत्कृष्ट साहाय्य मिळालें व उत्तम कोश, व्याकरण, व गणितादि शास्त्रीय 'प्रौढ' ग्रंथ व बाळमित्रादि 'बाळबोध' ग्रंथ तयार झाले! हे सरकारी व निमसरकारी प्रयत्न चालू असतां च मिशनरी मंडळी हि आपला उद्योग पुढें रेटीत होती. या मंडळींत डॉ. वुइल्सन् हा अग्रणी होता. यानें पुष्कळ शोध व खटपटी केल्या व खिस्तीधर्मप्रसारार्थ झटून उद्योग केला. मोरभट दांडेकर यांजसमवेत याचा हिंदुधर्मप्रकरणीं मोठा कडाक्याचा वाद ग्रंथरूपानें प्रसिद्ध झाला. हा हिंदुखिस्त्यांचा धार्मिक झगडा त्या काळीं फार तीव्र होता; व वुइल्सन्–स्टेव्हेनसन्–नेसबीट् मरे मिचल्-प्रभृती खिस्ती पंडितांनीं मतप्रसारार्थ दीर्घोद्योग केला. मराठी भाषेचें ज्ञान यांतून कित्येकांनीं बरेंच संपादिलें व पहिल्या पिढींतली शिकलेली मंडळी यांच्या आहारीं बरींच पडली. दादोबा पांडुरंग, हरी केशवजी प्रभृती मंडळी या धक्यामुळें बरीच घसरली होती. दादोबांस घरचें शिक्षण व सोनगीरकर बावाची परंपरा व हरि केशवजींस शामराजपंत तात्या केसकर या सत्पुरुषांचे उपदेश यांनीं ताळ्यावर आणिलें। खिस्ती मंडळीना आपल्या उद्योगांत यश मिळविण्यास देशी भाषांचें ज्ञान केवळ जीवभूत होतें म्हणून च बंगाल्यांतील क्यारे किंवा मुंबईतील वुइल्सन् यांनीं चिकाटीनें एवढे श्रम केले. सरकारी, निमसरकारी आणि मिशनरी अशे हे तीन ओघांनी तीन प्रयत्न वाहत होते.

या मिशनरी प्रयत्नांचें एक फळ १८३१ तलें ठाणें ग्रं. सं. त पाहण्यास मिळालें. हा ग्रंथ म्हणजे ' A help in acquiring a knowledge of English language "—" इंग्रजी भाषणाचें ज्ञान मिळवायासाठीं साह्यकारी " हा मुंबईत प्रेषित ( mission ) छा. छापिला. Plan of the work म्हणजे " पोथीचा बेत " काय तें " सूचिका " ( advertiser ) मध्यें सांगून अखेरीस " ह्या देशांतील सर्व, ज्यांस विलायती लोकांसी कामाचा प्रसंग पडतो आणि जे बुद्धीस अभ्यास करायासाठीं विलायती कला विद्या समजायास इच्छितात त्या सर्वांस ही पोथी फार उपयोगी पडेल असी अपेक्षा धरली आहे " पृ. १२८ वर Most parts of Africa are very hot= आफ्रिकेंतले बहुतेक वांटे फार उष्ण आहेत " असें भाषांतर केलें आहे. chronology ला शकविद्या certificate ला अग्रूपत्र व Parenthesis ला कोंडी असें म्हटलें आहे. ख्रिस्ती मराठीचा हा नमुना एकवार पहावा. कै. विष्णुशास्त्री यांनीं निबंधमालेंत एके जागीं असा च एक चमत्कारिक मासला या जातीचा दिला आहे तो पाहिला म्हणजे रे. लोटलीकर यांनीं ख्रिस्ती मराठ्यांनीं स्वभाषेचा अभिमान धरण्याविषयीं केलेला उपदेश महत्त्वाचा वाटतो. ( मराठी भाषेची योग्यता. रे. लोटलीकर. १९२१ ).

जारविसप्रभृति युरोपियन यांच्या नांवावर जे ग्रंथ या काळांत आहेत, त्यांजविषयीं एक गोष्ट ध्यानांत धरण्याजोगी आहे. या ग्रंथांच्या अगदी जुन्या जुन्या प्रति पाहण्यांत आल्या त्यांवर कोठें जारविस यांस जगन्नाथशास्त्री यांनीं सहाय्य केल्याचा किंवा केपिन यांस बाबा साने यांनीं अगर मकलेनान यांस सोवनीशास्त्री यांनी साहाय्य दिल्याचा अशा सहाय्यकर्त्या देशी विद्वानांचीं नांवें आहेत. यावरून वास्तविक प्रकार असा दिसतो कीं, सदर ग्रंथांच्या कर्तृत्वाचें बरेंच श्रेय या शास्त्री मंडळीकडे आहे. पुढील आवृत्त्यांतून या साहाय्यक मंडळींचा नामनिर्देश गाळून टाकण्यांत आला आहे. यायोगें वाचकांची दिशाभूल होते, वास्तविक पद्धति व ज्ञानसंग्रह युरोपियनांचा व त्यास मराठी पोषाख चढविण्याची शागिर्दी शास्त्र्यांची असा श्रमविभाग असावा.

दुसरी एक बाब लक्षांत ठेवण्यासारखी ही आहे कीं, जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बापूशास्त्री शुक्ल, सोवनीशास्त्री, गंगाधरशास्त्री फडके प्रभृति त्या वेळचे बरेच शास्त्री हे 'चौलअष्टागर प्रांताकडचे आहेत. 'मुंबईकर इंग्रजांच्या टापूला हा प्रांत भिडून पडल्याकारणानें अष्टागरकर मंडळींचें दळणवळण मुंबईशीं विशेष च पडे.

आतां या काळांतील आणखी कांहीं किरकोळ पुस्तकांविषयीं लिहितों:—

सन १८३१ " सारसंग्रह " किंवा शास्त्र-विद्या-कलाकौशल्य इत्यादि सर्व विषयांचें संक्षेपतः प्रश्नोत्तररूपानें वर्णन " ( अकारानुक्रमानें )—मुंबई यास " प्रस्तावन " आहे. यांतील नमुना पहा:—

पृ. १९ प्र०:—" श्रम केला असतां कविता करितां येईल ?

उ०:—सर्वापेक्षां कविता करितां येण्यास फार श्रम लागतात; ही गोष्ट सर्वसंमत आहे कीं, कविताशक्ति हें ईश्वरी दत्त आहे, गुण नव्हे म्हणोन जास कविता करण्याची इछा आहे तो मुळीं कवी च जन्मला पाहिजे. परंतु यांत संशय नाहीं कीं, श्रम केले असतां कांहीं तरी साध्य होईलच. मोठा प्रौढ पद्यरूप ग्रंथ करायास जातिगुण आणि सूक्ष्म बुद्धि पाहिजे, परंतु हे गुण जामध्यें नाहींत तेही अभ्यासानें मनोरंजक सुमाराची कविता करायास समर्थ होतात."

पृ. १३४ "प्र०:—मेघगर्जना म्हणजे काय ? "

" उ०:—मेघांमध्यें कित्येक द्रवरूप क्षार पदार्थ भरलेले असतात. त्यामुळें मेघ एकमेकांवर आपटतात, तेव्हां वीज पडत्ये आणि मोठा घडघड असा शब्द होतो. त्यास मेघगर्जना असें म्हणतात.

वायु वहातो, अभ्रें उठतात; मेघ वातावरणांत इकडे तिकडे फिरतात हें मनुष्यांचे दृष्टीस पडतें; पाउस पुष्कळ पडूं लागला म्हणजे भय वाटतें. धुकें आणि दंव पडूं लागलें म्हणजे ऋतु बदलला पाहून चित्त विरस होतें आणि भयंकर मेघगर्जनेसहित विद्युल्लता चमकूं लागली पाहून सर्वशक्ति जो भगवंत त्याचे सामर्थ्याचें स्मरण होतें; परंतु हे चमत्कार नाहींसे झाले आणि वायु मंद शीतल वाहूं लागला म्हणजे मनुष्य हे विचार सोडून देतात आणि पदार्थविज्ञानी आहेत ते मात्र सृष्टींतील वस्तूंचा विचार करीत बसतात. यावरून असें दिसतें कीं, सर्वांस ईश्वरनिर्मित पदार्थांचा विचार करायाचें अगत्य नाहीं. मनुष्याचें आचरणांत इतकें अंतर आहे."

इ. स. १८३२ भूगोलखगोल–यांत नित्यानंद आणि परमानंद यांचा संवाद घालून विषय प्रतिपादिला आहे, हा मुंबईचे शिक्षामंडळींकरितां लिहिलेला.

इ. स. १८३५—उपयोगी ज्ञानाचा पुस्तकसमूह ( Library of Useful knowledge चें भाषांतर दिसतें ) हें १०४ पानांचें मोठें पुस्तक

आहे. यांत Mechanics " शिल्पविद्या " या विषयाचे निबंध आहेत. इंग्रजीचे भाषांतर William Henry Bell यानें "नारायणशास्त्री जोशी चौलकर याचे साहाय्यानें मराठी भाषेंत केलें."

इ. स. १८३३ त बॉ. नें. ए. सो. मार्फत हरि केशवजी यांचें सिद्ध-पदार्थ-विज्ञान Conversations on Natural Philosophy या ग्रंथाचें भाषांतर छापून प्रसिद्ध झालें. ग्रंथ चांगल्यांपैकीं आहे. याबद्दल रा. रामचंद्र हरि लिहितातः—" हें भाषांतर बहुधा दुर्मिळ आहे.......याची भाषा प्रौढ असून सोपी आहे." यांत प्रसंगोपात्त सुरस कविता हि आहेत. उ. " सूर्यास्तीं कपिशांगी संध्यारमणी करावया केली। नीलांधकार वसना नेसुनि आकाशमंदिरीं ठेली ॥१॥"

इ. स. १८३४—इंग्लंड देशची बखर मुंबईचे शिक्षामंडळीकरितां लिहिली. हें भाषांतर आहे. "वाचणारांस सूचना" यांत ५ व्या सूचनेनें 'त' ( सक्तार इ. शब्दांत ) याचा उच्चार सर्वत्र टांक या शब्दांतील टकारासारखा करावा. तसेंच नियम ६ 'द' इंग्लंद याचा उच्चार डबी यांतील डकारासारखा, क्वचित् नेदर्लंड इत्यादि शब्दांमध्यें दीन यांतील दकारासारखा असावा."

इ. स. १८३५ गणितशास्त्राचे उपयोगाविषयींचे संवाद—A course of public lectures on pure and applied mathematics delivered at the Elphinstone Institute translated Durpun Press.

इ. स. १८३५ त " इंग्लंड देशाचें वर्णन." * नाना नारायण यांनीं केलें. किं. रु. २ हें कलकत्त्याच्या मि. बर्डच्या England delineated या बुकाचें भाषांतर असून Prera यांनीं शिळेवर छापलें. मुंबईचे गव्हर्नर क्लेअर यांस अर्पण केलें आहे. याच्या ४०० प्रती गव्हर्नर इन् कौंसिल व बऱ्याच मिशनरींनीं घेतल्यां. दादोबा २ व हरिकेशवजी १ अशा प्रती घेतल्याचें नमूद आहे. अखेर हळूंच ख्रिस्ती धर्माचें श्रेष्ठत्व सुचविलें आहे. तथापि पुस्तक वाचनीय आहे. या वेळचे शुद्ध लेखनांत " चांबळ्याचे—काप्सी—अश्ये रीतीनें—नर्मदेच्ये उत्तरेस " असें लिखाण आढळतें.

* नाना नारायण हे दादोबांचे सहाध्यायी. गणितांत नंबर वर, बुद्धिमान् व उद्योगी अशी स्तुति दादोबांनीं यांची आत्मचरित्रांत ( पृ. २१ ) केली आहे.

इ. स. १८३५ त "दुसरें हिंदुधर्मप्रसिद्धीकरण" ( second exposure of the Hindu religion) जान् उइल्सन् Rev. J. Wilson यांनीं प्रसिद्ध केलें. या १६६ पानांत सातारचे नारायणराव यांनीं प्रसिद्ध केलेल्या ख्रिस्तीधर्मविरोधक ग्रंथांतील आक्षेपांस उत्तरें देण्याचा यत्न केला आहे. भाषा किंवा विचार या दोन्ही दृष्टीनें पुस्तक यथायथाच आहे. सन १८३१ त वुइल्सन्नें मोरभट्ट दांडेकरांस प्रत्युत्तर म्हणून पहिलं हिं. ध. प्रसिद्धीकरण छापिलें.

महाराष्ट्र भाषेचा कोश—मराठी मराठी—हा या काळांतील सर्वांत मोठा व महत्त्वाचा ग्रंथ. जरूरी, उपयुक्तता व परिश्रम या सर्वांचे दृष्टीनें त्याची सर कोणास हि यावयाची नाहीं. आश्चर्याची व लज्जेची गोष्ट कीं, तेव्हांपासून आज जवळ जवळ शंभर वर्षें होत आलीं, परंतु तो कोश वाढविणें व सुधारणें तर राहोच, परंतु नुसता पुन: छापण्याचें श्रेय हि कोणी संपादिलें नाहीं! मराठी मराठी कोश लहान मोठे पुढें पांच चार झाले; परंतु जसा काळानें वडील तसा अधिकारानें हि वडील असलेला **पंडिती** कोश च सर्वांहून श्रेष्ठ ठरेल!

दादोबांनीं आपल्या चटकदार आत्मचरित्रांत (संपादक रा. ल. रा. पांगारकर-आठवें महाराष्ट्र साहित्य संमेलन-रिपोर्ट पृ. २२ पहा) पुढील यथार्थ अभिप्राय नमूद केला आहे:—तसेंच मोल्सवर्थ व कँडी यांच्या हाताखालीं जे पंडित होते त्यांनीं दोन मोठ्या पुस्तकांत मराठी कोश तयार केला आणि तो सुंदर शिलाछापावर छापिला. त्यावरून त्या साहेबांनीं मराठी कोश तयार केला तो प्रसिद्ध आहे च. परंतु पंडितांचा कोश कोठें दिसेनासा झाला! हें मोठें **अद्भुत कृत्य** मराठी भाषेंत त्या वेळेस झालें! परंतु अशा कृत्याचे गुणग्राहक पुढें कोणी झाले च नाहींत."

असा हा अपूर्व कोश कसा तयार झाला तें त्या ग्रंथाचे प्रस्तावनेंतून उताराच देतो म्हणजे समजेल.

## प्रस्तावना

### हा महाराष्ट्र भाषेचा कोश

महाराष्ट्र भाषा म्हणजे महाराष्ट्रदेशीं राहणारे जे देशस्थ ब्राह्मणादिक लोक त्यांची बोलायाची प्राकृत भाषा. तिचा कोश म्हणजे त्या भाषेंत शब्द

येतात त्यांचा कोश. कोश शब्दाचा सामान्यतः हा अर्थ आहे कीं, प्रसंगीं प्रयोगार्थ बाहेर काढावयाचा जो अर्थ–संघात त्याचे संग्रहाचें सांठवण. राजकीयादि व्यवहारोपयोगी जीं मोहरा, पुतळ्या, होन, रुपये इत्यादि द्रव्यें यांचें सांठवण जें भांडारगृह त्यास जशी कोश ही संज्ञा प्रसिद्ध आहे तशी वाग्व्यवहारोपयोगी जे शब्द तत्संग्रहरूप जो ग्रंथ त्यास ही संज्ञा प्रसिद्ध आहे. राजकीयादि व्यवहारास मुख्यत्वेंकरून आश्रय जसें द्रव्य, त्याच प्रकारें या वाग्व्यवहारास आश्रय शब्द होत. द्रव्यकोश आणि शब्दकोश यांचें सर्व गोष्टींनीं साधर्म्य आहे. परंतु द्रव्यकोश क्षय्य आणि हा अक्षय्य एवढा मात्र याकडे विशेष आहे. याजकरितां वाग्व्यवहारकर्ता जो कोणी त्यास शब्दकोश पाहिजे म्हणून जा जा भाषेनें व्यवहार करावाचा त्या त्या भाषेचा कोशावर सर्वांचा आदर अवश्य असावा. यद्यपि जांस त्या त्या भाषांचे कोशव्याकरणाचें ज्ञान नाहीं त्यांचा ही वाग्व्यवहार चालतो खरा परंतु कोशव्याकरणाचें जांस ज्ञान आहे त्यांचे आणि यांचे वाग्व्यवहारास फार अंतर आहे. याविषयीं दृष्टांत. द्रव्यवान् आणि द्रव्यहीन यांचे प्रापंचिक व्यवहार. असें असतां ही आजपर्यंत या भाषेवर कोशव्याकरण करायास कोणी प्रवृत्त झाला नाहीं हें मनांत आणून सर्व लोकांचे कल्याणार्थ राजकार्यधुरंधर प्रजापालनैकरत हानरबल मौंटस्त्युवर्त एलफिंस्तनसाहेब पात्रण [ Patron ] आणि गवरनर याणी मुंबईतील शिक्षाशाळामंडळीस आज्ञा करून हा ग्रंथ बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, सखाराम जोशी, दाजीशास्त्री शुक्ल आणि परशुरामपंत गोडबोले यांचे हातून करायास आरंभिला. पुढें त्यांचेच हातून प्रतापसिंह परम कारुणिक हानरबल जनराल सिर जान मालकमसाहेब बहादुर पात्रण आणि गवरनर यांणीं शेवटास नेला............ही महाराष्ट्रभाषा म्हणजे देशभाषा होय. आणि देशभाषांचा वर्तनाचा असा नियम आहे कीं, स्वदेशाचे मध्यभागीं शुद्धस्वरूपानें असावें आणि उत्तरोत्तरपर्यंतभागीं तत्तद्देशांतरस्थ भाषांचे मिश्रणानें संकीर्णरूपानें असावें.

महाराष्ट्रदेशाचा मध्यभाग म्हटला असतां प्रायः पुणें प्रांत होतो, अतएव पुणें प्रांतीं जे शब्द प्रसिद्ध आहेत ते प्रायः सर्व महाराष्ट्रदेशभर प्रसिद्ध असें समजून ते शब्द प्रांतांचे खुणेवांचून लिहिले आहेत......

पुरवणी कोश म्हणून एक खंड या कोशाचा १८३१ त काढला. या वेळीं जगन्नाथ शास्त्री क्रमवंत व रामचंद्रशास्त्री जानवेकर ही दोन मंडळी पंडितमंडळांत अधिक दाखल आहेत. पहिल्या कोशावर नाहींत.

## केनेडी कोश.

या पंडिती कोशापूर्वी हि ले. क. व्हान्स् केनेडी (Vans Kennedy) यानें इ. स. १८२४ एक मराठी इंग्रजी व इंग्रजी मराठी असा कोश मुंबईस कुरिअर छापखान्यांत श्रीकृष्ण जगन्नाथ प्रभूकरवीं छापून प्रसिद्ध केला. क्यारेचा कोश केनेडीस उपयोगी येईना व वुइल्सन्‌चा संस्कृत कोश बाहेर पडला होता, तेव्हां शुद्ध मराठी शब्दांवर भर द्यावा असा केनेडीचा हेतू होता. प्रस्तावनेवरून या केनेडीचें ज्ञान फार कोतें होतेसें दिसतें. "But it must be observed that the Marathi is merely a spoken language and that it has never been cultivated or refined by authors either in prose or verse" असा शेरा यानें मारला आहे. तेव्हां सारा ग्रंथ च आटपला! एका "intelligent" ब्राह्मणानें अमरकोश मराठींत उतरून दिला व मिस्तर अर्स्किन् या विद्वानानें तयार करविलेले दोन इंग्रजी मराठी हस्तलिखित कोश व कॅप्टन् कॉक् याजजवळील हिंदुस्थानी मराठी हस्तलिखित कोश त्यास मिळाले त्याचें त्यास फार साहाय्य होऊन त्यानें ही ग्रंथसिद्धी केली. "रविंद"(= lotus), ब्रमलेख हीं शब्दरूपें वगैरे पहातांना या कोशाची मौज वाटते!

कोशाची सिद्धी तर झाली, परंतु "व्युत्पत्तिः पक्षिणी प्रोक्ता । कोश व्याकरण उभे ॥ तावेव पूर्व संप्राप्य शास्त्रव्योम्नि प्रवेशयेत्' असा आमचा प्राचीन दंडक च असल्यामुळें नुसत्या कोशानें काम होत नाहीं जोडीला व्याकरण पाहिजे. परक्यांना मराठी शिकावयाचें किंवा शिकवावयाचें तर कोश व व्याकरण या दोहोंवांचून पावलोंपावलीं अडणार! अशा हि अडचणींत पुण्याचा रेसिडेंट * सर चार्लस मॅलेट बाजीरावींत मराठी शिकला— शाबास आहे त्याची! इंग्रजी मुत्सद्दी मराठी फारसी जाणण्यासाठीं धडपडत असतां आमची मंडळी आंग झाडून कामास लागली नाहीं तेव्हां अवश्यभावी परिणाम कसे टळावे? असो.

विद्यावृद्धीस जसा कोश पाहिजे तसेंच व्याकरण हि पाहिजे. सबब त्याची हि तयारी प्रथमपासून झटपटीनें सुरू झाली. मुं. म. ग्रं. त एक लेखी व्याकरण

---

* "मरहट्ट बोली साफ बोलतात." इतिहास संग्रह—

आहे त्यांत पुढील उल्लेख आहे: " सोसैटीचे अधिकारी जार्ज रवीस साहेब यानी च्यार पंडित ठेविले एक जगन्नाथशास्त्री दुसरे रामचंद्रशास्त्री तिसरे गंगाधरशास्त्री चवथे बालशास्त्री घगवे ( पैकीं रामचंद्रशास्त्री दुसरे कामांत गुंतले सबब ) तिघांनी हें महाराष्ट्र भाषेचें व्याकरण पूर्ण करून छापिलें. याचा संक्षेप रामचंद्र-शास्त्री यानी छापिला १२ वर्षे तो चालला. पुढें दुर्मिळ. मग मी हा नवीन ग्रंथ फार संक्षिप्त केला यांत कुशाग्रबुद्धि जे बाळशास्त्री जांभेकर ... ( यांनी ज्या )... युक्ति सुचल्या त्यांचा संग्रह करून त्यांस दाखवून हा ग्रंथ छापिला "

दादोबांचें प्रसिद्ध व्याकरण इ. स. १८३६ त झालें व ने. ए. सोसैटीच्या १८२८-२९ च्या अहवालावरून त्या सुमारास सोसैटीचें व्याकरण छापण्यास तयार झालें होतें. सन १८२७ सालीं व्याकरणशिक्षणाची स्थिती दादोबा येणेंप्रमाणें वर्णितात " बापूशास्त्री यांची आमचे शाळेंत नेमणूक होण्यापूर्वी रामचंद्रशास्त्री व इतर एक दोन पंडित यांनीं प्रश्नोत्तररूपानें एक लहानसें मराठी व्याकरण रचलें होतें. व्याकरणवर्गांत व मराठी शाळेच्या पहिल्या दुसऱ्या वर्गांत या व्याकर-णाच्या प्रती लिहून त्यावरून मुलें व्याकरण शिकत होतीं. "

मुं. म. ग्रं. सं. त इ. स. १८५० सालीं निघालेल्या आणि गंगाधरशास्त्री फडके रहाणार प्रांत आंष्टागर या बॉ. ने. ए. सो. च्या मूळ शास्त्रिमंडळींपैकीं एक्या विद्वानानें रचलेल्या व्याकरणाच्या पुस्तकाची आवृत्ती ४ थी ची प्रत आहे. १८५० त अर्थात्च सोसायटीचें रूपांतर बोर्ड् आव एजुकेशन नांवांत झालें होतें या व्याकरणाच्या प्रस्तावनेंत मशारनिल्हे फडकेशास्त्री लिहितात. " इ स. १८२४ पर्यंत महाराष्ट्र भाषेचें व्याकरण हा शब्द देखील नव्हता ! " १८२२ त मुंबईच्या ने. ए. सो. चे प्रमुख सभासद " अज्जम करनेल जार्ज जरवीस यांनी तीन पंडित मजसुा ठेविले " मग " संस्कृत व्याकरणाध्ययन बलेंकरून " एका वर्षांत व्याकरण केलें. १८२५-३६ पर्यंत हें च चाललें. याच्या हातीं प्रती शेकडों असत. १८३६ त सदर ग्रंथास संवादरूप देऊन तो सुधारून छापला. १८३८ त त्याची "मजला न कळतां" दुसरी आवृत्ती निघाली. तिसरे आवृत्तीचे वेळीं १० महिने श्रम केला तेव्हां सर्व ग्रंथ महादेवशास्त्री कोल्हटकर तथा सखारामशास्त्री काळे तथा नारायणशास्त्री पुराणिक तथा राजश्री भिकाजी भास्कर शिंदे तथा विष्णु गंगाधर फडके या सर्वांचे विचारें छापिला. "

" जी ज्यांची जन्मभाषा त्यास व्याकरणाचा काय उपयोग ? " अशा त्या वेळेस निघणाऱ्या नेहेमींच्या आक्षेपास फडके शास्त्री यांनी पुढील उत्तर दिलें आहे " त्यास उत्तर इतकेंच कीं मातबरांचा प्रापंचिक व्यवहार चालतो तसाच दरिद्र्यांचा ही भीक मागून दिवस लोटतो तसें व्याकरण जांस येतें त्यांचा वाग्व्यवहारांत आणि येत नाहीं त्यांचा वाग्व्यवहारांत बराबरी नाहीं. हालीं जें महाराष्ट्र भाषेचें व्याकरण झालें आहे एणेंकरून या भाषेचा अनुगम आणि भाषेंतील विषय समजण्यानें संस्कृतांत प्रवेश करावयाची ज्यांची इच्छा असेल त्यांस फार उपयोग घडेल. " येथें शास्त्रीबोवांनी मराठी व्याकरण आधीं शिकून मग संस्कृत-प्रवेश करावयास सुचविलें आहे तें योग्य आहे. सांप्रत देशभाषा सोडून प्रथम प्राचीन भाषांचे च अध्ययन करण्याकडे कटाक्ष दिसतो तो देशभाषाभिवृद्धीस पोषक होत नाहीं व व्हावयाचा हि नाहीं. शास्त्रीबोवा पुढें लिहितात. " या ग्रंथांत पुणें प्रांतींचें कोंकणस्थ व देशस्थ या लोकांची भाषा साधली आहे. "

मुं. म. ग्रं. तील लेखी व्याकरण वर उल्लेखिलें तें हेंच गंगाधरशास्त्री फडक्यांचें व्याकरण दिसतें. येणेंप्रमाणें मराठी गद्याला इंग्रजी अमलांत स्वरूप येऊं लागलें. कोश व्याकरण व शालोपयोगी—शास्त्रीय, भाषिक वगैरे ग्रंथ हा याचा एक प्रकार व वर वुइल्सन्—दांडेकर—नारायणराव यांचे ग्रंथ दाखल केले तसले धर्मविवादी ग्रंथ हा दुसरा प्रकार.

या वेळच्या सर्व लेखकांत सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे हे श्रेष्ठ होते त्यांचा जन्म शके १७१० त ( अर्वाचीन कोश ) मुंबईस वाळकेश्वरीं झाला. तेथील वृत्तिवंत छत्र्यांपैकीं हे श्रेष्ठ. हे प्रथम इंजिनीअरच्या हपीसांत 'रैटर' होते. यांनीं स्वपराक्रमानें इंग्रजींत उत्कृष्ट गती केली. इतकी कीं, "त्यावेळीं सदाशिव काशिनाथाप्रमाणें इंग्लिश भाषा जाणणार या मुंबई इलाख्यांत एतद्देशीय लोकांमध्यें कोणीच नव्हते... इतर ज्ञातींपेक्षां ब्राह्मण यांची बुद्धिमत्ता व उद्योगीपणा विशेष हे यांच्या उदाहरणावरून स्पष्ट दिसून येतें. " ( दादोबा—आत्मचरित्र पा. २० ) यांची बाळमित्र, इसापनीतिकथा इत्यादि पुस्तकें म्हणजे शुद्ध, रसाळ व सोप्या मराठीचे मनोहर कित्तेच आहेत. " महाराष्ट्र भाषेंत शुद्ध रीतीनें वाक्ययोजना करून रसभरित असे पहिले ग्रंथ सदाशिव काशिनाथ छत्रे यांनीं रचिले; म्हणोन त्यांस गद्यात्मक ग्रंथांचे जनक म्हटल्यास हि चालेल" ( दादोबा—महाराष्ट्र भाषेचें व्याकरण प्रस्ता॰) हा च प्रौढ भाषेंतला संस्कृती वळणाचा अभिप्राय

दादोबांनीं आत्मचरित्रांत शुद्ध सोप्या मराठींत असा गोड शब्दांत लिहिला आहे. " मराठींत सरस रीतीनें फकीकेंत लिहिणारे हे च पहिले. त्यांच्या मागून आम्ही सर्व लिहिणारे झालों. " यांचीं पुस्तकें "भाषांतरें आहेत असें त्या वेळेस कोणास वाटत नसे. " क. कौपर व जर्व्हिस् साहेब यांस यांनीं नवीन शाळा वगैरे स्थापणेचे कामीं व इमारती बांधण्याचे कामांत फार मदत केली. यांना रु. १०० दरमहा होता. " हा दरमहा त्या वेळेस सर्वांस मोठा वाटत असे " हे बॉं ने. ए. सो. चे नेटिव्ह सक्रतार होते इ. हकीकत पूर्वी आली च आहे. सन १८२९ त यांनीं पेन्शन घेतलें नंतर स्वतंत्र छापखाना काढावा व इतर कांहीं लोकोपयोगी उद्योग करावा असा यांचा विचार होता. परंतु दुर्दैवानें " एक दीड वर्षानीं च " ते निवर्तले. त्यावेळीं त्यांचें वय अवघें ४२ वर्षांचें होतें. अशा पुरुषाचे हातून अधिक वाङ्मय सेवा घडती तर मराठीला बहुमोल भूषणें यानीं चढविलीं असतीं. यांनीं कांहीं कविता केल्याचा प्रवाद अर्वाचीनकोशकारांनीं दिला आहे. एक Wisdom in Miniature म्हणून इंग्रजी पुस्तक यांनीं छापविलें होतें असें दादोबांनीं आत्म चरित्रांत लिहिलें आहे. यांचेविषयीं सदर कोशकार रघुनाथशास्त्री गोडबोले यांनीं उद्गार काढले आहेत ते लक्ष्यांत धरण्यासारखे आहेत.

" यांस इंग्रजी भाषा जी येत होती व तिच्या योगानें जी विद्वत्ता यांच्या अंगीं होती ती आतांच्या सवातीन हात किताबवाल्यांच्या बरोबरीची जरी नव्हती तरी तेवढ्यावर जे जे ग्रंथ यांनीं लिहिले ते इतके उत्कृष्ट उतरले आहेत कीं किताबवाल्यांच्या हातून अजून एकहि ग्रंथ तसा झाला नाहीं किंवा नसेल आणि कदाचित् झाला असला तर त्याप्रमाणें उत्तम हि उतरला नसेल. " एका पन्नास वर्षांपूर्वीच्या व्यासंगीं व साहित्यसेवक शास्त्र्यानें दिलेला हा अभिप्राय पाहतां छत्रे यांचें लिहिणें जुन्या नव्या सर्वांस किती आवडलें याची कल्पना येते. असें अंतःकरण रिझविणारे ग्रंथकार कोठेंहि झाले तरी विरळाच. त्यांतून परक्या भाषेंतले विचार व ग्रंथसरणी पचनीं पाडून तिला स्वदेशी लेणें बेमालूमपणें चढविणारे कसबी तर त्याहून विरळा! अशी ही मराठी गद्याच्या नव्या अवताराच्या पहांटेची घटका मोठी प्रसन्न होती. तिला आपण बापू छत्र्यांचा काळ हें च नांव ठेऊं. आणि हें च त्यांचें स्मारक! ( शेवटीं उतारे पहा )

# प्रकरण ३ रें.



## दादोक्त ते नवनीत

### ( इ. स. १८३६ — १८५७ )

मागील प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणें मराठीच्या अभिवृद्धीचें काम जोमांत सुरू झालें. परंतु इ. स. १८३४–३५ त या कामास एक मोठा भुंगा लागला. १८१३ सालचे कायद्याप्रमाणें एतद्देशीयांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ व प्राचीन विद्येच्या पुनरुज्जीवनार्थ विलायतेहून सुटलेला लक्षाचा वार्षिक संकल्प सिद्धीला नेण्याचा प्रश्न पुढें येऊन प्रख्यात बेंटिंकसाहेबांचे अमदानींत निकालांत निघाला. सरकारानें जुन्या भुसकट व निर्जीव विद्येच्या—किंवा अविद्येच्या—प्रसारार्थ ही रक्कम खर्च करणें म्हणजे पाप होय; ही रक्कम नवीन जोमाच्या इंग्रजी विद्येप्रीत्यर्थ च खर्चिली पाहिजे असा पक्ष निघून वादाचा मोठा कडाखा उडाला! मिस्तर शेक्सपीअर–वुइल्सनप्रभृति मंडळींनीं देशीपक्षाचा (Vernacularist) कैवार घेतला व मेकॉले ट्रिव्हेल्यनप्रभृति वीर इंग्रजीपक्षाकडून (Anglicist) झगडूं लागले. त्यांत मेकॉलेच्या तोफखान्यापुढें देशी मंडळी नामोहरम होऊन इंग्रजी पक्ष विजयी झाला! एव्हांपासून देशी वाङ्मयाचें सरकारी मीठ जें तुटत चाललें तें आजवर! एल्फिस्टन माल्कम्प्रभृति देशी पक्षांच्या कणखर कैवाऱ्यांच्या प्रयत्नांमुळें मुंबईकडील सुरुवात लेचिपिची नव्हती. खेरीज मराठी भाषेचें अंतःसामर्थ्य व चिवटपणा हीं तशीं च प्रबळ असल्यामुळें देशीभाषोन्नत्तीचा वृक्ष १८३५ तील अशनिपातानें जळून गेला नाहीं! तथापि सन १८४० त मुं. ने. ए. सोसैटी संपुष्टांत येऊन तिचे जागीं बोर्ड ऑव् एडुकेशन हें निमसरकारी मंडळ स्थापन झालें. या बोर्डाकडे कारभार येतांच देशीभाषा विरुद्ध इंग्रजी ही धुमाळी इकडे उसळली. देशी पक्ष इकडे बंगालपेक्षां बलिष्ठ होता. १८४४ त सर अर्स्किन पेरी या बोर्डाचा अध्यक्ष झाल्यामुळें इंग्रजीचें पारडें वर जाऊं लागलें. १८३२सालींच विलायतेहून कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांनीं मुंबई सरकारास लिहिलें-

" There is but one part of your arrangements which appears to us not to work well. We refer to the mode hitherto adopted for supplying school books. In five years, for 1826 to 1830, the works published by the society have cost the Government Rs. 37,223. Government, moreover, pays Rs. 14,400 per annum for the Native Education Society Establishment, and gives prizes for translations (Rs. 32,700), so that, exclusive of the Dictionary the total charge to Government has been Rs. 2,01,923 " याबद्दल इंग्रजीचे कैवारी सर फेरोझशा मेथा सन १८६७ त लंडनांत वाचलेल्या निबंधांत पुढें म्हणतातः--"And all this expenditure without any substantial results ; indeed, the printed works were proved to have been worth less than the paper on which they were printed ! We cannot then, too strongly condemn the spasmodic efforts to create, on short notice, a vernacular literature, or rather vernacular literatures..." मेथांनीं तर मेकॉलेला चीत केलें ! ! हैंद शाळा पुस्तकमंडळीचें एक प्रसिद्धिपत्रक पूर्वील प्रकरणांत दिलें आहे, त्यावरून ग्रंथोत्तेजनार्थ ह्या मंडळीनें सढळ हातानें खर्च केला खरा; पण तो अनाठायीं झाला असें म्हणणें हें अगदीं अन्यायाचें होतें. मराठीसारख्या राजमान्य व प्रतिष्ठित भाषेला असेंच उत्तेजन मिळत राहिलें असतें तर आज ती इंग्रजी, फ्रेंच, जर्मन इत्यादि अभियुक्त व पहिल्या प्रतीच्या भाषांचे तोडीची श्रीमंती प्रगट करूं शकली असती ! पण मेकॉलेनें व इंग्रजी 'विद्यावारुणी' नें मत्त झालेल्या फिरोशांच्या पिढीनें मध्येंच अपशकून केल्यामुळें तिच्या प्रगतीला अडथळा झाला. अखेर १८५४ चा हॅलिफॅक्स खलिता प्रसिद्ध होऊन इंग्रज सरकारानें आपलें विद्याख्यातें निर्माण केलें व लवकरच १८५७ त कलकत्ता, मुंबई व मद्रास या तीन केंद्रस्थानीं इंग्रजी विद्यापीठें स्थापित झालीं ! तरी एवढ्यानें देशीपक्ष, मुंबईपुण्यांत कांहीं नेस्तनाबूद झाला

नाहीं. ' कीं तोडिला तरु फुटे आणखी भरानें ' या न्यायानें त्याचें पाऊल पुढेंच पडत गेलें असें पुढील वृत्तांतावरून दिसून येईल. सरकाराच्या उत्संगावरून जरी देशी भाषा दूर लोटल्यासारखी झाली तरी कित्येक निष्ठावंत भक्तांनीं तिला सोडलें नाहीं.

या भक्तांत **बाळशास्त्री जांभेकर** व परशरामपंत तात्या गोडबोले हे अग्रणी होते. पैकीं बाळशास्त्री हे बापू छत्रे यांचे तालमींत तयार झालेले होते व परशरामपंत तर पंडिती कोशाचे एक प्रमुख संपादक होते. बाळशास्त्री यांचा जन्म १८१० त म्हणजे क्यारेचा कोश झाला त्या सालीं—राजापूर तालुक्यांत पोंबुर्लें या गांवीं झाला. " यांचे बाप चांगले व्युत्पन्न भिक्षुक असत. त्यांहीं आपल्या मुलांस चांगली काव्यव्युत्पत्ति करून दिली होती.... बापू छत्रे यांचे सांगण्यावरून गंगाधरशास्त्री यांनीं आपला मुलगा बापूकडेस इंग्रजी शिकण्याकरितां ठेविला. त्यांहीं त्या मुलाची अल्पवयांत थोर बुद्धि पाहून त्यास सोसायटीच्या इंग्रजी शाळेंत अभ्यासाकरितां ठेविलें. दिवसास इंग्रजी शिकावें व संध्याकाळीं, आमचे गुरु बापूशास्त्री शुक्ल यांच्या बिन्हार्डी कौमुदीची पोथी घेऊन तेथें पढावयास जावें .... हे त्या शाळेंत विद्यार्थ्यांच्या मंडळांत अग्रगण्य होते.हे मला (दादोबा पांडुरंग)आपल्या घरीं संध्याकाळीं बोलावून स्पेक्टेटर व रँबलर यांचे अर्थ सांगत. आमचे इंग्रजी शिक्षक मर्फेसाहेब, त्यांचे जागीं मेनवेरिंग आले. मर्फेसाहेब त्या वेळेस मराठी भाषेंत फार निपुण असत. त्यांस ही भाषा शिकण्याचें कांहीं साधन नसतां फक्त आपल्या श्रमानें व बुद्धिकौशल्यानें त्यांनीं ही भाषा हस्तगत केली म्हणून त्यांचा मोठा चहा होऊन त्यास मराठीचे मुतरजिम ( Interpreter) नेमिलें." पहिल्या वर्गांत हरिश्चंद्र हरिशंकर, बाळ गंगाधरशास्त्री, मोरोबा कान्होबा ( घाशीराम कोतवालचे कर्ते ? ) व जनार्दन अप्पाजी गाडगीळ अशी मंडळी असत. " मी हि लवकरच या वर्गांत आलों. १८२९–३० या सालीं या शाळेंत मोठा फेरफार झाला." या शाळेवर जगन्नाथशास्त्री क्रमवंत व बापू छत्रे असे दोघे मुख्तसर—तपासणीस होते. ( राजारामशास्त्री भागवत कृत बाळशास्त्री० चरित्र ) पैकीं " सदाशिव काशिनाथ छत्रे यांनीं पेन्शन घेतलें व त्यांचे जागेवर बाळ गंगाधरशास्त्री यांची ५० दरमाहावर नेमणूक झाली." ( दादोबा; आत्मचरित ).

ऽ मुंबईचे प्रसिद्ध नाना शंकरशेट यांनीं बापूंच्या शिफारशीवरून ' बाळूस ' ( जांभेकरांस ) आश्रय दिला. ( श्री. ना. ज. शंकरशेट चरित्र पृ. ७९ ).

बाळशास्त्री अत्यंत तैलबुद्धि होते. असें सांगतात कीं, लहानपणीं रस्त्यांत एकदां दोघा गोऱ्यांची मारामारी झाली ती यांनीं पाहिली. यांस साक्षीस बोलाविलें होतें त्या वेळीं यांना इंग्रजी मुळींच येत नव्हतें. परंतु यांनीं दोघांचे हातवारे व ध्वनि इतके हुबेहुब वठविले कीं, तेवढ्यावरून मॅजिस्ट्रेट यांस कलागतीचें स्वरूप समजून आलें व तो बाळूच्या बुद्धिप्रभावामुळें थक्क झाला; व त्यानें या मुलाची विद्याखात्याकडे शिफारिष केली. " ते मुंबईस आल्यावर प्रो. आर्लिबार यांजपाशीं गणितशास्त्र शिकले. बाळशास्त्री यांची कुशाग्रबुद्धि पाहून प्रो. साहेब त्यांची फार तारिफ करून होते." (दा. आ.)

इ. स. १८२८ चे सुमारास विद्याभ्यास पुरा झाल्यावर पुढें ते आर्लिबार यांचे अस्सिस्टंट म्हणून गणिताध्यापकाचें काम एल्फिन्स्टन विद्यालयांत करूं लागले तेव्हां पहिले एतद्देशीय प्रोफेसर म्हणून त्यांचा सर्वत्र गौरव व लौकिक फार झाला! आधींच जुन्या व्याकरणन्यायादि शास्त्रांत त्यांची गति अकुंठित होती व नवीन विद्येंत हि ते अष्टपैलू होते. इतिहास व भाषा यांत त्यांचा हातखंडा असून रसायनादि शास्त्रांची त्यास मनस्वी आवड असे. गणितांत तर त्यांची गति अत्युत्कृष्ट च होती. (राजारामशास्त्री–जांभेकरचरित्र) दादोबांचे लिहिण्यावरून दिसतें कीं, बापूंच्या मागें सोसायटीचे मदतीस सक्तार म्हणून बाळशास्त्री यांची नेमणूक झाल्यावर जर्व्हिस साहेबानें बाळशास्त्री जांभेकर व बाळशास्त्री घग्वे व खुद्द जर्व्हिस यांच्या एंजिनीअरिंग स्कुलावरील त्यांचे असिस्टंट जगन्नाथशास्त्री क्रमवंत ह्यांजकडून, विलायतेंत नुकताच प्रसिद्ध झालेला लॉर्ड ब्रौह्यामचा A Treatise on the object, advantages and pleasures of knowledge नामक जो इंग्रजी ग्रंथ त्याचें मराठींत व पुढें (१८३० त) गुजराथींत भाषांतर केलें व त्याचें नांव विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष असें ठेविलें. " हा ग्रंथ साताऱ्चे महाराज श्रीमंत प्रतापसिंह राजे छत्रपति यांस आदरानें नजर केला होता " जर्व्हिसनें याप्रमाणें ब्रौह्याम व छत्रपति यांची मर्जी खूष केली. "हा ग्रंथ मराठींत फारच प्रौढ व सुरस झाला होता. असें असतां याची दुसरी आवृत्ति कधींच झाली नाहीं! असे सरस प्रौढ ग्रंथ आज इतकी विद्या वाढली आहे तथापि फारसे पहाण्यांत येत नाहींत. असा मागल्या ग्रंथकाराचें नांव, त्याची कृति यांस बुडविण्याच्या बुद्धीस इतक्यांतच आरंभ झाला." (दा. आ.) पुढें १८३२ चे सुमारास "बाळशास्त्री यांनीं अक्कलकोटच्या दोन धाकट्या राजांस प्रतापसिंह महाराज छत्रपति

सातारकर यांच्या इच्छेवरून (मूळ आत्मचरित्र) इंग्रजी शिकविण्याचें काम २०० रुपयांवर वर्ष दीड वर्ष केलें व १८३४ त एल्फिन्स्टन् साहेबांच्या नांवानें तीन लाख रु. जमवून जी मोठी विद्याशाळा Elphinstone College उभी केली तिच्यांत प्रो. मुलर व हार्कनेस ह्या पहिल्या गुरूंचे हाताखालीं उपगुरूचें काम करण्यास ते परत मुंबईस आले. यावरून आर्लिबारचा व त्यांचा संबंध कै. राजाराम शास्त्री भागवत लिहितात त्याप्रमाणें १८२९ त आला नसून १८३४ त आलासें ठरतें. त्यांचा द्वितीय संबंध पराडकरांच्या म्हणजे मोरोपंत कवीच्या घराण्याशीं झाला होता. एल्फिन्स्टन विद्यालयांत ते १८४२ पर्यंत अध्यापन करीत होते. १८४२-४४ या सालांत यांजकडे Educational Inspector चें काम होतें. मग १८४५ त होतकरू शिक्षक तयार करण्यासाठीं त्यांच्या सूचनेवरून Normal School सरकारानें काढिलें व हें जादा काम शास्त्रीबोवांस सांगितलें. या कामीं शास्त्रीबोवा रात्रंदिवस श्रम करीत. मे महिन्यांत मुलांस कान्हेरी येथील लेणीं दाखवून तेथील लेख वाचावयास त्यांनीं शिकविलें. रात्रीं Prismatic Compass घेऊन तारे व त्यांची अंतरें ते विद्यार्थ्यांस मोजून दाखवीत. असे फार श्रम व काळजी करीत. "ते एकदां प्राचीन लेखांचा शोध लावण्याकरितां—"श्रमपरिहारार्थ" असें रा. रा. भा. लिहितात—कणकेश्वरास गेले होते तेथें त्यांस उष्णता लागून ताप आला व ते दुखणाईत झाले; व त्या दुखण्यांत इ. स. १८४६ च्या एप्रिलांत (राजारामशास्त्री १७ मे ला म्हणतात) ते मुंबईत कोळभट वाडींतील आपल्या रहात्या घरांत निवर्तले." (दादोबा) त्यांचें वय यावेळीं अवघें ३५ होतें म्हणजे ऐन तारुण्याच्या उमेदींत ते वारले. त्यांची प्रकृति प्रथमपासून च सशक्त नसली तरी निकोप होती. बापू छत्रे ४२ व्या व त्यांचे हे पट्टशिष्य ३५ वे वर्षी वारले, हें देशाचें दुर्भाग्यच नव्हे तर काय! यांच्या पश्चात् घरीं फार स्थिति कठीण झाली. घरांत संचय नव्हता. अखेर खटपटीनें सरकारांतून यांचे कुटुंबास व मुलास दरमहा रु. ५० मिळूं लागला. परंतु वर्षा दोन वर्षांच्या आंत बिचारीं दोघें मृत्युमुखीं पडलीं.

बाळशास्त्री यांचे एक सहाध्यायी प्रसिद्ध **भाऊ महाजन** नांवांचे होते. इ. स. १८४० त या भाऊंनी **प्रभाकर** नामें एक वर्तमानपत्र काढिलें. तें "प्रति रविवारीं नियत असतें, त्याचीं पृष्टें ८ आहेत आणि किंमत वर्षाचे १२ रुपये पडतात. या पत्रांत इंग्लिश पत्रांतून बरेंच वर्तमान उतरून घेतलेलें असतें. (अमेरिकन मिशन

पंचांग १८४७ )" याच भाऊंच्या साहाय्यानें "बाळशास्त्री यांणी एक मोठें स्मरणीय काम केलें तें असें. त्या वेळेस मुंबईत मराठी व इंग्रजी भाषेंत नेटिव्ह लोकांनीं चालविलेलें असें एक ही वर्तमानपत्र नव्हतें. तेव्हां एक दोन पैकेवाले गृहस्थ मिळून **दर्पण** या नांवाचें मराठींत व इंग्रजींत वर्तमानपत्र काढण्याचें योजिलें व त्याचे बाळशास्त्री यांस एडिटर नेमिलें शास्त्रीबोवांनी तें काम मोठ्या मनोत्साहानें कांहीं **दरमहा न घेतां** पत्करिलें " (दादोबा.) या पत्रांत बाळशास्त्री **इंग्रजी लिहीत** व भाऊ महाजन मराठी लिहीत ( रा. रा. भा. ) "त्या वर्तमानपत्रानें त्यांची मोठी कीर्ति वाढविली व त्या वेळचे गव्हर्नर सर जेम्स् कार्नाक यांहीं त्यांच्या लिहिण्यावरून खुष होऊन त्यांस जस्टिस् ऑफ् धि पीस ही पदवी दिली. ही पदवी तेव्हां थोड्या पैकेवाल्या नेटिवांस च मिळत असे. आतां बाळशास्त्री यांची मुंबईतील बडे लोकांत गणना झाली." त्या वेळीं पांच च जे. पी. होते व त्यांस मोठा मान होता. "आतांप्रमाणें ( १८७० ) जो उठला तो आणि ज्याची सरकाराशीं थोडी शीग तो असे भाराभर जस्टिस तेव्हां होत नसत " ( दादोबा. )

भाऊ महाजन यांनी त्या वेळीं 'घोकी भटां' वर झोड उठविली. "सरकारी नोकरी न पतकरितां या अनेकभाषाकोविद पंडितानें पत्र फार शैलीनें व चटकदारपणें चालविलें. विष्णुशास्त्री चिपळोणकरांच्या मालेनें...चटक लाविली तशीच या काळीं महाजनांच्या प्रभाकर व धूमकेतू या पत्रांनी...मराठी जाणणाऱ्यांस लाविली होती. " ( रा. रा. भा ) भाऊ महाजन यांविषयीं अधिक माहिती आम्हांस आढळली नाहीं. आश्चर्य वाटेल पण चाळीस पन्नास वर्षांपूर्वी भाऊ महाजन जिवंत असतांना सुद्धां "आम्हांस भाऊ महाजन यांचें नांव माहीत नव्हतें हें आम्ही कबूल करतों. " ( निबंधमाला. मांडे-प्रत भाग १, पृ. ३३७ ) असें खुद्द विष्णुशास्त्री यांनी लिहिलें आहे ! यावरून या वेळच्या वाङ्मयाची माहिती आज मिळविणें किती कठिण काम होऊन बसलें आहे त्याची कल्पना कांहींशी आमच्या वाचकांस येईल.

वर्तमानपत्राप्रमाणेंच **दिग्दर्शन** नांवाचें एक भारदस्त व प्रौढ मासिक हि बाळशास्त्री यांनी चालविलें होतें. हें १८३७ त निघालें. १८४१ सालचे या मासिकाचे अंक ठाणें म. ग्रं. त पाहिले. त्या अंकांतून हिंदुस्थान, इंग्लंड, चीन

इत्यादि देशांचे इतिहास प्रकरणशः येत असत ते पाहण्यास मिळतात. शास्त्रीय विषयांवर भर फार होता. चंदनदासाची गोष्ट म्हणून एक गोष्ट हि यांत आलेली आढळली परंतु या मासिकास चांगला लोकाश्रय मिळाला नाहीं व शास्त्रीबोवांस पुष्कळ नुकसान सोसावें लागलें.

बाळशास्त्री यांचे लेख व ग्रंथ:—

( १ ) बाळव्याकरण—" व्याख्या फार व्यापक असून संक्षिप्त" आहेत.

( २ ) भूगोलविद्या. ( ३ ) नीतिकथा. ( ४ ) सारसंग्रह? ( ५ ) हिंदुस्थानाचा इतिहास ह्याची प्रथमावृत्ती १८४१ त निघाली. हा मुलांसाठीं लिहिला. प्रस्तावनेंत इतिहासवाचनापासून "विचार करण्यांत मनास उद्योग आणि आनंद दोन्ही होतात' असें सांगून हा इतिहास ' पढणाऱ्यांनी ' नुसत्या तारखा, गोष्टी वाचून च स्वस्थ राहूं नये तर "त्याविषयीं विचार करीत असावें" असा योग्य उपदेश केला आहे. पृ. १५६ वर " ह्या नव्या लोकांच्या ( इंग्रजांच्या ) चातुर्यापुढें, प्राणिकौशल्यापुढें अकबर आणि औरंगजेब हे जरी पुनः जिवंत होते तरी त्यांचें कांहीं न चालतें " असें साफ लिहिलें आहे. ( ६ ) मराठी भाषेच्या व्याकरणावर निबंध ( अप्रसिद्ध व अनुपलब्ध ) ( ७ ) शब्दसिद्धिनिबंध ( भाऊ महाजन व बाळशास्त्री मिळून ) ( ८ ) रॉयल् एशियाटिक सोसायटी व जिओग्रॅफिकल सोसायटी पुढें वाचलेले इंग्रजी निबंध—शिलालेख व ताम्रपत्र यांवर ( ९ ) *उपचंद्रिकेंतील लेख ( १० ) संध्येचें भाषांतर (प्रारंभ ) ( ११ ) ॲबरक्रांबीकृत मानसशास्त्राचें भाषांतर ( अप्रसिद्ध व अनुपलब्ध ) ( १२ ) दिग्दर्शन, दर्पण इ. तील लेख ( १३ ) इंग्लंडचा इतिहास (जर्व्हिसची इंजिनीअरिंग शाळा पुण्यास गेल्यावर त्याचे जागीं रॉबर्ट मनी आले. ) जांभेकर व मनी " उभयतांची प्रीति फार जमली. त्या वेळेस मनीसाहेबांनीं Goldsmith's History of England या ग्रंथाचें मराठींत भाषांतर बाळशास्त्री यांच्या हातून करवून तें शिलाछापावर छापिलें " (दादोबा—मूळ पृ. २५९) ( १४ ) History of British India (हिंदुस्थानांतील इंग्लिश राज्याचा

---

* उपचंद्रिका नांवाचें एक मासिक त्या वेळीं होतें. बाबा पदमनजींनीं याचें नांव उपदेशचंद्रिका असें दिलें आहे. ( अरुणोदय पृ. ३९ ) हें १८४४ त निघालें असावें. ( महाराष्ट्रीय वाङ्मयसूची पृ. २ ).

इतिहास) (टीप-पांगारकर) ( १५ ) " बाळशास्त्र्यांनी Differential and Integral Calculus म्हणजे ' शून्यलब्धि गणीत ' मराठींत तयार केलें. हा त्यांचा शेवटचा ग्रंथ " ( दादोबा ). वरील यादी रा. रा. भा. चे चरित्रावरून बहुतेक दिली आहे. क्रमांक १३ ची माहिती दादोबांवरून आहे. सारसंग्रह या नांवाचा ग्रंथ दुसऱ्यांचे नांवावर आढळतो. सबब ह्याविषयीं संशय मला वाटतो. मजजवळ बाळशास्त्री यांचें भूगोलशास्त्र ( गणित भाग ) १८३६ तलें आहे. भूगोलविद्या नाहीं. या भूगोलशास्त्रास जोडून भास्कराचार्यांच्या मताचा विचार म्हणून निबंध जोडलेला आहे. या पुस्तकांतून शेवटीं उतारा दिला आहे; त्यावरून एकदा चंद्रग्रहणाविषयीं शास्त्रीबोवांनी शास्त्रीय प्रतिपादन व्याख्यानांत केलें त्यामुळें ग्रामण्यापर्यंत मजल जाऊन त्यांची लोकप्रियता जुन्या मंडळींत कमी झाल्याची गोष्ट रा. रा. भा. यांनी दिली आहे त्याचें स्मरण होतें. या भूगोलविद्येच्या मुखपृष्ठावर " Ball Gangadhar Shastree Honorary Native Secretary to the Native Education Society, Author of the Little Grammar—"Neetikutha and translator of "Catechism on General knowledge &c. &c. " असें छापलें आहे. हें कॅटेचिझमचें भाषांतर म्हणजे सारसंग्रह असावेंसें वाटतें.

एकंदरींत विचार करून पाहिलें असतां जरी बाळशास्त्री जाडे विद्वान होते, तरी त्यांच्या हातून आमच्या मतें मराठी वाङ्मयाची कांहीं अलौकिक सेवा झाली असें वाटत नाहीं. छत्रे यांची भाषा व व ग्रंथ अद्यापि ही गोड लागतात. परंतु बाळशास्त्री यांचे ग्रंथ, बहुतेक शालोपयोगी व प्रौढ असले तरी चटकदार किंवा रमणीय नाहींत. त्यांचा शास्त्रीय शोधावर व ज्ञानावर भर फार, यामुळें त्यांचें लिहिणें गंभीर परंतु जड लागतें. त्यांचे सहाध्यायी दादोबा किंवा समकालीन हरि केशवजी किंवा गुरु बापू छत्रे यांचेप्रमाणें त्यांची लेखणी रसाळ नाहीं. शास्त्रीय वाङ्मयांत बाळशास्त्री यांची कामगिरी चांगली झाली. तथापि हरि केशवजींच्या शास्त्रीय ग्रंथांप्रमाणें त्यांचे ग्रंथांत मोहकपणा व कोमलता नाहीं. विद्वत्तेंत व बुद्धिमत्तेंत मात्र बाळशास्त्री या सर्वांहून निःसंशय वरचढ होते.त्यांची दांडगी पाठशक्ति, स्मरणशक्ति व शोधबुद्धि यायोगें त्यांची छाप त्या वेळीं जबरदस्त बसली होती. ते

विद्यार्थ्यांस अनेक प्रकारें मदत करीत व सार्वजनिक कार्यांत हि मन घालीत. डॉ. अनंत चंद्रोबा व बाबा साने इत्यादि विद्यार्थ्यांस त्यांनीं फार मदत केली व राघोबा जनार्दन वगैरे मंडळींस नेटिव्ह जनरल लायब्ररीसारख्या ज्ञानप्रसारक संस्था स्थापण्यास साहाय्य केलें. सामाजिक सुधारणुकेविषयीं हि रे. नारायण शेषाद्रि यांचे ख्रिस्ती झालेले बंधु श्रीपाद शेषाद्रि यांस परत हिंदुधर्मांत घेण्याविषयीं बाळशास्त्री यांचा पाठिंबा होता. पूर्वांगप्रायश्चित्त हि झालें. परंतु उत्तरांग होण्यापूर्वी बाळशास्त्री यांजवर प्रामण्य झालें. हें प्रकरण पांच वर्षें चाललें होतें म्हणतात. तसेंच विधवाविवाहाविषयीं एक अनुकूल ग्रंथ यांच्याच प्रोत्साहनानें गंगाधरशास्त्री फडके यांनीं प्रसिद्ध केला. ( रा. रा. भा. ) पाणिनीच्या मराठी भाषांतराचे प्रसिद्धीस बाळशास्त्री यांनीं अडचण सांगितली, असें दादोबांनीं आत्मचरित्रांत लिहिलें आहे, तें वाचलें म्हणजे मात्र शास्त्रीबोवा नवीन सामाजिक मताचा पुरस्कार आंग राखून च करीत असले पाहिजेत असें दिसतें.

बाळशास्त्री आपणांत फार थोर पुरुष झाले यांत संशय नाहीं. " बाळशास्त्री हे काळे, ठेंगण्या बांध्याचे पुरुष होते, त्याचे नेत्र विशाळ आणि चंचळ होते. ते गंभीरपणानें नेहेमीं खालीं पहात असत, ते अल्पवयी असत तरी त्यांची चाल पोक्तपणाची होती." ( दादोबा ) त्यांची चेहेरेपट्टी भव्य—प्रसन्न—हंसतमुख व इभ्रतदार होती. ( रा. रा. भा. ) त्यांचा पोषाख म्हणजे नागपुरी रेशमी धोतरें, पांढरा अंगरखा व तांबडें लहान पुणेशाही पागोटें, एक जोडा व साधें उपवस्त्र असा असे. त्यांचें वक्तृत्व साधें पण परिणामी असे. त्यांची शोधबुद्धि विलक्षण. रवळोबा कामत नांवाचा एक कारागीर आगगाडी काडतो म्हणाला, यांनीं रुपये २०० मदत त्यास दिली. त्यांची छाप हि चांगली. क्यांडीसाहेबांचे कोशांत " काळ आला होता पण वेळ आली नव्हती " याबद्दल इंग्रजींत Death unexpected असें लिहिलें होतें, तेथें Narrow escape from death अशी सुधारणा बाळशास्त्री यांनीं सुचविली. ( रा. रा. भा. नीं ही गोष्ट उलट दिली आहे. परंतु क्यांडीकोशाचे प्रस्तावनेंत वर दिल्याप्रमाणेंच ही गोष्ट नमूद आहे. ) या चुकीखेरीज एकही असली चूक ग्रंथांत आढळणार नाहीं असा बाणा क्यांडीनें प्रगट केला आहे ! शास्त्रीबोवांस मराठी, संस्कृत, इंग्रजी, ल्याटिन या चार भाषा चांगल्या येत व हिंदुस्थानी, गुजराथी, बंगाली, कानडी आणि फारशी या भाषांचें

हि ज्ञान बरें होतें. असे ते भाषापंडित होते. अशा शोधक गुरूच्या शिष्यवर्गांत रक्तपितीवर औषध शोधून काढणारे विद्वान् डॉ. भाऊ दाजी, त्यांचे बंधु वनस्पति-शोधक डॉ. नारायण दाजी, ज्योतिषी व गणिती केरूनाना छत्रे, राजकीय पुढारी दादाभाई नौरोजी असे प्रसिद्ध पुरुष होते. गुरूच्या विद्येचें व कळकळीचें चीज करणारे शिष्य मिळाल्यामुळें बाळशास्त्री यांस आम्ही* धन्य समजतों !

बाळबोधांत कै. ओकांनीं पुढील माहिती दिली आहे, ती लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

" शिवाय हिंदुस्थानांतील इंग्लिश राज्याचा इतिहास हि त्यांनीं कितीएक ग्रंथांच्या आधारानें लिहिला. त्यांची भाषा शुद्ध, सरळ गोड आणि सहज समजण्यासारखी आहे. तींत काठिण्य मुळींच नाहीं. त्यांतलें बीज केरोपंत नाना असें सांगत कीं, इंग्रजी पुस्तकांतलें कलम मनःपूर्वक वाचायाचें, त्याचा आशय ध्यानांत आणायाचा आणि मग तो एकदम लिहावयाचा, असा शास्त्रीबावांचा पाठ असे. ते एक एक शब्द उगळीत बसत नसत आणि सामान्यत्वेंकरून सहज लिहावें तें सहज समजतें, हें तत्त्व ते जाणून होते. त्यामुळें त्यांच्या लिहिण्यांत संदिग्धता रहात नसे, चुक्या होत नसत आणि खोडाखोड करावी लागत नसे. म्हणजे त्यांना चूक कशी ती सहसा माहीत नव्हती. ती केवळ वाङ्मयांत च नव्हे; तर ज्योतिषामध्यें, गुण्यांत पंचवीस आंकडे आणि गुणकांत पंचवीस आंकडे एवढाल्या मोठ्या गुणाकारांत देखील त्यांच्या हातून चूक झालेली कधीं आढळली नाहीं."

१९०८ दिसेंबर, बाळबोध.

## हरि केशवजी

### इ. स. १८०४—१८५८

बाळशास्त्रीबोवांच्या पूर्वी सहा वर्षें म्हणजे इ. स. १८०४ मध्यें पाठारे ज्ञातींत पुरव घराण्यांत हरि केशवजी यांचा जन्म झाला. हे बाळशास्त्र्याप्रमाणेंच त्यांच्या काळांतले व त्यांच्या जोडीचे मराठीचे भक्त झाले. यांचे आजे गोपाळजी

---

*बाळशास्त्री यांचें चरित्र इंग्रजींत कोणा Political ऋषीनें लिहिलें आहे मराठींत कै. राजारामशास्त्री भागवत व कै. ओक बाळबोधकर्ते व रा. रा. बा. ना. दे. (इंदूर) यांनीं लिहिलें आहे. दादोबांचे आत्मचरित्रांत हि बाळशास्त्री यांची माहिती आली आहे.

सोनजी यांची गिरगावांत शेतीवाडी असें. ते पुण्याचे नाथसांप्रदायी हरिदास शामराजपंत तात्या केसकर यांचे समागमांत होते. ८५ वर्षांचें होऊन ते १८२२ त वारले. गोपाळजींचे चिरंजीव केशवजी हे शिल्पी होते. त्यांनींच शेणव्याचें ठाकुर द्वार मुंबईंत बांधलें ! १८५४ त ८७ वर्षांचें होऊन ते वारले. असें हरिजींचें घराणें दीर्घायुषी होतें. हरिजींस आजे गोपाळजी व मामा त्रिंबकजी व चुलते माधवजी यांची शिक्षा असे. यांनीं मोरोपंती आर्या व वामनी श्लोक पुष्कळ नित्यशः हरिजीकडून पाठ करून घ्यावे. हा च भरणा त्यांच्या पुढील अभ्यासास उपयोगीं पडला. रॉबर्ट मनींच्या मिशनरी शाळेंत यांचें प्राथमिक शिक्षण झाल्यावर मग त्यांची तैलबुद्धि व विद्याव्यासंग पाहून रेवरेंड केनी यांनीं त्यास फावल्यावेळीं उच्च प्रतीचें इंग्रजी शिक्षण देण्याचा क्रम ठेविला. मग हे जर्व्हिसच्या इंजिनीअरिंग स्कुलांत मुख्य क्लार्क झाले. तेथें असतां बाबा व्यास यांजवळ ते संस्कृत शिकले.

सन १८२९ ते ३४ पावेतों ते ठाण्यास अदालत कोर्टांत हेड्क्लार्क व मराठी ट्रान्सलेटर व मग सोलापुरचे कोर्टांत व मग सदर दिवाणी अदालत मुंबई येथें चीफ् ट्रान्स्लेटर व मध्यंतरीं १८४७ त सुप्रीम कोर्टांचे कांहीं वर्षें चीफ् ट्रान्स्लेटर या हुद्यांवर होते **उत्तम भाषांतरकर्ते** म्णूगून त्यांची सर्वत्र यथार्थ प्रख्या होती. बॉ. ने. ए. सोसायटीच्या व्यवस्थापक मंडळाचे एक सभासद ऑ. फ्यारिश यांचा हरिजींवर एवढा लोभ जडला कीं १८४१ त विलायतेस जातांना या फॅरिशसाहेबानें हरिजींस आपला " अमूल्य ग्रंथसंग्रह " बक्षीस दिला !

१८३१ ते ५१ पावेतों हरिकेशवजी हे बॉ. ने. ए. सोसायटींत ग्रंथप्रकाशक पोटमंडळाचे सभासद होते. या सोसायटींत John Vaupell वापेल व जर्व्हिस यांजकडे शास्त्रीय पुस्तकांची व्यवस्था होती. त्यांनीं हरि केशवजींकडून १८३३ त सिद्धपदार्थविज्ञान हा भाषांतरग्रंथ तयार करविला. दादोबा लिहितात:— " हरिकेशवजी यांची मराठी लिहिण्याची इतकी खुबी होती कीं, हा ग्रंथ इंग्लिश ग्रंथांचें भाषांतर असतां हि तसें त्या वेळेस कोणास वाटलें नाहीं. मूळचाच मराठी ग्रंथ असावा असें बहुतांस वाटलें. त्यावेळेस " विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष ( बाळशास्त्री जांभेकर ) व सिद्धपदार्थविज्ञान हे मोठे व सरस ग्रंथ झाले. परंतु पुढें विद्याखात्यावरील अधिकारी इंग्लिश लोक व एतद्देशीय लोक यांची देशभाषे-

विषयीं इतकी रुचि कमी होत गेली कीं, हे ग्रंथ इतके सरस असतां हि आतां त्याविषयीं कोणास कांहीं च माहिती नाहीं. " या ग्रंथांत व इतर पुढील ग्रंथांत त्यांनीं स्वकृत श्लोक, आर्या वगैरे घालून ग्रंथांची सरसता वाढविली आहे. त्या-संबंधांत कै. वि. कों. ओक म्हणतात " हरि केशवजींच्या गद्यापेक्षां पद्यांचा आम्हांस फार चमत्कार वाटतो. " इतकीं तीं गोड आहेत.

पुढें १८३७त सोसायटीच्या सूचनेवरून त्यांनीं "रसायनशास्त्रविषयक संवाद" हा भाषांतरग्रंथ केला. " यांत २५ संवाद आहेत व याचीं पृष्ठें ४८० आहेत " ( पांगारकर ) हा ग्रंथ कर्त्यानें आपला उपकारकर्ता फॅरिशसाहेब यांस " याचें अवघें मोठें भाषांतर झालें तें पंक्तिशः" शोधिलें "हे परमोकार मनोभावें आठवीत" आणि या देशावर सुवर्तमानाचा व सुखाचा सूर्य (Dawn of civilisation and happiness ) होवो असें चिंतून " सकृतज्ञतोद्देशें परम विनयें करून *अर्पिला असे. हे विज्ञप्ति शके १७५७ मन्मथनाम संवत्सर भाद्रपद शुद्ध एकादशी गुरुवार " ( हरि केशवजी-चरित्र पृ. २१ ) या ग्रंथाच्या प्रती " खुद्द सोसाईटीनें दर प्रतीस दहा रुपयेंप्रमाणें ५०० प्रति ठेविल्या. " ( सदर पृ. २३ )

१८३८त 'इंग्लांडाचा वृत्तांत' हें भाषांतर तयार झालें. हें फार लोकप्रिय झालें होतें. पृ. सं. २८२. हा " लहान सोपा ग्रंथ " पत्ररूप आहे व तो गव्हर्नर ग्रांट-यांस अर्पण केला आहे.

हरिकेशवजींचें सर्वांत नामांकित भाषांतर म्हणजे " यात्रिक क्रमण " या नांवानें प्रसिद्ध आहे तें होय. Bunyan's Pilgrim's Progress चें हें भाषांतर हि फॅरिशच्या सूचनेवरून च झालें. Pilgrim's Progress हा ख्रिस्ती लोकांचा मोठा आवडता ग्रंथ होय. याचा विषय रूपकात्मक व तात्विक असल्यामुळें भाषांतरास कठिण पडणारा आहे असें असून हरिजींनी भाषांतर सुरस

---

* या अर्पणपत्रिकेंत " आपल्या आश्रयास " केनीसाहेब यांनीं निरवून १० वर्षे झालीं याचा अर्थ आपल्या म्हणजे केनीच्या असा नाहीं. इंग्रजींत "My recommendation to your patronage by the Rev. Kenny more than ten years ago" असें स्पष्ट म्हटलें आहे. त्यावरून केनीकडे हरिजी १८३० किंवा पूर्वी गेले व १८२५ चे सुमारास केनीनें त्यांस फॅरिशचा आश्रय संपादन केला असें होतें. ( दादोबा चरित्र, आठवें संमेलन पृ. १९ )

केलें आहे असें शेवटीं दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येईल. अद्यापि हि हें पुस्तक खिस्ती मंडळी वाचत्ये व ट्रॅक्ट सोसायटीनें त्याच्या पुष्कळ आवृत्ति हि काढल्या आहेत परंतु चमत्कार पहा कीं, त्यावर हरि केशवजींचें कोठें हि नांव देखील नाहीं! ग्रंथ चांगला व मोठा आहे. यांतलीं प्रासंगिक पद्यें हि रम्य आहेत.

हरिजींचा पांचवा प्रसिद्ध ग्रंथ १८४६ त झाला. तो म्हणजे नीतिग्रंथ ऊर्फ Chamber's Moral class Book चें भाषांतर. यांत हि मनोहर गद्य पद्य दृष्टीस पडतें. एक श्लोक नमुन्यासाठीं देतों.

" जें सत्य तें सेवित नित्य जावें। महात्मता शौर्य गुणास घ्यावें। स्वदेश-प्रीतीस मनीं धरावें। नीतीस रे सौख्यद या भजावें॥ "

यानंतरचा आणि मोठ्यांतला शेवटला ग्रंथ म्हणजे "देशव्यवहारव्यवस्था" हा अर्थशास्त्रीय ग्रंथ असून तो Mrs. Marcet's Conversaticns आणि Mill यांचा ग्रंथ यांचे आधारें लिहिला आहे. तो १८५१ सालीं Deccan Translation Society नें छापविला. रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलिक हे त्या वेळीं नार्मल स्कॉलर म्हणून एल्फिस्टन कॉलेजांत प्रख्यात होते; त्यांनीं सर्व ("matter") माहिती पाहावी व हरिजींनीं भाषा पहावी. सर्व ग्रंथांला देशी रंगरूप द्यावयाचें ( The task of rendering the whole into familiar diologue adapted to the present state of native thought and information and of finding Indian illustrations was to be shared between them though the greater part of this probably falls to the lot of Hari Keshavji. ) कसबी काम हरिजींवरच फार करून पडलें. हें भाषांतर पुण्यास शास्त्री व प्रौढ विद्यार्थी यांच्या सभेंत वाचून तपासण्यांत येई व तें पाहून सर्वांस मोठें समाधान वाटे. ( ह. के. चरित पृ. ३०-३१ )

१८५६ त डे. ट्रा. सो. नें. सखाराम रामचंद्र व विष्णु अमृतराव यांजकडून करविलेला " शास्त्रीय ज्ञानदर्शन " हा भाषांतर ग्रंथ हरिकेशवजी व कृष्णशास्त्री भाटवडेकर यांजकडून तपासविला होता.

याखेरीज हरि केशवजींनीं "मदिरापाननिषेधक एक लहानसें माजेचें पुस्तक रचून छापलें होतें, तें ही माझ्या वाचण्यांत आहे. त्यांत मद्यपी लोकांस त्यांच्या मनावर ठसावयाजोगा उपदेश त्यांनीं केला होता " ( दादोबा आ. च. )*

हा हरि केशवजींच्या वाङ्मयसेवेचा वृत्तांत संतोषदायक आहे. त्यांचें सर्व काम भाषांतररूप च आहे. परंतु ही भाषांतराची अवघड कला हरि केशवजींच्या इतकी सुबक अशी थोड्यांसच साधेल. यांचीं भाषांतरें बापू छत्रे यांचेप्रमाणें मधुर आहेत. तथापि बापूंपेक्षां यांची भाषा अधिक प्रौढ पडली आहे. त्यांचे विषय शास्त्रीय होते, हें ध्यानांत घेतले म्हणजे मात्र हरिजींच्या करामतीचें कौतुक विशेष च वाटतें !

यांची विद्वत्ता बेताची होती. तथापि यांचा " स्वभाव शांत व गरीब होता. ते कोणास ही हवेसे वाटत " जर्व्हिससाहेबांना यांच्या ठिकाणीं ("only one defect, that is slowness") एकच दोष म्हणजे थंडपणा आढळला व फॅरिशसाहेबानें आपल्या सर्टिफिकेटांत यांच्या ( Inoffensive habits ) मवाळ वृत्तीची तारीफ केली आहे. यांनीं सर्टिफिकेटें पुष्कळ जमविलीं होतीं असें दिसतें ! स्वयंप्रकाश सूर्याचें तेज यांचे ठायीं नाहीं तथापि त्यांचे ग्रंथ चंद्राप्रमाणें शीतळ व सुखदायक आहेत.

" हरि केशवजी निरंतर पाद्री लोकांच्या मंडळींत जात तरी त्यांचा वेदांतशास्त्राकडेस च कल असे " केनी व फॅरिश यांनीं त्यांजकडून यात्रिकक्रमण करवून पाहिलें परंतु त्यांचें हें ग्रहण " शामराजपंत तात्यांनीं अजिबात सोडविलें". शाम-

---

*मूळ दादोबांचे प्रतींत पुढील (पृ.६९) मजकुर अधिक आहे:–" परंतु वेदांतशास्त्राचा कल बहुतकरून तन्निष्ठ लोकांचे मनास लोककल्याण करावयाचे कामांत उदासीन करावयाचा असतो म्हणून हे गृहस्थ लोकसुधारणेच्या कामांत उदासीन च होते " परंतु हरि केशवजी हे स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी, बेनिव्होलंट सोसायटी इ. संस्थास साहाय्य करीत असत व ज्ञातिसुधारणेस ही मदत करीत. दादोबा पुढें मोठें चमत्कारिक वृत्त लिहितात. " परंतु दैवगति अशी विलक्षण कीं, उत्तरवयांत तेच स्वतः त्या प्राशनाच्या स्वाधीन झाल्यासारखे होऊन मृत्यु पावले." ( मूळ पृ. ६७ )

राजपंतांनीं त्यास ज्ञानेश्वरीप्रभृति मराठी भक्तिग्रंथ आवडीनें ठसवून सांगितले व त्यामुळें हरिजी बचावले. एका कीर्तनांत तात्यांनीं त्यांचा

" केशवउदरसुगर्भी अवतरला पूर्ण तो कृपाळु हरी ।
सुजनजना पाहुनियां सिंधुपर्णे येत ज्या कृपालहरी ॥"

अशी आर्या रचून गौरव केला. यावरून हरिजींच्या रसिकतेचें व श्रद्धालुपणाचें श्रेय तात्या यांस पुष्कळ दिलें पाहिजे. तात्यांवर हरिजींची भक्ति जडून त्यांनीं त्यांवर बरी च कविता ही केली होती. हरिकेशवजींचे कांहीं धार्मिक हस्तलेख त्यांचे चिरंजीव रा. रामचंद्र हरि यांनीं चरित्रांत दाखल केले आहेत, त्यांवरून ते पुढें निष्ठावंत हिंदुच राहिले असें दिसतें. "नित्य ज्ञानेश्वरीचा पाठ" ते "करीत असत व ही उपासना त्यांचेकडेस अझून परंपरेनें चालत आहे" ( पृ. १८ )

अशा रीतीनें भजनपूजनांत काळ घालवीत असतां १८५८ सालांत त्यांस अतिसार होऊन आषाढ शु० १ तारीख ११ जुलै रविवार रोजीं त्यांनीं हा लोक सोडला व कीर्ति मागें राखिली !

## दादोबा पांडुरंग ( १८१४-१८८२ )

" मुंबईत माझा जन्म वैशाख वद्य ४ शके १७१६ ( १८१४ इ. स. ) या दिवशीं झाला. माझ्या तीर्थरूपांचें नामाभिधान पांडुरंग व मातुश्रींचें यशोदाबाई. आमचें मूळचें राहणें वसईजवळ तरखड.... तेथें आमचे पणजे... नारायणशेट यांचें दुकान होतें ... आजे यशवंत ... मुंबईस रोजगारानिमित्त आले ..." वडिलांनीं संसार " चांगल्या थाटास आणिला ... आमच्या आईस ... पंधरा मुलें झालीं, सर्वांत ज्येष्ठ मी " अशी हकीकत स्वतःचे आत्मचरित्रांत दादोबांनीं दिली आहे. सदरहू आत्मचरित्र दादोबांनीं १८७०-७१ चें सुमारास लिहिलें असून अतिशय मधुर व मनोहारि आहे. याचा कांहीं भाग सुप्रसिद्ध वाङ्मयसेवक रा. रा. लक्ष्मणरावजी पांगारकर यांनीं आठव्या साहित्यसंमेलनांत प्रसिद्ध केला. प्रस्तुत बाकीचा राहिलेला भाग मीं त्यांजजवळून मागून आणिला आहे. तो व इतर माहिती पाहतां रा. पांगारकर यांजकडून संपादण्यांत आलेला भाग व त्यांतील मजकूर जरा आगेमागें झालेला आहे. रा. पांगारकर यांनीं जो भाग अप्रसिद्ध ठेवला त्यांत दादोबांची च खुद्द चरित्रकथा आहे, त्यातून कांहीं भाग मी पुढें

उताऱ्यांत देत आहें व कमीअधिक वाटला तो स्थळोस्थळीं साधेल तितका दाखल केला आहे. दादोबांप्रमाणें जर तत्कालीन लोकांचीं कांहीं चरित्रें, टाचणें, टिपणें वगैरे उपलब्ध होतील किंवा दपर्ण, प्रभाकर इत्यादि पत्रें व दिग्दर्शनादि मासिकें हि सांपडतील तर त्या काळचा वाङ्मयेतिहास चांगला सजवितां येईल.

दादोबांनीं आपल्या आत्मचरित्रांत आपल्या शिक्षणाची बरीच मौजेची माहिती दिली आहे तीवरून ते प्रथम कांहीं खाजगी गांवठी शाळांत व कांहीं घरीं तीर्थरूप यांजजवळ शिकले. तसेंच त्यांची आत 'आकू' हिनें त्यांना श्लोक शिकविले व आईनें कहाण्यांची गोडी लाविली. या *गांवठी शाळेंत असतां कोणा पाद्र्यांनी यांस एक छापील पुस्तक बक्षीस दिलें त्याचें नांव 'मात्थीउकृत'. ही गोष्ट इ. स. १८१९।२० ची असावी. नंतर (१८२३) यांस वॉटकिन् नांवाच्या म्हाताऱ्या इंग्रजी 'काबाडी' मास्तराच्या शाळेंत घातलें पुढें १८२५ त सोसायटीच्या शाळेंत हे जाऊं लागले ! तेथें बापू शास्त्री शुक्ल यांची शिक्षा लाभल्यामुळें तीर्थरूपांच्या भजनी दिनचर्येनें उत्पन्न झालेली 'मराठी भाषेविषयीं गोडी' अधिक वाढली. १८२८ त दादोबांचें लग्न थाटांत झालें. घनश्याम बाबा सोनगीरकर या प्रेमळ सत्पुरुषाचा दादोबाच्या वडिलांनी अनुग्रह घेतला होता. त्यांचा एक शिष्य भाई परभू होता त्याचा प्राकृत पोथ्या लिहविण्याचा कारखाना होता. "यांचा कित्ता घेऊन आमच्या तीर्थरूपांनी आपल्या शक्तीप्रमाणें बऱ्याच प्राकृत ग्रंथाचा संग्रह...माझ्या जाणतेपणाच्या अगोदर करून ठेवला होता." अशा रीतीनें मुख्यतः घरचें वळण व नंतर शाळेंतील शिक्षा दादोबांचे ठायीं मराठी वाङ्मयाविषयीं प्रेम उत्पन्न करण्यास कारण झाली.

येथें शिकत असतांच सुमारें १८३४ चे सुमारास दादोबांनी व्याकरण रचण्याचा हेतु धरला. "त्या काळीं माझें वय विसाच्या आंत होतें आणि त्या काळीं मराठी ग्रंथांचा तादृश प्रचार हि नव्हता." (मूळ आ. च.) "आलीकडेस [१८५० चे सुमारास ] दर्पण व तदनंतर प्रभाकर हीं वर्तमानपत्रें निघाल्यापासून मराठींत लिहिण्याचा प्रघात फार वृद्धिंगत होऊं लागला, यामुळें व्याकरणनियमांची आवश्यकता ही त्या च मानानें अधिकाधिक वाढूं लागली" ( दादोबा—म. भा.

---

* दादोबांनी गांवठी पंतोजींचें चित्र रेखाटलें आहे तें पाहतांच हरिभाऊंच्या 'मी' मधील मुख्य सरांची मूर्ति डोळ्यापुढें चट्कन् उभी राहते !

व्याकरण दु. आ प्रस्तावना. आपलें पहिलें व्याकरण हा ग्रंथ दादोबांनी "इ.स.१८३६ च्या आरंभीं शेवटास नेऊन गणपत कृष्णाजी यानी शिलावर छापविला."(मूळ आ. च.) त्याच्या सर्व प्रती सोसायटीनें घेतल्या. १८३४–३५ या वर्षांत मनी साहेब रजेवर गेले व त्यांचे जागीं 'पोप हे सक्रतार झाले.' त्या वेळीं माळव्यांत जावऱ्याचे नबाब व झाबुआचे राजे अल्पवयी आहेत त्यांस इंग्लिश शिकविण्याचे कामावर कोणी लायख इसमांचा शोध चालू होता. दादोबांना प्रवासाची हौस. त्यांनीं तें काम पत्करून १८३५ त दादोबा निघाले ते नाशीक, मालेगांव, धुळें करीत सिंधव्याचा घाट–येथें त्यांस एक ब्राह्मण दरोडेखोर भेटला–ओलांडून इंदुरास पोंचले येथें त्यांच्या व्याकरणाची छापील प्रत त्यांचे हातीं प्रथम आली. मग यांची जावऱ्यास व नाना नारायण यांचे स्नेही यांजबरोबर होते त्यांची झाबुआस याप्रमाणें रवानगी झाली. १८३७।३९ दादोबा जावऱ्यास होते मग नबाब शादी झाल्यावर इंग्रजी शिकण्याचा कंटाळा करूं लागले; तेव्हां दादोबा मुंबईस परत आले व एल्फिस्टन् इंस्टिटयूटमध्यें असिस्टंट टीचर झाले. पुढें सुरतेस १८४०।४१ त नेमणूक झाली. तेथें अर्देसरच्या खटल्यांत यांनी त्यास मनोभावें गुजराथी भाषांतरकार म्हणून मदत दिली पण तो शेट ती स्मरला नाहीं म्हणून दादोबांनी तक्रार केली आहे.

गुजराथीप्रमाणें दादोबा फारसी हि शिकले होते. ते नऊ वर्षांचे असतांच त्यांचा एक ताजुद्दीन नामें सोबती होता. त्याला महिन्यास रु. १ ठरवून व हा "आडवा खर्च" बापाला खुषींत पाहून कबूल करून घेऊन त्याजपासून फारशी शिकून घेतलें. सुरतेस नर्भयरामशास्त्रयापाशीं ते संस्कृत पढले. ( आ. च. ) खेरीज त्यांस तेलंगी येत होतें ( बालबोध पु. ९ पृ. १७० ).

पुढें १८४६ त जांभेकरशास्त्री वारले तेव्हां त्यांचे जागीं शाळांचे सुपरिंटेंडंट म्हणून दादोबांची नेमणूक झाली. "तें काम त्यांनी फार उत्तम प्रकारें केलें" त्यामुळें पेरी साहेबाच्या शिफारशीनें ते नगरास डेपुटी कलेक्टर झाले. त्या वेळीं नाईक पठाजी या भिल्लाचें बंड झालें तें मोडून भिल्लांचीं हत्यारें घेण्याचें काम वगैरे केल्यामुळें दादोबांची सरकारांत वाहवा झाली. पुढें १८६१ त दादोबांनी पेन्शन् घेतलें. त्यांचे मित्र नानाभाई हरिदास यांनी त्यांस कापसाचे व्यापारांत घरबसल्या एकदा दहा हजार रु. मिळवून दिले होते. पेन्शनी नंतर त्यांचा पैसा व्यापारांत फार बुडाला. पेन्शन घेण्यापूर्वी रजेवर असतां खंडेराव

महाराज बडोदेकर यांचेकडे त्यांनी नोकरीची खटपट केली. पण तेथें त्यांचें बूड फार दिवस दरबारी मंडळींनी टिकूं दिलें नाहीं. मग पुन: वशिला लावून दादोबा मराठी ट्रान्सलेटर बनले ! दादोबांची सरकारसेवा ठीक झाली. पण त्यांची मुख्य भाषासेवा म्हटली म्हणजे त्यांचें महाराष्ट्र भाषेचें व्याकरण ( १८३६ ) ही होय. या व्याकरणावरून " दादोबांचे नांव आमच्या राष्ट्रामध्यें चिरायु झालें आहे " ( बा. बो. ) इतकें " कीं साधारणपणें दादोकृत ह्याचा अर्थ मराठी भाषेचें व्याकरण असा झाला आहे " १८५० त दुसरी आवृत्ति काढतांना व पुढें पुष्कळ वृद्धि या ग्रंथाची त्यांस करावी लागली. "ह्या शिवाय शिशुबोध, माबाईच्या ओंव्या, धर्मविवेचन अशीं किती एक लहान लहान पुस्तकें त्यांनी लिहिलीं आहेत ". दादोबांनी यशोदापांडुरंगी या नांवाची एक विस्तृत व रसिक टीका मोरोपंतांच्या श्लोक केकावलीवर (इ. स १८६५) करून आपल्या मातापित्यांचें फार उत्तम स्मारक करून ठेविलें. पण त्याचा विचार पुढील प्रकरणांत करूं. मुंबई विद्यापीठ ( University ) स्थापन झाल्यापासून तेथें B. A. चे परीक्षेस प्रथम मराठी विषय होता, तेथें दादोबा परीक्षकांत असत. धर्मसंबंधीं मतें दादोबांचीं प्रथम प्रथम जरी तत्कालीन परिस्थितीमुळें किंचित नास्तिक वळणावर जाण्याचा रंग होता. मुंबईत जी परमहंसमंडळी स्थापन झाली होती त्यांत दादोबा प्रमुख होते. त्या मंडळीस त्यांनी प्रार्थना रचून दिल्या होत्या; तथापि या मंडळीशीं ते कधीं च समरस झाले नाहींत. ( अरुणोदय–बाबा पदमजी पृ. ९४ ते १०६ पहा. ) दादोबांचे गुरु बापूशास्त्री शुक्ल त्यांस एकदा ( सुमारें १८४५ ) सुरतेंत भेटले तेव्हां म्हणाले, " दाद्या ! तुझें केलेलें व्याकरण मीं पाहिलें आणि मला फार संतोष झाला, तसें तुझे दुसरे गुण व विद्वत्तेचा स्तव ऐकून मला फार संतोष होतो. परंतु गड्या ! तूं नास्तिक झालास रे ! तुझी आपल्या धर्मावर निष्ठा नाहीं हें ऐकून मी दिलगीर आहें. " ( दा. आ. च. पृ. १७ ) परंतु " ते आलीकडे परमार्थाकडे वळले होते " ( बा. बो. पृ. १७४ ) व अखेर* १८८२ इ. स त १७ आक्टोबरांत मुंबईस मरण पावले. त्यांनी मरणापूर्वी एक आत्म-

* डॉ. आत्माराम पांडुरंग प्रभृति दादोबांचे बंधु हि सर्व चांगले प्रतिष्ठा पावले होते. पैकीं भास्कर नांवाच्या बंधूंनी Hindu या सहीखालीं वर्तमानपत्रांत इंग्रजींमधून "उद्दाम" परंतु उत्कृष्ट लेख प्रसिद्ध करून सरकारांत मोठी खळबळ उडवून दिली होती.

चरित्र लिहून ठेवण्यास सुरवात केली होती तें रा. पांगारकर यांनी संपादन केलें व अंशतः प्रसिद्ध हि केलें आहे. त्यांत दादोबांनी आपल्या व्याकरणादि ग्रंथाप्रमाणें प्रौढ व संस्कृती भाषा न लिहितां घराऊ व प्रेमळ भाषापद्धती अंगिकारिली आहे. येथें एक च गृहस्थ कुशल असल्यास विषयानुरूप आपली भाषा कशी बदलूं शकतो याचें प्रत्यंतर उत्तम मिळतें. त्यांच्या व्याकरणावरून "दादोबा हे आमचे पाणिनि आहेत ( बा. बो. )" असें म्हणण्याचा रिवाज आहे. परंतु तो कोणी आज परमार्थतः ग्रहण करील असें वाटत नाहीं. तथापि 'दादोकृत' १८३६ त जन्मल्यापासून भाषेला एक नवीन स्थैर्य येऊं लागलें व दादोकृताचा अंमल मराठीवर सुमारें ३०।४० वर्षें राहिला. असा परिणामी ग्रंथ झाला म्हणून आम्ही त्याच्या जन्मापासून नवें खंड कल्पिलें आहे तें वाचकांस उचित वाटेल अशी आशा आहे.

दादोबांनी जरी फार लिहिलें नाहीं तरी लिहिलें तें **सर्व स्वतंत्रपणें लिहिलें**. हरि केशवजींप्रमाणें किंवा बाळशास्त्र्याप्रमाणें भाषांतररूप लिहिलें नाहीं हें लक्ष्यांत घेतलें म्हणजे त्यांच्या कामाचें महत्व कळेल. खेरीज जे त्यांनी लिहिलें तें सरस, प्रौढ व उपयुक्त लिहिलें.

## परशरामपंत तात्या (१७९९-१८७४)

दादोबांहून बाळशास्त्री, व बाळशास्त्र्यांहून हरि केशवजी व हरि केशवजींपेक्षा परशरामपंततात्या गोडबोले हे वयानें वडील होते. यांचा जन्म वाईस शके १७२१ (इ. स. १७९९) त झाला व ते श. १७९६ त वारले. गोडबोले घराणें मूळचें पावसगोळपेचें. पुढें यांचे पणजे बळवंतराव हे वाईस रास्त्यांचे आश्रयास राहिले. आजे परशुरामपंत यांनीं कर्नाटककडील स्वाऱ्यांत पैका सांठविला परंतु वडील बळवंतराव यांस प्रतिकूल परिस्थिती पडल्यामुळें पुण्यास यावें लागलें. त्यांचे चिरंजीव म्हणजे आमचे तात्या यांचें बाळपण व शिक्षण वाईस च झालें. यांनीं मोडी अक्षर फार सुंदर केलें होतें व नारायणशास्त्री देव यांजजवळ ह्यांनीं संस्कृत म्हटलें. ह्यांचे वडील बंधु दाजीबा यांनीं तात्यांस मराठी कवितेची गोडी लाविली. "पुढें प्रपंचाच्या निर्वाहार्थ तात्या पुण्यास येऊन आपले मातुल जोग यांच्या पेढीवर कारकून राहिले." त्यांच्या मराठीच्या ज्ञानाची कीर्ति कळून आल्यामुळें बॉ. ने. ए. सो. नें जो कोश तयार

केला त्याच्या संपादकीय पंडितमंडळांत तात्यांची योजना झाली. पंडितमंडळाचा कोश होतांच त्यावरून मोल्सवर्थ-क्यांडी यांचें कोशाचें काम सुरू झालें. त्यांत मोल्सवर्थ थकून विलायतेस गेल्यावर इंग्रजीमराठी कोशाचें सर्व काम त्यांनीं कँडीकडे पाठविलें. तें कँडी यानें १८४७त पुरें केलें. या कामीं तात्यांनीं कँडीस इतकी मदत केली कीं तात्या म्हणजे क्यांडींचे उजवे हात होऊन राहिले. या भागांत जिचें वर्णन करणें युक्त होईल अशी तात्यांची कामगिरी म्हटली म्हणजे सुप्रसिद्ध **नवनीत** होय. हा "काव्यामृताचा नवनीत भेला" त्यांनीं रसिक-जनांस इ. स. १८५४त बोर्ड ऑव् एज्युकेशन मार्फत अर्पण केला. यांत "सांप्रत कविता शिकविण्याचें साधन कमी आहे तें अवश्य असलें पाहिजे ... तोच उद्देश हें पुस्तक रचण्याचा आहे" असें तात्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत लिहि-तात. शिवाय "मराठी भाषेंतील गद्य कवितेपेक्षां पद्य कविता लोकांस फार आवडते" यामुळें तात्यांनीं ही रचना केली. ती फार लोकप्रिय झाली. १८५७त दुसरी आवृत्ति अ. मराठी ट्रान्स्लेटर भास्कर दामोदर पाळंदे यांनीं कांहीं फेरफार व सुधारणा करून छापली. नवनीत ग्रंथांत "रसिक जनांस ग्रंथकर्त्याची प्रार्थना" म्हणून लिहिली आहे तीच येथें उतरतों:—

काव्यामृताचा नवनीत भेला। हा गोड लागो तुमच्या जिभेला ॥
याची तुम्ही चाखुनि घ्याल गोडी। तेव्हां सुखाची मिळवाल जोडी ॥
नाना काव्यतरुव्रजीं हुडकितां जीं जीं बरीं भावलीं।
तीं तीं वेचुनि घेतलीं सुकुसुमें पात्रांत जीं मावलीं।
त्यांची गुंफुनि रम्य माळ विबुधां अत्यादरें अर्पिली।
ती कंठीं विलसो तिणें कविसभा होवो सदा तर्पिली ॥
हे वेंचे बहुयत्नें मेळविले परशुरामतात्यानें।
ज्यानें अवलोकावे पावावी शीघ्र रसिकता त्यानें ॥

या प्रार्थनेंत तात्या मूर्तिमंत भरलेले दिसतात. त्यांची रसिकता, ऋजुता व नम्रता ह्या तिहींचें रम्य प्रतिबिंब वर स्वच्छ पडलेलें आढळून येतें. फलश्रुती तर फार बहारीची सांगितली आहे. विबुध वाचकांना तात्यांनीं "स्नेहाळ" काव्यमाळा घातली; आतां वाचकांच्या गळ्यांत उलट रसिकता च प्रत्यक्ष माळ घालील! मग वाचकांस आणखी काय पाहिजे? दादोबांनीं व्याकरणाचा भक्कम कोट बांधून

दिला व तात्यांनीं मराठी वाचकांस विलासमंदिर उभें करून दिलें; तेव्हांपासून हजारों रसिक मराठी वाचक त्या तटाच्या आंत सुरक्षित होत्साते तात्यांच्या विलासमंदिरांत यथेष्ट सुख भोगून नवनीतसेवनानें पुष्ट व हृष्ट बनलेल्या गोकुळांतील कृष्णसख्यांची स्पर्धा करीत आलेले आहेत. तात्यांच्या कामगिरीचा पुढील भाग पुढल्या प्रकरणांत पडत असल्यानें या विलासमंदिराच्या च आसपास काय वाङ्मयव्यापार सुरू होता तें आतां जरा पाहूं.

१८३६–५७ या काळांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांचा जो शोध लागला त्यावरून ज्यांचा उल्लेख वर आला नाहीं त्यांची एक यादी देतों:—

१८३७ **मरे**—इंग्लिश ग्रामरचा सारांश–राघोबा जनार्दन —बाळ गंगाधर शास्त्री यांनीं तपासलें ( ठा. ग्रं. )

१८३८ इ. स.–**बालोपदेश**–विष्णुशास्त्री ( आगाशे यादी )

इ. स. १८३८ त नाशिक मुक्कामीं **जागती जोत** किंवा शेतपोतरीत भात याविषयीं वाद. या ग्रंथाची रचना रेवरेंड सी. पी. फारार साहेब यांचा विद्यार्थी रामचंद्र अमृत दुगल यानें केली. यांत शिक्षण, ऊंस, साकर इत्यादींवर संवादात्मक रचना आहे. अखेर ख्रिस्ती मताची छटा उमटली आहे. पृ. ६० आहेत. शिळाछाप. हें बाबा पदमनजीस शाळेंत होतें ( अरुणोदय पृ. १० )

**बाळमित्र** भाग २ हा गेस्फोर्ड साहेब यांनीं इंग्रजीवरून मराठींत केला. तो 'मेजर क्यांडी साहेब यांनीं शोधिला व त्याची दुसरी आवृत्ति केशव सखारामशास्त्री ह्यांनीं तपासली ती १८५७ त छापिली. आंतील भाषा पहातां कोणा गेस्फोर्डनें अशी सुंदर मराठी लिहिली असेल हा संभव थोडा वाटतो. भाषा बापू छत्र्यांच्या च घाटाची दिसते व त्यावरून गेस्फोर्डचे नांवामागें कोणी कसलेला अस्सल कोंकणी लेखक निःसंशय उभा असावा.' ग्रंथ गोड उतरला आहे; व बाळमित्र भाग १ ला याचा च हा पुढला भाग वाटण्याइतका सांधेजोड बेमालूम आहे.

१८३९ **कित्येक जनावरांचें वर्णन**—क्यांडी ( आ. या. )

१८४० इ. स. **भाषामंजरी** ज्ञानसिंधु शिळाछापावर. संस्कृत शब्द व वाक्यें व त्यांचा मराठींत अर्थ रकाने घालून; ( मुं. ग्रं. ) शालोपयोगी.

१८४०-**महाराष्ट्र देशाचें वर्णन**-पृष्ठें सुमारें ७५. विश्रामबाग छा. पुणें-डफचा सारांश इंग्रजींत दे. अ. इजदेल यांनीं केला "त्याचें मराठी भाषांतर सरकारी इंग्रजी शाळेंतील विद्यार्थी कुशाबा लिमये यांणी करून तो ग्रंथ विद्येचे मर्मज्ञ आणि विद्येच्या वृद्धीविषयीं परम दक्ष जे मे. क्याप्तन् क्यांडी सा. बहादुर पाठशाळेचे सु. यांस नजर केला आहे." संक्षेपबखर म्हणतात (जोशी गो. बा. प्रवास पृ. ८ इ. स. १८४६ तील वसई शाळेंत शिकवीत त्या पुस्तकांची यादी) ती ही च दिसते.

इ. स. १८४० मराठी आणि इंग्रजी **क्रियापदांच्या काळांचा परिपाठ**-अमेरिकन मिशन प्रेस (ठा. ग्रं.) शालोपयोगी.

१८४२ **सृष्टिजन्य ईश्वरी ज्ञान**-पांडुरंग गणोबा (आ. या.)

१८४२ **गणित**-मुंबईंत आमरिकान मिशन छा. छा. छपाई सुंदर. यांत त्र्यस्त्र, चतुरस्त्र, समबव्हस्त्र इ. शब्द, triangle rectangle इ. अर्थी योजिले आहेत, 'सुची' म्हणजे Cone आणि ' छिन्न सुची, म्हणजे conic section काढून दाखविला आहे. Cylinder ला वर्तुळज म्हटलें आहे. परिभाषा अद्यापि अस्थिर च होती.

१८४५ **संस्कृत वाक्यरत्नावली**— सदाशिव अनंतशास्त्री लेले त्र्यंबककर-याची संस्कृत वाक्यरचना शानदार आहे व शेवटीं लहान कोश आहे.

१८४५ **वृंदसतसयी**—केशव बाजी परचुरे (आगाशे यादी)

इ. स. १८४६ **विद्योपक्रमाचा** ग्रथ-हा मॅक् कुलॉकच्या कोर्स ऑफ् रीडिंगचे धर्तीवर रचलेला. रचणार महादेव मोरोजी व नाना मोरोजी. ग्रंथ शालोपयोगी पण बोधप्रद व मनोरंजक लिहिला आहे. यांजबद्दल कांहीं झटापट झालीसें दिसतें. ती पुढें यथास्थलीं येईल.

१८४६ **खगोलविद्या**—क्यांडी (आ. या.)

१८४५ **तर्कशास्त्र**-- रामाजी गणोजी (आ. या.)

१८४६ **शेतकी आणि घरगुती व्यवस्था**—डॉ. गिब्सन्.

१८४६ शके १७६८ त गोविंद रघुनाथ केतकर यांनीं कृष्णशास्त्री साठे यांचे साह्यानें **काशीखंड** उत्तरार्ध गद्य पृ. २१५-हा ग्रंथ छापला. (मुं. ग्रं.)

इ. स. १८४७ **सारसंग्रह**—सर्व विषयांची प्रश्नोत्तर माला. शालोपयोगी. पृ. १३ वर चित्रकलेंत 'योग' शब्द योजला आहे तो चिंत्य आहे. प्रकाशक विठ्ठल सखाराम अग्निहोत्री. या नांवाचीं किती पुस्तकें आहेत.

इ. स. १८४७ **भागवताची बखर**—( आगाशे यादी )

१८४८ **मराठी भाषेचें व्याकरण**—आमेरिकन मिशन अहमदनगर, दहा बारा पंडितांची मतें मिळवून लिहिलें व मुंबईस छापिलें; पृ. ११०; बरें आहे.

१८४९ **लक्ष्मीज्ञान**—जर्व्हिस (आ. या.)

१८४९ **हिंदुस्थानांतील इंग्लिशांच्या राज्याचा इतिहास**—मुंबई अमेरिकान मिशनांत छापला. सातारच्या छत्रपतीचें राज्य गेलें तें योग्य झालें असें ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे. पृ. २७४.

१८५० **वाचनपाठमाला**—कर्ता मेजर क्यांडी-यानें "Pandit Parsuram Pant Gorbole" यांचे आभार मानले आहेत व तीन गोष्टी मूळ "Krishna Chiplonker, the Head pupil of the English department of the College" यानें लिहिल्या म्हणून कौतुकानें मुद्दाम नमूद केलें आहे.

१८५० **गायनप्रकार**—भाऊशास्त्री अष्टपुत्रे-( आगाशे या. )

१८५० **व्याकरण**—गंगाधरशास्त्री फडके ( माग आलें )

१८५० **यंत्रशास्त्र**—शंकरशास्त्री गोखले ( आ. या. )

१८५१ **हिंदुस्थानचा इतिहास**—एल्फि. वरून. वि. ना. मंडलीक ( आ. या. )

१८५१ **पुष्पवन**—सादीच्या गुलिस्तांतील "सेवटच्या अध्यायाचें मराठी भाषांतर "यंत्रज्ञान वगैरे ग्रंथ करणाऱ्यानें केलें" आणि ज्ञा. प्र. पुणें येथें छापलें. प्रस्तावना विचारयुक्त आहे. उ० "जरी याच देशांत या गोष्टी घडल्या आहेत तरी त्याची शुद्ध लोकांस नाहीं याचें कारण अज्ञान फार जहालें आहे व विद्या फार कमी जहाली. ज्या प्राचीन काळीं हिंदु लोक विद्येवर चित्त देत होते तेव्हां असे वेडे नव्हते. त्याणी त्या समयीं जितका शोध लागेल तितक

काढला आहे......आलीकडे दोन तीन हजार वर्षे या देशांतील लोकांस ईश्वर इच्छेनें गाढ निद्रा लागून सर्व विसरले व त्याचा कारभार त्यांस आटोपेनासा जसा वृद्ध मनुष्यास हात द्यावा लागतो तद्वत या लोकांस सर्व विद्या शिकवून तयार केले पाहिजेत तेव्हां हे भानावर येतील व भ्रांती जातील."

१८५१ **कर्तव्यकर्माचा विचार**-- क्यांडी (आ या.)

१८५१ **परमहंसमतप्रशंसा**–(आ. या.) [काव्य? अरुणोदय पृ. ९८]

१८५१ **शब्दालंकार**—नारो भास्कर पटवर्धन (आ. या. )

१८५१ **भावचंद्रिका**—रामचंद्र शास्त्री मोडक (आ. या. )

१८५१–१८५४ (अ) **स्त्रीविद्याभ्यास,** (आ) **हिंदुलोकांच्या सणांविषयीं निबंध,** (इ) **व्यभिचारनिषेधक बोध,** (उ) **कुंटुबसुधारणा** (ऋ) **निबंधमाला** ही पांच छोटी पुस्तकं बाबा पदमनजी या लेखकानें लिहिलीं. या पूर्वी त्यांनीं नेपोलियनची शकुनवंती व बोधपर निबंध छापले होते. स्त्रीविद्याभ्यास निबंधावर खुष होऊन पुण्याच्या ज्ञानप्रकाशकर्त्यांनीं बाबांस " एक चर्मी जोडा व पितळी वाटी बक्षीस पाठविली." (अरुणोदय प १२२।१२३ पहा.)

१८५२ **भारतखण्डपर्व**—(हिंदु॰ प्रा॰ इतिहास)–(आ. या. )

१८५२ **हिंदुधर्मतत्त्व**—गंगाधरशास्त्री फडके (कोशकर्त्या पंडितांपैकीं) यांत हिंदुधर्माची सर्वत्र पायमल्ली चाललेली पाहून अंतःकरण तुटून गंगाधर शास्त्री म्हणतात (पृ. १६) " गोपीनाथ शास्त्री आगाशे (संस्काररत्नमालेचे विद्वान कर्ते] त्र्यंबकशास्त्री शालग्राम–मयुरेश्वर शास्त्री साठे (पुण्याचे कृष्णशास्त्री यांचे प्रसिद्ध गुरु] इत्यादि मंडळी असून कोणी च धर्मरक्षणार्थ ग्रंथ करीत नाहीं." (मोरभट दांडेकर शाक्तपंथी असू त्यांचें खंडण 'फडकोपाह्वसुरिसुनु गंगाधरशास्त्री यांनीं केलें होतें—अरुणोदय पृ. १२५।२६) असे निराशेचे उद्गार काढून हिंदुधर्मास त्रिदोष झाला आहे तरी आपल्याकडून " मी यास ग्रंथरूप औषध " दिलें असं समाधान शास्त्री मजकुर यांनीं मानलें आहे. पूर्वी " काय सांगावें? या महाराष्ट्र देशांत शिवाजी व पेशवे यांनी राज्य केलें परंतु त्याणी हिंदु लोकांस विद्वान करण्याविषीं किंवा स्वधर्माचें ज्ञान होण्याविषयीं शाळा घातल्या नव्हत्या.

त्या योगानें हे लोक उत्तरोत्तर अज्ञान होत गेले इ." असे दुःखोद्गार अंतःकरण घोकून गंगाधरशास्त्री यांनी काढले आहेत ते फार मननीय वाटतात. हें पुस्तक धार्मिक दृष्टीनें महत्वाचें आहे.

१८५२ **व्यापारदर्पण**–शंकरशास्त्री गोखले–दक्षिणाप्राइज–ग्रंथ, मोठा व व चागला उतरला आहे. भाषांतर नाहीं. (टा. ग्रं.)

१८५२ **काशिप्रकाश**— म्हणजे महायात्रावर्णन–शामराव मोरोजी ग्रंथ मोठा असून वर्णनपर चांगला आहे. स्वतंत्र.

१८५२ **स्त्रीविद्याभ्यासापासून लाभ**...रामाजी गणोजी (आ या.)

१८५२ **साक्रेतिसाचा इतिहास**— कृष्णशास्त्री चिपळोणकर–सरस चरित्र ग्रंथ

१८५२ Brief survey of History हरि रघुनाथ गाडगीळ (भाषांतर) (आ. या.)

१८५२ **यंत्रशास्त्र**--मूलतत्त्वें–गोविंद गंगाधर फडके (आ. या.)

१८५३ **शुचिर्भूतपणा**—गोविंद नारायण शेणवी कृत; चांगला, आरोग्य मंडळासारख्या संस्थांनीं पुनः छापण्यासारखा आहे.

१८५३ **कप्तान कुकचा इतिहास**—गणेशशास्त्री लेले–कनिष्ठ. १८५७ **इग्लंद देशाची बखर** भाषांतर बखर आवृत्ति ३ री के. स. अग्निहोत्री यांनीं तपासून शुद्ध केली. मग १८३४ तली मूळची हीच कीं काय? मरेवरून?

१८५३ **अलंकारविवेक**—कृष्णशास्त्री राजवाडे यांनीं केला तो दक्षिणा प्रैज कमिटीनें पसंत करून पुणें पाठशाळेकडील छापखान्यांत छापविला. यांत १५० पृष्ठांत ६५ अलंकाराचा सोदाहरण विचार केला आहे. प्रस्तावना प्रौढ आहे. "ज्या वाक्यांत किंवा काव्यांत अलंकार नाहींत त्यांचा रस सपक लागतो. अन्न हें सामान्यतः गोड खरें, परंतु त्याला मिठानें किंवा साखरेनें जशी विशेष गोडी येती, तसा अलंकाराच्या योगानें भाषणास विशेष चमत्कारिक रस येतो." "सर्व भाषेंत अलंकार आहेत" परंतु व्याकरणाप्रमाणें च "ते मराठी भाषेंत... आजपर्यंत कोणीं लिहिले नाहींत म्हणून लिहावे हें अवश्यक आहे" असें जाणोन

हा " भाषा सुधारण्याचा यत्न केला आहे. ग्रंथाकडे दोषदृष्टीनें पाहिलें असतां एक ओळ हि नडीस जाणार नाहीं आणि गुणग्रहणबुद्धीनें पाहिलें असतां दोषांचे हि गुण होतील." ग्रंथ लहान च परंतु बेतशीर व चांगला आहे. याच्यानंतर नवनीत झाले तथापि कृष्णशास्त्री यांनीं वामनमोरोपंतांतून पुष्कळ उदाहरणें दिलीं आहेत व कोठें नवीं रचलीं देखील आहेत.

इ. स. १८५४ **त्र्यंबकी**—A brief treatise on physics कृष्णशास्त्री भाटवडेकरकृत–मूळ मराठी श्लोक त्र्यंबकराज वैद्य कोल्हापूरकरकृत व त्याचें मराठी गद्य भाषांतर.

१८५४ **स्त्रीचरित्र**—रामाजी गणोजी ( आ. या. )

१८५४ फर्स्ट रीडिंग बुकचें **मराठी भाषांतर** रा. त्र्यं. शेणवी.

१८५४ School dialogues–मराठी–पांचवी आवृत्ति.

१८५४ **बुद्धिवळें खेळणारांचा मित्र**—हरिश्चंद्र चंद्रोबा जोशी सचित्र पण लेस्वन भिकार. भाषांतर इंग्रजीचें.

· १८५४ **बुधबळांचा ग्रंथ** सिताराम रावजी जुन्नरकर कायस्थ प्रभू यानीं केला तो लक्ष्मण मोरेश्वर शास्त्री (हळबे ?) आणि बाळ परशुरामशास्त्री यानीं " ह्या ग्रंथांत कांहीं ठिकाणीं अप्रक्रांत विषय होता, तो काढून व कांहीं ठिकाणीं नवा घालून व्याकरणपद्धतीनें यथामति शुद्ध करून " मुंबईत " सन्मार्ग दर्शक मंडळी " च्या छा. छा. हा ग्रंथ याच सालांत प्रसिद्ध झालेल्या बुद्धिबळें खे. मित्र या जोशी यांच्या वरील ग्रंथापेक्षां वरचढ आहे. कविता हि जोशांपेक्षां चांगल्या आहेत व मांडणी हि बरी आहे. एकाच सालीं एकाच विषयावर दोन ग्रंथ म्हणजे चुरशीचा सामनां च म्हणावयाचा ! ग्रंथांत शेवटीं सखारामबापूच्या बुद्धि-बलक्रीडापाटवाची एक गोष्ट दिली आहे.

१८५४ **लोखंडी रस्त्याचें संक्षिप्त वर्णन**-कृष्णशास्त्री भाटवडेकर–दक्षणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणाऱ्या मंडळीच्या आज्ञेवरून लार्डनरच्या रेल्वे एका –नमी ग्रंथावरून भाषांतर. लोखंडी रस्ता हें Railway चें जितकें सुरस भाषांतर म्हणतां येईल तोच मासला साऱ्या पुस्तकांत. वाटसरू " ठाण्यांत ( Station ) शिरतो आणि थेट बारनिशीच्या हपिसांत जातो तेथें तो आपलें भाडें चुकवितो

आणि चकती ( Ticket ) घेतो." त्या चकतींत त्या वाटसराला कोणत्या रांगेनें ( Train ) ......जावयाचें त्यांच्या खुणा असतात." ही भाषा पहातां किंवा Platform म्हणजे ओटा हें भाषांतर वाचतां पुस्तक भिकार ठरतें. कोठें हरि केशवजी किंवा बापु छत्रे आणि कोठें कृष्णशास्त्री भाटवडेकर किंवा हरिश्चंद्र चंद्रोबा! या पुस्तकांत जी. आय. पी. रेल्वेचा बोरीबंदर ते कल्याण फांटा उघडला त्या वेळीं हजारों लोक जमा होऊन कसे विस्मयस्तंभित झाले होते त्या प्रसंगाचें वर्णन हि बातासबेत च आहे.

१८५५ **बर्थोल्द** ( चरित्र )—भवानी विश्वनाथ कानविंदे आणि इतर (आ. या.)

१८५५ **पदार्थविज्ञान**—केरुनाना छत्रे ( आ. या. )

१८५५ **समीकरणसिद्धांत**—चनबसाप्पा ( धारवाड ) ( आ. या.)

१८५५ **अर्थशास्त्रपरिभाषा**:—कृष्णशास्त्री चिपळोणकर असिस्तंत प्रोफेसर (of Vernaculr literature) निसबत पुणें पाठशाळा यांनीं मिल्च्या ग्रंथावरून लिहिला. "केवळ युरोपखंडाला लागू आहे" तो भाग वगळून जरूर तेथें "इकडलीं उदाहरणें योजलीं आहेत." "हा संपूर्ण ग्रंथ नव्हे–तर त्यांतील एक प्रकरण आहे." ( प्रस्तावना सदर ) पृ. २९५. भारदस्त.

१८५५ **श्रीक्षत्रियवंशोद्गममाला**:—शामराव मोरोजी–पाठारे प्रभूंची माहिती शोधपूर्वक जमवून छापली आहे. पण वाचवे धड नाहींत.

१८५५ Domestic Reform—बाबा पदमनजी—( आ. या. )

१८५५ **दारु व इतर कैफी पदार्थ–निषेधक बोध**—विष्णु घनःशाम (आ. या.)

१८५५ **दारुपासून अनर्थ**— गोविंद नारायण ( आगाशे यादी )

१८५५ **भूगोलखगोल**—महादेव शास्त्री पुराणिक ( आ. या. )

१८५५ **आत्म्याचें अमरत्वाविषयीं**—गोविंद गंगाधर ( आ.यादी. )

१८५५ **अम्मल करणें वाईट**—शिवराम सखाराम खरे (आगाशे या.)

१८५६ **सारसंग्रह**—नारो भास्कर पटवर्धन ( आ. या. )

१८५६ **शंकुच्छेद**--दाजी निळकंठ नगरकर ( आ. या. )

१८५६ Evils of intemperance—जनार्दन रामचंद्र (आ. या.)

१८५६ **बैठकचावर्डी**--काशिनाथपंत काळे (आ.या.) शाळेंत शिकवीत.

१८५७ **कोलंबसाचा वृत्तांत**—महादेव गोविंद शास्त्री कोल्हटकर ( रॉबर्टसनच्या अमे॰ इतिहासावरून भाषांतर ) साधारणच. ( आगाशे यादी. )

१८५७ रे. बोएन् प्रभृतींनीं विष्णू बाबा ब्रह्मचारी यांज समवेत समुद्र-किनारीं वाद केला. त्याचा ख्रिस्तधर्मीपक्षीय वृत्तांत छापला. (द्वि.आवृत्ति १८८५)

१८५७ **वृद्धचाणाक्य**—समूळ गद्य मराठी भाषांतर.

१८५७ **कोल्हापूर प्रांताचें वर्णन**—विश्वनाथ कृष्ण ( आ. या. )

१८५७ **नलराजाची बखर**—रामचंद्रशास्त्री रचित श्री.माधवरावसाहेब पेशवे यांजकरितां लिहिलेली मोडींत छापली आहे. ( मुं. प्रं. )

१८५७ **तालुक्याचे वहिवाटीविषयीं** नगदी व मुलकी यांची प्रश्नोत्तरावळी—गणेश बाबाजी माटे—ज्ञा. प्रकाश-पुणें. कारकुनांचे उपयोगी–शेवटीं शब्दपरिभाषा आहे.

१८५७ **बोधसार**— वि. ना. मंडलीक (आ. या. )

१८५७ Atmosphere and its phenomena—भाऊशास्त्री थेऊरकर ( ग. ज. आगाशे यादी विविधज्ञानविस्तार जुलै इ. स. १८९८. )

या यादींत पुनर्मुद्रित ग्रंथ घेऊन फुगवटी येऊं दिलेली नाहीं. छत्रे आणि मंडळीच्या विशीपेक्षां या विशींत ग्रंथ पुष्कळ च झाले आहेत. अद्यापि हि शालोपयोगी ग्रंथाचा च भरणा पुष्कळ आहे; तथापि त्र्यंबकी, लोखंडी रस्ते, व्यापारदर्पण, कार्य प्रकाश, बुद्धिबळें, हिंदुधर्मतत्त्व, स्त्रीविद्याभ्यास, शुचिर्भूतपणा, अलंकारविवेक, इ. ग्रंथ पाहिले तर त्यांचे विषय शास्त्रीय किंवा सामाजिक असून ग्रंथांत स्वतंत्रपणा हि कोठें कोठें बरा च आढळतो. दादोबा, हरि केशवजी, परशुरामपंत तात्या व बाळशास्त्री ही या काळांतली चौकडी प्रमुख आहे. तथापि ती सोडली तरी बाबा पदमनजी, महादेवशास्त्री कोल्हटकर, भास्कर दामोदर, गोविंद नारायण, कृष्णशास्त्री राजवाडे, कृष्णशास्त्री चिपळोणकर वगैरे पुष्कळ च

मंडळी क्षितिजावर चमकूं लागल्याचीं सुचिन्हें या काळांत दिसतात. झालेल्या ग्रंथांचे विषय पाहतां या नवीन मंडळीचें लिहिणें जरी अद्याप कच्चें व त्रोटक आहे तथापि विषयांत वैचित्र्य बहुत आहे. झरवण्याची प्रसन्नता व माधुरी या काळच्या वाङ्मांत अर्थात् च आढळत नाहीं परंतु त्या च झरवण्यापासून सांचणीचें तळें तयार होत होतें व त्यांत शेवाळ्याबरोबर नवीन कमळें हि विकसत होतीं.

जशी मुंबईस अल्पिष्टनाचे कारकीर्दीत नवीन युगाच्या अवताराची धांदल उडाली व धडाक्यासरशी इंग्रजी शाळा निघाली तशीच पुण्यास पुणें पाठशाळा ही "अज्जम कमिशनर चापलीनसाहेब यांनीं सन इसवी १८२१ अक्टोबर महिन्यांत ... स्थापिली" ( पंचांग–अमे. मि. १८४७ ) पेशव्यांचा दक्षिणासांप्रदाय होता. त्या रकमेचा विनियोग आतां विद्यादानाकडे करावा असें ठरून पुण्यास जुन्या विद्येचाच पक्ष प्रबळ राहिला व त्याचें फळ म्हणजे विश्रामबागेंतील संस्कृत पाठशाळा किंवा Poona College; हें नांव शाळेस १८६७ त मिळालें. बाळबोध पु. ३०, पृ.२४३*) होय. "हें स्थापण्यास त्यांनीं जीं प्रयोजनें दाखविलीं आहेत तीं. हिंदुशास्त्राचे उपयोगी भाग शिकण्याविषयीं व ते सुधारण्याविषयीं या देशच्या लोकांस उमेद यावी याकरितां युरोपियन विद्येचे जे भाग या देशच्या लोकास शिकण्याची इच्छा व शक्ति आहे, त्याचें ज्ञान त्यांस व्हावयाकरितां या विद्यालयाची स्थापना केली आहे. विद्वान ब्राह्मण जसें सांगतात तसें ते ऐकतात व आचरण करितात व त्यांचें लोकांत वजन फार आहे. हल्लीं त्यांची खराबी ब्राह्मणी-राज्य बुडाल्यावरून फार झाली आहे तथापि त्यांस दुःख न होतां सरकारावर त्यांची प्रीति राहावी हा या विद्यालयाच्या स्थापण्याचा दुसरा उपयोग आहे..." ( पंचांग १८४७ ) न्याय, अलंकार इ. शास्त्रांस नऊ गुरु व नऊ उपगुरु व शंभर विद्यार्थी असा पाठशाळेचा प्रारंभ होता. राघवाचार्य पहिले मुख्तसर (मृत्यु १८३८ मग बापटशास्त्री व मग अलंकारप्रवीण मोरशास्त्री साठे. "आजपावेतों बहुधा असें होत असे कीं, ज्यांहीं या पाठशाळेंत विद्याभ्यास पुरा केला ते आपले स्वभाषेस धिक्कारीत

---

* टीपः—ता. २ जून १८५१ रोजीं ही विश्रामबाग पाठशाळा व बुधवार वाड्यांतील इंग्रजी शाळा एक केल्या, त्या प्रसंगीं अदालतजज्य वार्डीन यांनीं केलेलं महत्वाचें भाषण ज्ञानप्रकाशावरून पुणें वर्णनांत पुरवणी म्हणून घातलें आहे तें एकवार वाचणें जरूर आहे.

असत व त्यांस स्वभाषेंत शुद्ध असें एक साधारण पत्र हो लिहिण्यास किंवा वाचण्यास कठीण पडतें ... सर्व विषय ...... आतां मराठींत शिकवूं लागले आहेत, यापासून मोठा व शाश्वत लाभ होईल (पृ. २५, एक जुना रिपोर्ट ठा. ग्रं.)'' यावरून पुण्यांतील पक्षास देशीपक्ष म्हणण्यापेक्षां सुद्धां संस्कृतपक्ष म्हणणें अधिक खरें व बरें होईल. परंतु ह्या च संस्कृतपक्षाचा नवा अवतार म्हणजे देशीपक्ष (The classicists soon reappeared as Vernacularists. vide Sir P.M. Mehta Speeches p. . 8 ) तात्पर्य, मुंबईपुण्याचें पाण्यांत प्रथमपासून अंतर आहे. पुण्यास प्रारंभीं जरी शुद्ध संस्कृत पाठशाळा स्थापन झाली तरी या पाठशाळेस च पुढें इंग्रजी वर्ग क्यांडीसाहेबांनीं जोडले. या च वर्गांतील "कृष्णा चिपळोणकर" या तरतरीत विद्यार्थ्यानें रचलेले तीन पाठ क्यांडीसाहेबांनीं १८५० सालच्या आपल्या वाचनपाठमालेंत दाखल केले. या पाठशाळेस जोडून विश्रामबाग पाठशाळेचा छापखाना सुरू झाला व शालोपयोगी ग्रंथ येथून ही बाहेर पडूं लागले. ह्याच संस्कृत पाठशाळेंतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांपैकीं कृष्णशास्त्री चिपळोणकर, कृष्णशास्त्री राजवाडे व महादेवशास्त्री कोल्हटकर यांनीं मराठींत कित्येक उत्तम ग्रंथ केले.

एका अर्थानें जर १८३६ पावेतोंच्या खंडास आपण शालोपयोगी ग्रंथांचा काळ म्हटलें तरी चालेल. कारण १८३६ पुढील काळांत ग्रंथनिर्मितीचें एक मुख्य साधन जें छापखाना त्याचा प्रसार होत गेला व त्याबरोबरच मुंबईस दर्पण, प्रभाकर इत्यादि पत्रें निघालीं. तसेंच पुण्यास १८४८ सालीं **ज्ञानप्रकाश** पत्र सुरू झालें म्हणजे **वर्तमानपत्रांची नवीन शाखा** रुजत व सजत चालली. त्या वेळेचा तो लहानसा ज्ञा. प्र. पाहिला म्हणजे आज कौतुक वाटतें. ज्ञानप्रकाशास कृष्णशास्त्री चिपळोणकर, गोपाळराव हरी देशमुख प्रभृतींचें पाठबळ चांगलें असे. प्रथम ज्ञानप्रकाश काढतेवेळीं 'ऊ ऋ' इ. कांहीं टाइप नव्हते. त्यामुळें मोठी अडचण पडली ती कृष्णशास्त्री यांनीं तत्काळ १०० पद्यें तीं अक्षरें नसणारीं रचून देऊन बाजी राखली अशी कथा ऐकिवांत आहे. ( कृ. चि. चरित्र—अरेबियन् नाइटस-भाग १ ) रे. मरे मिचेलप्रभृति पाद्री मंडळींचा वाढता जोर पाहून कृष्णशास्त्री चिपळोणकर यांनीं १८५२ त **विचारलहरी** नांवाचें पत्र सुरू केलें. " यामुळें त्यांजवर सरकारी

अधिकाऱ्यांची गैरमर्जी झाली " ( विष्णुशास्त्री चरित्र लं. कृ. चि. पृ. ८ ) बाबर पदमनजींस यांतील विचार " हटकट व पोरकट " वाटले यांत नवल नाहीं ( अरुणो. प. ८८ ) ज्ञानप्रकाशप्रमाणेंच त्याच्या आधीं ज्ञानसिंधु "प्रतिसोमवारीं" मुंबईस निघत असे. ( पंचांग १८४७ )

इ. स. १८५४ **वर्तमानदीपिका** नांवाचें एक पत्र होतें. ते रा. भवानी विश्वनाथ कानविंदे काढीत असत ( अरुणोदय पृ. ५३ व उतारा पृ. २०९ ) तसेंच भाऊ महाजन हे **धूमकेतू** पत्र याचवेळीं काढीत होते. या पत्रांत ' मला धर्मांतर करण्याचें कारण ' हा लेख बाबा पदमनजींनी १८५४ त लिहिला त्याचा उतारा अरुणोदयांत पुरवणी पृ. २०७।२०९ वर आहे. " प्रभाकर पत्र र. भाऊ महाजन हे काढीत असत " असें सांगून ( अरु. पृ. ८८ ) बाबा पदमनजी पुढ लिहितात. " हे गृहस्थ विद्वान असून **पहिल्या प्रतीचे मराठी लिहिणारे** होते. त्यांचा हि मजवर फार लोभ होता " लोकहितवादींची पुष्कळ पत्रें प्रभा--करांत १८४८ सालीं आलेलीं होतीं.

**छापखाने** आले त्यांजबरोबर **वर्तमानपत्रें** आलीं. पण तीं एकटींच थोडकीं येणार? त्याजबरोबर च **मासिकें** आलीं. बाळशास्त्री यांनीं 'दिग्दर्शन' सुरू करून मार्ग दाखवून दिला च होता. १८३८ चे सुमारास **ज्ञानचंद्रोदय**— नामक मासिक चालू झालें. यावर एक पौराणिक चित्र असे. आमचे संग्रहीं याचा " ग्रंथ ३ कागद १७—माघ १७६३ " चा आहे. त्यावर " हा ज्ञानचंद्रोदय नूतन ग्रंथ शिळाछापावर छापणार याचे कागद पांच किंवा सहा होतील त्यांमध्यें एके कागदांत प्राचीन साधूंनीं केलेले चरित्रभाग आहेत, त्यांपैकीं दर महिन्यास थोडे थोडे लिहिले जातील आणि दुसऱ्या राहिलेल्या कागदांत चमत्कारिक प्राकृत ग्रंथ छापले जातील. याची किंमत प्रति महिन्यास अर्ध रुपया पडेल. मुंबईत गणपत कृष्णाजी यांचे छापखान्यांत छापिला. ठिकाण बोरीबंदरचे लैनीजवळ बाबदेवाचे आळींत असे." असा मजकूर आढळला म्हणजे जुन्या कविता छापून काढण्याचा उपक्रम या च काळांत झाला व तो ज्ञानचंद्रोदयानें च प्रथम केला. हा नवनीतापूर्वीचा उपक्रम असून फार महत्त्वाचा होय.

ख्रिस्ती मिशनरी मंडळी तर देशी छापखान्याचे कामांत हिंदुस्थानांत पहिली. श्रीरामपुरच्या मिशनरींच्या उद्योगाचा वृत्तांत मागें आला च आहे. मुंबईत हि

शास्त्र मोरभट (अरुणोदय पृ. १२५।१२६ ) विरुद्ध उइल्सन् वगैरेंचे झगड्यांचीं पुस्तकें छापून झालीं. "माथ्थीउ कृत" दादोबांस गांवठी शाळेंत मिळालें यावरून बैबल वगैरे धर्मपुस्तकें या मंडळींनी फार आधीं छापविलीं असावीं असें वाटतें. १८४७च्या पंचांगांत विक्रीला असलेल्या ख्रिती, मराठी, संस्कृत व इंग्लिश आणि मराठी इस्राएली, हिंदी अशा पुस्तकांच्या यादी आहेत. एक आणा दोन आण्यांच्या चोपड्या त्यांत फार आहेत. यात्रिकक्रमण (१॥ रु.), सृष्टिजन्य ईश्वरज्ञान ( २ रु. ) नव्या कराराचें बांधलेलें पुस्तक ( १ रु.) पुरातन परमपवित्र लेखांतलें भविष्य वदते ग्रंथ ( १ रु. ) हीं च मोठीं धार्मिक पुस्तकें या यादींत आढळलीं. इतर मोडी बाराखड्या, लेंकरांचीं पहिली पोथी, (मनोकृत) गणित तीन भाग (१रु.) (मार्गे न्यस्य इ. ज्यांतून घेऊन पूर्वी उल्लेख केला ते हेच भाग दिसतात) अशीं शालोपयोगी पुस्तकें व हत्ती-गिराफ इ. चीं चित्रें व इतर किरकोळ धार्मिक अर्धधार्मिक गोष्टी-सचित्र किंवा साध्या-मिळून एकंदर ४२+२५=६७ पुस्तकें आहेत. खेरीज ट्राक्ट आणि बुकसोसायटीनें छापलेलीं ३६ छोटीं चोपडीं निराळीं. यांत भगवद्गीतेचें सार, हिंदुशास्त्रांत सांगितलेलें ब्राह्मणाचें महत्त्व, पावसासाठीं प्रार्थना, पृथिव्यादि भूतांचें भजन इ. विषय आहेत. खेरीज "इंग्लिश भाषेचें ज्ञान मिळविण्यासाठीं "साह्यकारक" ( १ रु. ) व 'ईजीलेसन्स्' कोशासुद्धां (२) रु इ. सुमारें ८ पुस्तकें मिळून १११ पुस्तकें झालीं. यांत च मिशनेरी मंडळींनी १८४२ त सुरू केलेल्या **ज्ञानोदय** नामक इंग्रजी मराठी पाक्षिकाचीं बांधीव पुस्तकें हि आहेत. याचीं पृष्ठें "काहींसीं लहान आणि छाप सुंदर" आहे:-ज्ञानोदय वर्ष ८ यांत सरकारानें १८४८ त "महाराष्ट्र देशांतील थोर लोकांशीं भाषण" या पुस्तकांत "अहो थोर लोकांहो, अहो बडे लोकांहो, अहो, श्रीमंत लोकांहो," चांगली विद्या शिका, उद्योग करा असा बोध केला होता तो पुनः छापला आहे. १८५० सालीं मुंबईपुण्याहून रहिवाशांनीं केलेले दारूबंदीचे अर्ज लोकसंग्रहांत मीं नुक्तेच छापून प्रसिद्ध केले होते. आज ८१ वर्षे हें ज्ञानोदय अव्याहत चालू आहे. मिशनेरी मंडळीचा हा उद्योग पाहिला म्हणजे त्यांचें खरोखर मोठें कौतुक वाटतें.

नवयुगाचीं प्रमुख साधनें म्हणजे छापखाने व पत्रें; तशाच सभा. तेव्हां या कालांत सभा हि स्थापन झाल्या. त्यांत वाङ्मयसंबंधी सभांत मुंबईची स्टूडंट्स् लिटररी आणि साएंटिफिक सोसायटी ही प्रमुख होय. ही इ. स. १८४८ त स्थापन झाली. हिची मराठी शाखा म्हणजे **मराठी ज्ञानप्रसारकमंडळी**. हिच्या

मार्फत सभा चालत व त्या सभेंत वाचलेले निबंध छापण्यासाठीं **ज्ञानप्रसारक** नांवाचें एक मासिक हि काढीत. यांत भास्कर दामोदर पाळंदे, विश्वनाथ नारायण मंडलिक, लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री हळबे इत्यादि तत्कालीन बऱ्याच इंग्रजी शिकणाऱ्या प्रमुख विद्वानांचे लेख आलेले आहेत. ते शास्त्रीय, मुशाफरी इत्यादि प्रकारचे पुष्कळ आहेत. ही मंडळी बरींच वर्षे चालली. दुसरी **दक्षिणी भाषेत पुस्तकें प्रसिद्ध करणारी मंडळी** "हिनें नाना फडनविसाची बखर, गुजराथचा इतिहास, सृष्टींतील चमत्कार अशीं कित्येक मोठमोठीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं" (अरुणो० पृ. ७८). परंतु ही जरा मागून निघाली असावीसें वाटतें. आतां तिसरी पुण्यास **कल्याणोन्नायक मंडळी**— "त्या सभेचे प्रमुख वे. मोरशास्त्री साठे (कृ. चि. यांचे गुरु) हे होते. ही दर आदित्यवारीं जमे. त्या वेळेस शास्त्रीबुवा हे एखाद्या विषयावर फार चांगलें संभाषण करीत, व लोकांची त्या बाबद जी काय वेडी समजूत असे ती दूर करीत. "ता. १६ डिसेंबर १८५४" रोजीं शास्त्रीबोवा पर्जन्यमीमांसा सांगत असतां "मोठमोठे गृहस्थ व पंडित शंका करीत कीं "इंद्र देवता आहे व मेघ हत्ती आहेत त्यांस इंद्रानें आज्ञा केली म्हणजे पाऊस पाडतात" (पुणें वर्णन– गायकवाड– भाग १ ला, पृ. १३०) तशीच चौथी **ज्ञानप्रकाश** सभा पुण्यांत होती (अरु. पृ. ७९) पांचवी आणि या सर्वांपेक्षां महत्वाची पुण्याची **दक्षिणा प्रैज कमिटी** ही होय. पूर्वी पेशवे लाखों रुपयांचा देकार प्रतिवर्षी श्रावणांत ब्राह्मणांस करीत. पुढें इंग्रजसरकारनें "केवळ विद्वान् ब्राह्मणांस मात्र द्रव्य देण्याचा शिरस्ता ठेविला." या दाक्षिणेच्या पन्नास हजार रुपयांतून वीस हजार रु. चॅप्लीनसाहेबाच्या शिफारशीवरून निराळे काढून संस्कृत पाठशाळा स्थापिली बाकीच्या रुपयांत दक्षिणा चालविली, तथापि या वेदाभ्यासजडांवर हजारों रुपये खर्च करण्याविरुद्ध लोकहितवादी गोपाळराव हरींनीं हत्यार धरलें. तेव्हां सरकारनें ठराव केला कीं जुने ब्राह्मण दक्षिणा घेणारे नेमिले आहेत त्यांखेरीज नवीनांस इतःपर दक्षिणा न देतां जी रक्कम शिल्लक पडत जाईल ती "ग्रंथ करण्याचे कामाकडे लावावी." याप्रमाणें १८५१ त **दक्षिणा प्रैझ कमिटी** निघाली. हिच्या हातून काम कांहीं झालें. "परंतु हिचा उद्देश व हिच्या हपीसाचा खर्च याच्या मानाप्रमाणें पाहिलें असतां जसें काम व्हावें तसें अद्याप दृष्टीस पडत नाहीं." (पुणें वर्णन, भाग १, पृ. ८३।८४ व ७०).

येथवरची हकीकत लक्ष्यपूर्वक वाचल्यास पुढील तात्पर्य ध्यानांत येईल:—

( १ ) १८३६–१८५७ या विशींत मराठी वाङ्मयावरील सरकारी प्रेमाचा पहिला पूर ओसरूं लागला व देशीपक्ष खालावला.

( २ ) या काळांत शालोपयोगी वाङमय बरेंच वाढलें.

( ३ ) खाजगी व स्वतंत्र प्रयत्न वाङमयोपसकांकडून करण्यास प्रारंभ झाला.

( ४ ) छापखाने वाढले; सरकारी व मिशनेरी शाळा पसरल्या.

( ५ ) दिग्दर्शन, ज्ञानचंद्रोदय, ज्ञानप्रसारक इ. मासिकें निघालीं.

( ६ ) दर्पण, प्रभाकर, ज्ञानप्रकाश, विचारलहरी, ज्ञानोदय इ. पत्रें निघूं लागलीं.

( ७ ) खिस्ती व हिंदू यांनीं धर्मविषयक वाद सजविण्यासाठीं ग्रंथ लिहिले व खिस्त्यांनीं मतप्रसरार्थ पुस्तकमाला काढल्या व ते बळावले.

( ८ ) म० ज्ञानप्रसाक, दक्षिणा प्रैज, दक्षिणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणारी, तशीच ट्राक्ट् आणि बुक् सोसायटी ( स्थापना ? ) या मंडळ्या निघाल्या.

( ९ ) व्याकरण होऊन भाषेला स्थैर्य आलें व नवनीतासारख्या ग्रंथांनी जुनें वाङ्मय लोकप्रिय केलें.

( १० ) क्यांडीचा इंग्रजी-मराठी कोश झाला.

( ११ ) १८४० त बॉ. ने. ए. सोसायटी जाऊन बोर्ड ऑफ् एजुकेशन आलें; १८४८त बाळशास्त्री वारले; १८५४ त सरकारी विद्यारूयातें निर्माण झालें; व १८५८ त हरि केशवजी वारले ! आणि कृष्णशास्त्री चिपळोणकर, महादेवशास्त्री प्रभृती इंग्रजी शास्त्री आणि बाबा पदमनजी, कृ. राजवाडे, गोविंद नारायण, भास्कर दामोदर, मंडलिक प्रभृती मराठी लेखक व ग्रंथकार उदयास येऊं लागले.

( १२ ) ज्ञानप्रसारक, ज्ञानप्रकाश, ज्ञानोदय, ज्ञानचंद्रोदय, ज्ञानसिंधु, अशी सर्वत्र ज्ञानाची नवयुगसूचक उद्घोषणा होत राहिली.

एकंदरींत मराठी वाङ्मयाची झपाट्यानें प्रगति या काळांत झाली आणि त्याचें वैचित्र्य व सामर्थ्य पुष्कळ वाढलें.

---

# प्रकरण ४ थें

—∞—

## इ. स. १८५७ ते १८७४

## ललितवाङ्मयाचा प्रारंभ

परशरामपंत तात्या वाङ्मयोपवनांतील माळीपणाच्या कामांत फार कुशल होते. घरच्या च वडिलोपार्जित बागेंतील उमललेलीं नामीं नामीं पुष्पें निवडून त्यांच्या माळेच्या सौरभानें त्यांनीं दशदिशा दरवळून सोडल्या; पण एवढ्यावर च ते थांबले नाहींत, तर आजोळीं जाऊन तेथल्या जुनाट व विस्तीर्ण उपवनांतील सुंदर व सुगंधि वृक्ष आणून त्यांचीं कलमें च आपल्या घरच्या बागेंत त्यांनी लावून टाकिलीं व पुनः पुनः आजोळीं जाण्याची कटकट च नकोशी केली. आजी हि भली होती तिला तात्यांच्या उद्योगाचें कौतुक वाटलेसें दिसतें. तात्यांनीं भराभर उत्तररामचरित्र, मृच्छकटिक, वेणीसंहार, नागानंद, पार्वतीपरिणय इत्यादि निवडक नाटकें संस्कृत वाङ्मयोपवनांतून कलम करून मराठींत लाविलीं. त्यांची कर्मकुशलता उत्तम च असल्यामुळें कलमें फार नामीं साधिलीं. उत्तररामचरित्र ( १८५९) त झालें व मागाहून वेणीसंहार-मृच्छकटिक इ. झालीं. शाकुंतल हि मराठींत त्यांनीं उतरलें आहे. पार्वती-परिणय, नागानंद हीं भाषांतरें अद्यापि छापून प्रसिद्ध नाहींत. किंबहुना त्यांचीं इतर छापील नाटकें हि आतां मिळत नाहींत, त्यामुळें रसिकजनांची इच्छा अतृप्त राहते, याचा विचार होऊन तात्यांची सर्व कृति लोकाराधनार्थ प्रसिद्ध होण्याचा योग लवकर येईल तितका बरा. वेणीसंहाराच्या उपोद्घातांत तात्या म्हणतातः—"आतां भाषांतर म्हटलें म्हणजे शब्दास शब्द बरोबर असावे, परंतु तसें केवळ येथें नाहीं. प्रायः बरोबरी आहे; पण क्वचित् स्थळीं फेरफार केला आहे. ××× संस्कृत भाषेंत प्रौढी, शब्दलालित्य, अर्थगांभीर्य इत्यादि गुण आहेत, तसें महाराष्ट्र भाषेंत नाहींत; त्यामुळें आणि कवीच्या अंगीं जे कविता करण्याचे गुण असावे तेही या भाषांतरकर्त्याच्या अंगीं नाहींत; यामुळें संस्कृतांतल्याप्रमाणें रसपरिपाक उतरला नाहीं. हें सहज विद्वानांच्या समजुतींत येईल. तथापि विद्वानांच्या समागमानें यथा-

मति भाषेला जितकी गोडी आणविली तितकी यानें आणली आहे असें समजावें." यांत तात्यांनीं मार्मिकपणानें " प्रायः बरोबरी " चें नातें सुचविलें आहे. तात्यांचें पद्य गद्यापेक्षां मधुर व मृदु आहे. मोरोपंत त्यांनीं उत्तम पचविला होता, त्यामुळें या काव्यमर्मज्ञ पुरुषाला कविता सदा प्रसन्न होती. " विषयाची योजना झाली कीं, त्यांच्या लेखणींतून कविता भुरूभुरू बाहेर पडत असत." ( महाराष्ट्रीय नाटककार—मुजुमदार पृ. २२ ) त्यांच्या पद्यांची टवटवी अद्यापि कायम आहे. गद्य मात्र आतां जुनें व बुरसट वाटूं लागल्याचा भास होऊं लागला आहे. याप्रमाणें संस्कृत नाटकें मराठींत उतरून तात्यांनीं मोठीच कामगिरी केली. संस्कृतांत एवढी अप्रतिम नाट्यसंपत्ति असतां तिचा कांहींच आस्वाद प्राकृत जनांस घेण्याची सोय नव्हती, ती रसिकवर्य तात्यांनीं करून दिली. नाहींतर लोकांना आपलें मनोरंजन करण्यास गलिच्छ तमाशे किंवा बोजड दशावतार यांखेरीज विशेषशीं साधनें प्रचलित नव्हतीं

दादोबांची यशोदापांडुरंगी फार पाल्हाळिक पाहून तात्यांनीं सोपा स्वच्छसा केकादर्श केला. तात्या पंतकाव्याचे मोठे मुरब्बी होते. खुद्द दादोबांनींच म्हटलें आहे:—" शत पंडितांमध्यें एकादा पंडित प्राकृत ग्रंथाचें आस्थापूर्वक अवलोकन करणारा सांपडेल म्हणून जें म्या वर सांगितलें, त्या च विरळ कोटींत परशुरामपंत यांची गणना केली पाहिजे; त्यांणीं पंताच्या काव्यावर फार लक्ष दिलें आहे आणि त्यांहीं आपले हातचें लिहिलेलें केकावलीचें मूळ पुस्तक उपयोगी पडण्याकरितां माझ्या स्वाधीन केलें, ही त्यांची मजवर मोठी स्मरणीय उपकृति आहे, असें मी समजतों." (यशोदापांडुरंगी पृ. ५१ )

यांशिवाय त्यांनीं मराठ्यांच्या इतिहासावर सोप्या कविता, नामार्थदीपिका, बालबोधामृत ( २६० आर्या ) वृत्तदर्पण, संस्कृत पाठावली असे पद्य ग्रंथ केलेले प्रसिद्ध आहेत. बाणकवीच्या कादंबरीचें पदशः भाषांतर " विद्वद्वर्य बाळशास्त्री देव टोकेकर पंडित निसबत सरकारी भाषांतरखातें " यांनीं केलें होतें, त्यांजवरून कथापर मनोरंजक सार काढून तात्यांनीं प्रसिद्ध केलें. (इ. स. १८७२)

अशा प्रकारें वाङ्मयसेवा करून तात्या १८७४ सालीं(शके १७९६) वयाच्या ७५ व्या वर्षी पुण्यास वारले. तात्यांचें जन्म व मराठी गद्याच्या इंग्रजी अवताराचा जन्म जवळ जवळ एकवेळचा च म्हटला तरी चालेल व १८७४ त निबंधमालेचा

दणका सुरू होण्याच्या सुमारास अथवा या अवताराच्या नवीन युगाला सुरुवात होण्याच्या च सुमारास तात्या वारले हा योगायोग विलक्षण तर खराच, पण मोठा औचित्ययुक्त आहे यांत संशय नाहीं ! अगदीं प्रारंभींच्या कोशकर्त्या पंडितमंडळींत परशुरामपंत झळकले ते च अखेर पुनः संस्कृत नाट्यसंपत्तीचा 'पारिजातक' खुद्द मराठीच्या दारवठ्यांत आणून लावण्याच्या धडपडींत हि सर्वांच्या पुढें च पाहून या वृद्ध रसिकशिरोमणीविषयीं एक विशेष आदर व प्रेमा उत्पन्न होतो.

परशुरामपंत गोडबोले व मेजर क्यांडी (=साखरे!) यांचें गोत्र एक म्हणावयास नांवाच्या अर्थावरून तरी चिंता नाहीं ! दोघांचा सारा जन्म एका च कार्यांत साहचर्यानें गेला. मेजर क्यांडी १८०६ त जन्मले व १८७७ त महाबळेश्वरीं त्यांचें अवसान झालें. १८२२ त ते आपल्या बंधूंबरोबर ई. इं. कंपिनीच्या नोकरींत शिरले. १८३२ ते १८३५ पावेतों ते कोशाचे कामीं मोल्स्वर्थ यांचे दिमतीला होते. पुढें थकून मोल्सवर्थ विलायतेस गेले; व इंग्रजीमराठी कोशाचें हातीं घेतलेलें काम तसेंच पडून राहिलें. क्यांडींनी मुंबईकर गव्हर्नरांच्या उत्तेजनावरून १८४० त तें पुनः हातीं घेतलें व १८४७ त पुरें केलें. या च कोशाची दुसरी आवृत्ति १८७३ त निघाली व त्याबद्दल क्यांडी यांस दहा हजार रुपये मिळाले! १८५१–५५ क्यांडी पुण्याच्या पाठशाळेचे प्रिन्सिपाल होते. त्या वेळच्या सोंवळ्या पाठशाळेंत बूट घालून जाण्यास त्यांस कसा प्रतिबंध होता इत्यादि वृत्तांत गायकवाड यांच्या पुणें वर्णनांत पहिल्या भागांत ( पृ. ७६ ) आहे तो वाचण्यासारखा आहे. " मेजर क्यांडी साहेब म्हटले म्हणजे लष्करी खात्यांतले नौकर होते. त्यांची नेमणूक कोश तयार करण्याच्या कामावर आणि पाठशाळेच्या मुख्य अध्यापकाच्या कामावर त्या काळीं कोणकोणत्या योगांनी कशी झाली असावी याचें मोठें आश्चर्य वाटतें ! !" ( बाळबोध पुस्त० ३० पृ. २४४ ). पण यांत आश्चर्य कसलें ! सत्तेच्या पोटांत सगळें शहाणपण लपून बसलेलें असतें ! ! १८५५ त क्यांडी मराठी ट्रान्स्लेटर झाले. ते रजेवर असतां त्यांचे जागीं रावसाहेब भास्कर दामोदर पाळंदे काम पाहत. इतक्यांत मराठी क्रमिक पुस्तकांचा योजना निघाली तेव्हां त्यांतील पहिलें पुस्तक भास्कर दामोदर यांनी केलें; मग पुढील पांच पुस्तकें क्यांडी यांनी केलीं. क्यांडीचे खास निसबतीचे मराठी पंडित म्हणजे परशुरामपंत तात्या. " कवितांच्या धड्यांचें सगळें काम परशुरामपंत तात्या गोडबोल्यांकडे सोपविलें होतें. त्या मंडळीच्या सांगण्यांत असें येत असे कीं,

हीं मराठी कमिक पुस्तकें इंग्रजींतल्या कमिक पुस्तकांच्या नमुन्यावर तयार व्हावीं, अशी त्या साहेबाची फार इच्छा असे. त्यांनी कधीं एकही वाक्य चाल ढकलीवर नेलें नाहीं. शब्दशुद्धीवर आणि अर्थस्पष्टतेवर त्यांचा फार कटाक्ष असे. " " सांप्रत काळीं मराठी भाषेमध्यें जें काय नवें वळण दिसत आहे त्यांत त्यांच्या हातच्या किरत्याची लपेट पुष्कळ आहे. " " मराठी भाषेंतल्या शब्द योजनेविषयीं आणि वाक्यरचनेविषयीं त्यांची फार खिसखीस असे. असें श्रीकृष्णशास्त्री तळेकरांच्या—[ हे कँडीच्या हाताखालीं होते व त्यांच्या फार लोभांतले होते. कधीं आदितवारीं श्रीकृष्णशास्त्री कँडीकडे गेले असतां ते त्यांस प्रार्थनेस बसवीत व म्हणत ' श्रीकृष्णा ! मरणोत्तर तुझ्या आत्म्याचें कसें रे होईल ! ' ] सांगण्यांत येत असे. ' कथा श्रवण केली '...त्याच्या जागीं " कथेचें श्रवण केलें; " "स्वतः नजरेनें" ह्याच्या जागीं ते "स्वतः दृष्टीनें ' घालीत. " ( बाळबोध सदर) दक्षिणा प्रैझकमिटी किंवा शाळाखातें यांजकडे " आश्रयार्थ आलेले ग्रंथ कँडी साहेबांकडे जात असत " ते ग्रंथ ते " अनुस्वारविसर्गापर्यंत बारीक पाहात असत तरी त्यामध्यें त्यांचें एक मोठें धोरण हें असें कीं...पुस्तक " वाईट " असें कधीं सहसा म्हणायाचें नाहीं. तितकाच प्रसंग आला तर " चांगलें नाहीं " म्हणायाचें. दुखवायाचें नाहीं. हातपाय मोडायाचे नाहींत. " कँडी...मराठी ट्रान्स्लेटरच्या जागेवर असतां, सरकाराच्या आश्रयानें जितके मराठी ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले आहेत, तितके ग्रंथ तेवढ्या अवकाशांत पूर्वी प्रसिद्ध झाले नव्हते आणि तसे प्रसिद्ध होण्याची आशा दिसत नाहीं. " ( बाळबोध-सदर. )

संस्कृतांतून भाषांतररूपानें नाटकें करण्याची जी प्रवृत्ति परशुरामपंतांनी रूढ केली तिचें अनुकरण त्या काळीं इतरांनी केलें. त्यांत पुण्याचे **कृष्णशास्त्री राजवाडे** हे प्रमुख होत. हे कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे पाठशाळेंतील सहाध्यायी होते. सुमारें १८२० मध्यें यांचें जन्म झालें असावें. यांनी विक्रमोर्वशीय, मालती-माधव (१८६१) व मुद्राराक्षस (१८६७) इत्यादि नाटकांचीं भाषांतरें केलीं आहेत. खेरीज उत्सवप्रकाश व ऋतुवर्णन हीं दोन काव्यें केलीं आहेत. ( म. ना. पृ. १५१ ) उत्सवप्रकाश ( १८७४ ) सरस व स्वतंत्र असून मुलांच्या हातांत देण्यास सर्वतोपरी लायख आहे. यांचा अलंकारविवेक ( १८५३ ) मागें निर्दिष्ट केलाच आहे. यांची भाषांतरपद्धति सरळ आहे. पद्यें प्रसन्न असलीं तरी

परशरामपंत तात्यांच्या इतकीं गोड नाहींत. त्यांचें मुद्राराक्षस व मालती-माधव थोडीं सुधारून मनोरंजक ग्रं. प्र. मं. नें पुनः छापलेलीं आज उपलब्ध आहेत. तेव्हां त्याबद्दल येथें अधिक लिहित नाहीं. हे सन १९०० मध्यें वारले. शास्त्रीमंडळींना यांनी चांगला कित्ता घालून दिला. यांची समाधि सदाशिव पेठेंत त्यांच्या घरांत आहे असें ऐकिलें आहे.

कृष्णशास्त्री राजवाडे यांचेप्रमाणें च दुसरे रसिकशास्त्री म्हटले म्हणजे रा. गणेशशास्त्री लेले त्र्यंबककर हे होत. यांनीं **जानकीपरिणय** या रामभद्र दीक्षित-कृत संस्कृत नाटकाचें भाषांतर केलें; तें द. प्रै. क. नें १८६५ त प्रसिद्ध केलें. याच्या प्रस्तावनेंतील कांहीं वाक्यें व परशुरामपंत तात्या यांच्या वणीसंहार नाटकाच्या प्रस्तावनेंतील कित्येक वाक्यें अगदीं अनुवादी भासतात. प्रस्तुत "भाषांतरांतील "गुणाची प्रतिष्ठा" भाषांतरकर्त्याची च आहे, तपासणाराची नव्हे असें कृष्णशास्त्री यांनीं मुद्दाम आपल्या शेऱ्यात लिहिलें असून रामचंद्राची कृती गणेशशास्त्री यांस वाटली तितकी रसाळ नाहीं असें आपलें मत दिलें आहे. याखेरीज त्यांनीं मालविकाग्निमित्र व विद्धशालभंजिका हीं नाटकें ही संस्कृता-तून उतरून छापिलीं व कर्पूरमंजरी नाटिका ही बालभाषेंतून मराठींत करून छापिलीं. गणेशशास्त्री लेले मोठे मार्मिक होते. यांचा कुकचा वृत्तांत हें पुस्तक १८५३ तलें भाषांतर. त्यांतील ओबडधोबड गद्यापेक्षां या नाटकांत पाऊल पुढें आहे; व पुढें तीर्थयात्राप्रबंधांत त्यांनीं आपली भाषा निर्दोष केली आहे. कुकच्या वृत्तांताप्रमाणें च रे. बिंगलेचे ग्रंथावरून कोलंबसाचें चरित्र त्यांनीं प्रसिद्ध केलें. तसेंच तेलेमेकसचा वृत्तात व चेंबर्स बॉयॉग्रफीवरून नामांकित पुरुषांचीं जन्मचरित्रें व एल्फिन्स्टनचे इंडियावरून "मनुसंहितानामक ग्रंथ झाला त्या काळची हिंदु लोकांची स्थिति" अशीं गद्य पुस्तकें हि त्यांनीं करून छापलेल्या पुस्तकाच्या यादींत आढळतात. ही यादी त्यांच्या **शिवाजी-चरित्र** (१८७३) या काव्याचे मलपृष्ठावर आहे. त्यांत च रघुवंश, हिंदु लोकांचे सण, गंगाचरित्र, सीमंतिनीचें आख्यान, शिवस्तुति ( केकावलीचे चालीवर ) अशीं गद्यात्मक व साहित्यशास्त्र नांवाचें पद्यात्मक पुस्तक असे ग्रंथ मराठींत शास्त्रीबोवांनी नवीन रचलेले म्हणून दिलेले आहेत. पैकीं साहित्यशास्त्र हा ग्रंथ थोडक्यांत साहित्यशास्त्राचा परिचय करून घेण्यास फार चांगलें साधन आहे. कविकुलगुरूच्या रघुवंशाचें गणेशशास्त्री यांचें भाषांतर थोर रसिकांच्या आदरास

पात्र झालेलें आहे. हें १८८१ च्या सुमारास पूर्णतेला गेलें; मग मुंबईचे सुप्रसिद्ध जावजी दादाजी यांनी तें विकत घेऊन छापलें. या काव्यास द. प्रै. क. नें रु. ५०० बक्षीस दिले होते. असें सुंदर पुस्तक असतां त्याच्या शेंदीडशें सुद्धां प्रती छापल्यापासून ९ वर्षांत गेल्या असतील नसतील अशी तक्रार कै. ओक यांनी जावजींचे चरित्रांत दुःखाच्या कळवळ्यानें केली आहे. ( जावजी चरित्र पृ. ४२ ) खरोखरी विचार करण्यासारखा प्रश्न आहे कीं अशीं सुंदर पुस्तकें आपल्या मराठींत असतां तीं आपण मुलांबाळांस कां शिकवूं नयेत ? रघू च शिकवावयाचा तर तो मराठींतून आधीं वाचवून कंठगत केला तर मुलांस केवढा फायदा होईल ? इंग्रजी चौथ्या पांचवे इयत्तेंत जाणारीं म्हणजे १४।१५ वर्षांचीं मुलें शास्त्रीबुवांचें रघूचें रसाळ भाषांतर वाचून खचित हर्षित होतील. यासाठीं केवळ इंग्रजीच्या नव्हे तर **संस्कृताच्या** हि **आधीं** देशी भाषांचें भरपूर अध्ययन मुलांकडून करविणें हें अत्यवश्य आहे अशी विचारी शिक्षकांची तरी खात्री व्हावी. देशी वाङ्मयांत त्यांचा पाय रुजला म्हणजे मग पुढें अन्य वाङ्मयांची गोडी यथावकाश व यथाशक्ति घेण्यास तीं चुकणार नाहींत. भाषांतरी वाङ्मय निर्माण करणाऱ्या या राजवाडे, लेले, गोडबोले प्रभृतींनी निवळ मराठी वाचकांवर अगणित उपकार केला आहे. जें श्रेय पारमार्थिक वाङ्मय आमच्या दारादेवघरांत आणून रचून ठेवण्यासंबंधीं आमच्या ज्ञानेश्वर, वामन, मोरोपंतादि कवींना तें च श्रेय संस्कृतांतलें काव्यनाटकादि सुललित वाङ्मय मराठींत आणणाऱ्या वरील महाभागांना देणें सर्वथैव समुचित होईल, किंबहुना तें हक्कानेंच त्यांच्या वांट्याला जातें असें मला वाटतें.

जसा संस्कृतांतून नाटकें उतरण्याचा उपक्रम झाला तसा किंबहुना त्याहून हि कठिण असा उपक्रम यावेळीं मराठींत झाला. तो महादेवशास्त्री कोल्हटकर या एका इंग्रजी शास्त्र्यांनींच केला हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. यांनीं शेक्सपियर या ऑंग्लमहाकवींचें अथेल्लो नांवाचें हृत्क्षोभकारक नाटक मराठींत उतरलें व इंग्रजी ललितवाङ्मयांवर धाडसाचा मराठी हल्ला चढविला. दुर्दैवानें आपल्या कृतीवर सफाईचा हात फिरवून तें छापून निघण्यापूर्वी हे वारले. तथापि इ. स. १८६७ त यांच्या भाच्यांनी अथेल्लो छापून प्रसिद्ध केलें व निबंधमालाकारांस हि तें "उत्कृष्ट" वाटलें ( निबंधमाला-भाषांतर. ) "यांची लिहिण्याची शैली अजून कोणी उचलली नाहीं" असें पुणें वर्णनकर्ता म्हणतो. (भाग १ पृ. ८०) "त्याचें वक्तृत्व फार

सुरस असे. जसा नाग गारोड्याच्या पुंगीस भुलून त्याकडे सर्व तनमन लावून तल्लीन होतो याप्रमाणें यांचे श्रोते भुलत असत." ( सदर ) त्यांजविषयीं बाबा पदमनजी अरुणोदयांत (पृ. ५२) लिहितातः-"त्यांची शिकविण्याची शैली फार चांगली असे. त्यांची मराठी भाषा मला फार गोड लागे; कारण आमच्या वर्गांतील सोनार, परभु, शेणवी यांच्या मराठी भाषेस भी हसावें. ते आम्हांस बाळ गंगाधरशास्त्री यांनीं केलेल्या एल्फि. हिंदु. इति. चें मराठी भाषांतर शिकवीत." मूळ अस्सल इंग्रजी किंवा मराठी जातिवंत ग्रंथाचें स्वारस्य दुसऱ्या भाषेंत तंतोतंत उतरणें परम दुर्घट. तें एक कृष्णशास्त्र्यासारखाच पुरुष रासेलसांतकरूं जाणे! महादेव शास्त्र्यांचा कित्ता कोणी लवकर गिरविला नाहीं. कारण संस्कृत ग्रंथ मराठींत उतरण्याइतकें तें सोपें व सुधें नव्हतें. १८७५ त कै. निळकंठराव कीर्तन्यांनीं धीर करून टेंपेस्ट मराठींत उतरण्याचा यत्न केला. पुढें कै. केळकर, आगरकर, महाजनी यांनीं व इतरांनीं चांगला प्रयत्न या दिशेनें केला तो प्रसिद्धच आहे

कृष्णशास्त्री राजवाडे किंवा तात्या यांचे पूर्वी महाराष्ट्रांत विष्णु अमृत भावे ऊर्फ विष्णुदास यांना श्री. चिंतामणराव आप्पा सांगलीकर यांनीं करनाटकी नाटकें होतात तशींच महाराष्ट्रांत व्हावीं या इच्छेनें दिलेल्या प्रोत्साहनानें पौराणिक नाटकें सुरू झालीं. रा. मुजुमदार ( म. ना. पृ ६ ) म्हणतात किंवा सामान्यतः पुष्कळ लोक मानतात त्याप्रमाणें महाराष्ट्रांत नाटककला ४०० वर्षे लुप्त झाली नसून तंजावरच्या राजांनी लक्ष्मीनारायणकल्याण नाटक ( इ. स. १६९० सुमारास ) केलें होतें व इतर हि आणखी बरींच पौराणिक नाटकें तेथील मराठी पुस्तकालयाचे यादींत दाखल आहेत. असो. तथापि रा. भावे यांनी चिंतामणराव आप्पा यांच्या आश्रयानें त्या विद्येचा पुनरुद्धार केला यांत संशय नाहीं. रा. भावे यांचीं नाटकें आतां उपलब्ध नाहींत. भावे यांचे नंतर तात्या व राजवाडेलेलेगोडबोले यांचीं भाषांतरीं नाटकें झालीं व त्यांचे कांहींचे प्रयोगहि झाले.

परंतु भाषांतरापेक्षां पुढली पायरी हि महाराष्ट्र या च वेळीं चढला. नुसत्या भाषांतरांनी त्याची भूक भागण्यासारखी नव्हती. एका वीस वर्षांच्या तरण्या बांडानें या वेळीं महाराष्ट्ररसिकवर्गाला आपल्या एका नाटक कृतीनें वेड लाविलें. हें नाटक "थोरले माधवराव पेशवे यांजवर" व हा तरुण विनायक जनार्दन

कीर्तने. हें मूळ " मराठी ( उपयुक्त ) ज्ञानप्रसारक सभे-पुढें...वाचलें व तें ऐकून सर्व सभेस फार आनंद झाला, इतकेंच नाहीं, तर राजमान्य रा. डाक्तर भाऊ दाजी व रावसा० महादेव गोविंद शास्त्री ( कोल्हटकर ) इत्यादिक विद्वान् व थोर गृहस्थांच्या स्तुतीस ही तें पात्र झालें....मराठी भाषेंत नाटक लिहिण्याचा हा प्रारंभ च असून या लहानशा नाटकांत नाटककारानें हास्य व करुणारस चांगले उतरून पुस्तक मनोरंजक केलें आहे " असें रा. बाळाजी बापूजी साने यांनी प्रस्तावनेंत ( इ. स १८६१ ) म्हटलें आहे.

या नाटकाचे अंक चार असून प्रवेश ( ४ + ४ + ६ + ८ ) २२ आहेत; व पृष्ठें ५७ आहेत म्हणजे प्रत्येक प्रवेशाला सुमारें २॥ पृष्ठें पडलीं आहेत; यावरून नाटक चिमुकलें च आहे तथापि तें रसाळ उतरलें आहे. आज याला ६० वर्षें होऊन गेलीं. त्या अवधींत माधवरावांबद्दल पुष्कळ च नवीन माहिती प्रसिद्ध झाली आहे तिचा उपयोग करून नाटक लिहावयाचें कोणी करील तर ती कृति फारच रसभरित व उदात्त होईल. परंतु कीर्तन्यांनी केलेली कृति त्या काळांत तरी फारच उच्च समजली गेली हें उचित च झालें. रा. मुजुमदार यांनी कीर्तन्यांच्या नाटकाच्या ऐतिहासिकपणाबद्दल प्रशंसोद्गार ( म. ना. पृ. ३२ ) काढिले आहेत ते आज वास्तविक ठरणार नाहींत. रामशास्त्री यांस नाटककर्त्यानें राजकारणांत भलतेंच महत्व दिलें आहे. गोपिकाबाईचा संबंध हि नाटकांत नाहीं. तसेंच ' आज्ञापत्रें ' वगैरेंची अस्सल भाषा नाटककारास माहिती नसल्यामुळें नाटककाराला तें व्यंग जाचलें आहे. दरबारी मराठी व अडाणी मराठी यांत साम्य असलें तरी त्या बा. बा. साने यांनी प्रस्तावनेंत किंवा नाटककारानें नाटकांत केल्या आहेत तितक्या एकरूप नसतात. असें आहे तथापि लहान वयांत एक स्वतंत्र परंतु रम्य नाटक रचणें ही गोष्ट कांहीं थोडी नाहीं. कीर्तन्यांची भाषापद्धती सुबोध व पात्रप्रसंगानुकूल अशीच आहे. रा. बा. ना. देव यांनी विनायकरावांच्या चरित्रांत या नाटकाविषयीं पुढें दिल्याप्रमाणें मत प्रगट केलें आहे—" कितीदां वाचलें तरी त्याचा कंटाळा येत नाहीं. × × चांगल्या ग्रंथास हाच कस लागतो. या नाटकांत वस्तुस्थितीचें व मनुष्यस्वभावाचें चित्र यथास्थित व उत्तम उतरलें आहे म्हणून तें इतकें मनोरम वाटतें. × × माधवरावांची भूत! दया, न्यायप्रियता......इत्यादिकांचा ठसा मनावर कसा सुरेख उमटतो ! रमाबाईचें चित्र तरी किती रम्य, यथारूप, कुलांगनास भूषणदायक असें वठलें आहे -

×××× विनायकरावांच्या नाटकाचें सन्मार्गवर्तित्व केवळ निर्विवाद आहे. त्यांतील विनोद ही मजेदार आहे ××× या त्यांच्या कृतींत तरी मनुष्य-स्थितीचा बाह्यरंग च चांगला उतरला आहे; आणि अंतरंग जितका रेखला आहे तितका यथार्थ, मनोरंजक आणि पूर्ण सन्मार्गवर्ती असा आहे. परंतु मानवस्व-भावोदधींत शेक्सपियर किंवा कालिदास यांच्यासारख्या त्यांनी खोल बुड्या मारल्याचा प्रत्यय मला फारसा आला नाहीं." ( पृ. ११११३. )

माधवराव नाटक छापल्यावर चार वर्षांनीं (१८६५) कीर्तन्यांनी आपलें दुसरें नाटक 'जयपाळ' नांवाचें प्रसिद्ध केलें. हें पांच अंकीं च असून पृष्ठें ८५ वर आहेत. हें ऐतिहासिक नाहीं. याला ग्रंथकर्त्यानें इंग्रजींतै चटकदार प्रस्तावना लिहिली आहे. तींत "The story has evidently an entirely Hebrew origin; the drama seems to be a thoroughly Marathi production." असें म्हटलें आहे. आपलें ध्येय सांगतांना नाटककारानें It is with feelings and passions alone there fore that I have concerned myself in this work" असें ह्मटलें आहे व आपण सिद्ध केलेला मेवा रसिकांस न रुचला तर कर्ता म्हणतो give warning. The cook will then silently retire to his kitchen, reconsider his receipt and prepare anew his masalas. या नाटकांतील दोष १८५५ त रसिकशिरोमणी कृष्णशास्त्री चिपळोणकर यांनीं शालापत्रकांत टीकारूपानें दाखविले होते. परंतु आमचे 'कुक' साहेब जे जवनिकेंत अंतर्धान पावले ते पुनरपि रंग-भूमीवर आलेच नाहींत ! या जयपाळ नाटकांत हि ग्रंथकर्त्याची कुशलता व रसिकता चांगली प्रत्ययास येते. परंतु या ग्रंथकर्त्याच्या लिहिण्यांत खोलपणापेक्षां उत्तानपणा अधिक असें वाटतें. अंक प्रवेश ३ मध्यें जयपाळावर कमळजा कुभांड रचते त्याची उठावणी पहा म्हणजे वरील विधानांचें समर्थन होईल. या नाटकांत "कमळजा, सारजा, जयपाळ, प्रभावती, चंद्रकेतु......इत्यादि पात्रांचा स्वाभि-मान, स्वातंत्र्यप्रीती [ तसेंच कौटिल्यादि नीच मनोवृत्ती ] मानाजीरावाची स्थिति त्याचें उपकारकर्तृत्व इत्यादि गोष्टींचें स्वरूप स्वाभाविक व मनोरंजक वठलें आहे. शेवटचा विदूषक व सूत्रधार यांचा प्रवेश म्हणजे अलीकडच्या प्रासमय नामधारी कवित्वावर चांगला कोरडा आहे." ( कीर्तनेचरित्र—देव पृ. ०३४ )

" इंदुरास असतां विनायकरावांनी मथुरानामक एक नाटक रचिलें होतें." पण तें अपुरेंच टाकलें. " त्यांत विनोद व हास्यरस पुष्कळ होता. इतकेंच आतां मला स्मरतें ( देव )."

इ. स. १८७१ त विनायकरावांनी 'सुपरिटेंडंट स्टेट एज्युकेशन' या हुद्यावर असतांना " मध्यहिंदुस्थाचा इतिहास " म्हणून मालकमच्या Central India चें मराठी भाषांतर प्रसिद्ध केलें. परंतु तें नीरस झालें आहे. निबंधमालेंत हि यावर प्रतिकूल अभिप्राय दर्शविला आहे. नुसता विषय बदलला म्हणून येथें खपण्यासारखें नाहीं. विनायकरावांनी इंग्रजींत कांहीं कविता व लेख लिहून आपले परममित्र " आचार्य " माधवराव कुंटे यांच्या Rishi स तोड दिली आहे. 'चाळीस वर्षामागचें पुणें ' ही त्यांची इंग्रजी कादंबरी १८९७ सालीं ज्ञानप्रकाशांत येत असे. -' ही त्यांच्या अत्यंत परिपक्व बुद्धीचें फळ आहे * * महाराष्ट्रीय गृहस्थितीचें असें मनोहर स्वरूप इतकें चांगलें उतरलेलें अन्यत्र कोठें आढळणार नाहीं. ( देव पृ. १३७ ) अशी त्यांची सुंदर कृती व त्यांचीं नाटकें आज दुर्मिळ झालीं असतां पुनः समाजाला उपलब्ध करून देण्याचें पितृऋण जे लागतात त्यांनीं स्वस्थ बसणें खचित उचित नव्हे !

विनायकराव यांचा जन्म इ. स. १८४० त घनसरे—यांनाच पुढें कीर्तने नांव पडलें —घराण्यांत राजुरीस झाला. यांचे वडील जनार्दनपंत हे कोल्हापुरास २ रु. च्या चाकरीवरून स्वपराक्रमानें संस्थानचे कारभारी झाले. यांची आई लहानपणीं च वारली. " त्यांच्या जयपाळ नाटकांत मातृवत्सल्य व पुत्रप्रेम या मनोवृत्तींचें अत्यंत मनोहर आणि हृदयद्रावक चित्र प्रभावती, चंद्रकेतु व जयपाळ यांच्या संभाषणांत उठलें आहे तें वाचून मन तल्लीन होतें. तें चित्र काढणाऱ्या कुशल चित्रकाराच्या स्वतःच्या भाग्यीं तें सुख लाभलें " ( देव पृ. ७ , नसतांना त्यांनीं तो अनुभव असा उठावांत चितारला हें त्यांच्या स्वभावपरिज्ञानाच्या सूक्ष्मत्वाचें व मार्मिकतेचें तसेंच सहृदयतेचें द्योतक आहे. विनायकराव कीर्तने व माधवराव रानडे यांचें शिक्षण कोल्हापुरास एकत्र च झालें. रानडे व कीर्तने यांचा दाट घरोबा होता. (आमच्या आयुष्यांतील आठवणी भाग १।२) विनायकरावांत पाठशक्ति अधिक व माधवरावांत धारणाशक्ति अधिक. इ. स. १८५१ त त्यांचे शाळेंत महादेवशास्त्री कोल्हटकर व विष्णुबुवा ब्रह्मचारी आले असतां बारा वर्षांच्या विना-

यकाचा मराठी निबंध पाहून त्याची त्यांनीं तारीफ केली. या च सुमारास विनायकराव पंढरपुरास गेले असतां आजीच्या सांगण्यावरून त्यांनीं संताप, हूडपणा वगैरे दुर्गुण सोडण्याचा संकल्प चंद्रभागेंत सोडला व ते म्हणत “ एव्हांपासून माझा वर्तनक्रम सुधारण्यास आरंभ झाला.” ( देव पृ. १३ ) १८५६ सालीं ते व रानडे एल्फिन्स्टन् विद्यालयांत मुंबईस दाखल झाले. १८५७ त च मुंबई युनिव्हर्सिटि नवी निघाली व १८५९ त पहिली ‘ मॅट्रिक ’ मंडळी बाहेर पडली. १२० त २० पास झाले, त्यांत विनायकराव होते. पुढें कॉलेजांत गेले; परंतु विशेष लाभ न होतां कॉलेज सोडून १८६२ सालीं ६० रु. वर शिक्षकाची जागा त्यांनीं पत्करली. १८५९ त त्यांनीं मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढें इंग्लंडांतल्या सोळाव्या शतकाच्या अखेरीस झालेल्या राज्यक्रांतीवर व १८६० त ‘हिंदुस्थानांतल्या प्राचीन विद्या’ या विषयावर असे निबंध वाचले त्यावेळीं नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या संस्कृत नाटकांच्या मराठी भाषांतरांचा उल्लेख या निबंधांत “जागोजाग आला आहे.” १८६१ त या च सभेपुढें त्यांनीं आपलें माधवराव नाटक वाचलें ! १८६२ त ते शिक्षक बनले व पुढें लवकर च बदलून धुळ्यास गेले. येथें त्यांचा व नाना नोरोजी यांचा स्नेह जडला. त्यांनीं व यांनीं मिळून तेथें एक क्लब व पुस्तकालय स्थापिलें.याच क्लबांत ‘जयपाळ’ नाटक वाचलें. रा. ब. महाजनी म्हणतात, “ जयपाळाचें संविधानक old Testament मधील Job च्या चरित्रांतून घेतलेलें आहे. जयपाळ हा Job चा नवा अवतार.” ( विविधज्ञानविस्तार पुस्तक ३८—१९०६ देवकृत कीर्तिने चरित्राच परीक्षण ) हें जयपाळ नाटक माधवराव या कृतीशीं तोडून पाहतां तितकें सरस आढळणार नाहीं असें रा. ब. महाजनी म्हणतात तें आम्हांस हि मान्य आहे. माधवराव लिहिलें तेव्हां चा हुरूप च कांहीं निराळा होता. रानडे, कीर्तने व विठ्ठलराव पाठक ( पुढें सातारा हायस्कूलचे हेडमास्तर ) ही तरुण मंडळी नुकतीच कोल्हापुराहून विद्येसाठीं मुंबईस आलेली. रानड्यांनीं नाना फडणीसांवर “ मराठी बाण्याचा कडक लेख लिहून ” ( महाजनी ) शिष्यवृत्ति हारविली; पाठकांनीं मराठ्यांच्या इतिहासाचें सार ज्ञानप्रसारकांत लिहिलें. कीर्तनें यांनीं थोरल्या माधवराव पेशव्यांवर सरस नाटक लिहिलें. अशी ,ही मंडळी मराठी इतिहासाच्या रसांत डुलत होती व नवीन वारें—ते ५७ सालचे दिवस—यांच्या ठिकाणीं खेळूं लागलें होतें. यांचे गुरु वेस्ट–स्मिथ इत्यादि मंडळी “ ५७ सालच्या......नाजूक प्रकरणावरही आपले निर्भीड आणि न्याय_

परिपूर्ण उद्गार ... आपल्या वर्गांत शिष्यांसमोर काढीत......स्वदेशाभिमान, परराज्य, पारतंत्र्य, परदास्य, इत्यादिक विषयांवर त्यांचे विचार फार उदार असत आणि ते आपल्या वर्गांत काढण्यास त्यांस शंका वाटत नसे" (देव-पृ. १५।१६) या परिस्थितीच्या उत्तेजनामुळें विनायकरावांनीं प्रसन्न व उल्हसित मनोवृत्तीनें माधवराव लिहिलें असावें. परंतु कॉलेजांत अखेरी न साधल्यामुळें —विनायकराव हे ग्रॅजुएट झाले हा महाजनींचा सुद्धां समज असावा असें दिसतें परंतु ही चूक आहे—ते मनांतून खिन्न झाले असावे. हा खिन्नपणा धुळ्यास गेल्यावर काळ लोटल्यामुळें उतरला तेव्हां मग 'जयपाळ' निर्माण झालें. पण भट्टी पूर्वीप्रमाणें उतरणें शक्य च नव्हतें असें आम्हांस वाटतें. पहा, उत्तरोत्तर या ग्रंथकर्त्याचें लक्ष च वाङ्मयक्षेत्रांतून निघाल्यासारखें दिसतें. १८७१ त ला त्यांचा मध्य हिंदु॰चा इतिहास असा च नीरस वठला. पुढें १८८२ त इंदुरास अधिकारपद मिळाल्यावर यांनीं मथुरा नाटक हातीं घेतलें, पण त्याचें "कथानक एका इंग्रजी नाटकाशीं फार मिळतें आहे" म्हणून त्यांनीं तें अपूर्ण टाकिलें. एव्हांपासून त्यांनीं मराठी लेखन टाकलें च म्हणाना ! उतारवयांत त्यांची मराठीवरील भक्ति उडाली होती. सन १८६५ च्या "पुढें मराठी पुस्तक हातीं धरतांना मी त्यांस कधीं पाहिलें नाहीं" असें रा. देव लिहितात तें त्यांच्या मानसिक क्रांतीचें च लक्षण होय असें दिसतें! विनायकराव शिक्षक चांगले परंतु तुसडे व जागचे न हालणारे व छडीभक्त असें रा. महाजनी सांगतात. धुळ्याहून कारवारास (१८६४) व तेथें कंटाळून राजीनामा दिल्यावर इंदूर संस्थानांत प्रथम (१८६५) विद्याखात्यांत, मग सुमारें सहा वर्षांनीं १८७१ त इंदुर युवराज यांचे शिक्षक, मग १८७३ त सर टी. माधवराव यांच्या दिवाणगिरींत न्यायखात्यांत ५०० रु. वर, मग माधवराव बडोद्यास गेल्यावर त्यांचे मागें बडोद्यांत (१८७५) त नायब दिवाण, असे ते फिरले व चढले. पण त्यांस आतां पगार रु. १५०० व न्याय, विद्या, पोलीस, खासगी वगैरे खात्यांवर देखरेखीचा अधिकार असें वैभव प्राप्त झालें. आतां पूर्वींचे ते विनायकराव बदलून ते 'दरबारी' झाले. स्वभाव हि बदलला. ते संस्थानच्या लडथडींत जे अडकले ते कायम. वरिष्ठ शिक्षण देशी भाषेंत देण्याचा उपक्रम करण्याच्या हेतूनें बडोद्यांत Vernacular collegeस्थापन झालें त्या खटपटींत विनायकराव होते. हा देशी पाठशाळेचा प्रयोग पांच वर्षें चालला व यशस्वी झाला; परंतु दिवाण माधवराव

विरुद्ध पडल्यामुळें हा उत्तम घाट फिसकटला! आतां तरी बडोद्याचे सुविद्य अधिपती हें श्रेय संपादन करतील तर त्यांची कीर्ति मोठी होईल! पुढें बडोद्यास हक्क असतांना दिवाणगिरी मिळाली नाहीं या रोषानें १८८६ त बडोदें सोडून ते पुण्यास आले. परंतु इंदुरकर युवराज तख्तनशीन झाल्यामुळें त्यांनीं गुरुवर्य विनायकराव यांस आपले दिवाण करून रु. २००० तनखा सुरू केला. पण अखेर बेबनाव होऊन स्वारी परत पुण्यास आली त्यांस विसावे वर्षापासून मधुमेहाची दुःसाध्य व्यथा होती. ती बळावून त्यांचा अंत १८९१ त झाला. त्यांच्या पत्नी माईसाहेब साध्वी होत्या. त्यांचे बंधु नीळकंठराव यांनीं च ग्रांट-डफच्या बखरीवर पहिली टीका करून स्वदेशेतिहासाविषयीं लोकांत आस्था उत्पन्न केली व शिवाजी महाराजांची चिटनीशी बखर छापून प्रसिद्ध केली. कीर्तने घराणें महाराष्ट्रांत मोठ्या मातबरांत मोडूं लागण्यास या बंधूंचे श्रम, योग्यता व पदवी हीं कारण झालीं.

भाषांतरें व स्वतंत्र नाटकें यांचा ओघ वर वर्णिल्याप्रमाणें उत्पन्न झाला तो पुढें वाढत गेला. सन १८७२ सालीं पुण्यांत पुढें प्रसिद्धीस आलेले वकील व पुढारी काशीनाथपंत नातू यांनी विजयसिंग नाटक या नांवानें शेक्स्पियरच्या जुलीयस सीझर नाटकाचें भाषांतर केलें. "भाषांतर या दृष्टीनें ते फारच उत्तम वठलें आहे. तें कृष्णशास्त्री चिपळोणकर यांस अर्पण केलें आहे" (म. ना. पृ. १३८) या विजयसिंगाचे प्रस्तावनेंत "अलीकडे कल्पित कादंबऱ्या आणि नाटकें इत्यादि पुस्तकांचा मोठा पूर आला आहे हें वस्तुतः पाहिलें असतां आपल्या देशाला एक वैभवच आहे, पण त्याची जशा प्रकारची भाषा असावी तशी नसते व कल्पित कादंबऱ्यांतील गोष्टी एकाच तोर्डावर लिहिलेल्या असतात." असे उद्गार यांनीं काढले आहेत.

सन १८७० सालींमहाराष्ट्रांत मोठीच खळबळ उडाली. जुने व नवे किंवा उद्धारक आणि सुधारक असे दोन तट महाराष्ट्रांत उघडपणें पडले होते. एकीकडून लोकहितवादी, रावबहादुर रानडे, विष्णुशास्त्री पंडित इत्यादि नवी मंडळी व दुसरीकडून विठोबा अण्णा दप्तरदार, गजेंद्रगडकर, अशी जुनी मंडळी ओढीत होती. कित्येक 'त्वयार्ध, मयार्ध' करणारी मंडळी हि होती. स्त्रीशिक्षण, विधवापुनर्विवाह इत्यादि विषयांवर भाषणें, सभा, व लेख यांची गर्दी उसळून गेली होती. अखेरीस पुनर्विवाहासंबंधानें श्री. शंकराचार्या-समोर वाद झाला. मोकळा निर्णय कांहीं लागला नाहीं आणि वितुष्टें वाढलीं.

या सामाजिक वादाचें घुसळण चालू असतांना नाटकें, कथा यांतून हि स्वपक्ष-मंडनाचें कार्य साधण्याचा उपक्रम लेखकांनीं केला. १८७१ त डेक्कन कॉलेजांतील एक विद्यार्थी व बाबा गोखले यांच्या शाळेंतील शिक्षक रा. बापूसाहेब चितळे ( मनोहर बाळकृष्ण चितळे ) यांनी " मनोरमा " म्हणून नाटक प्रसिद्ध केलें. ' यांत सद्यस्थितीचें चित्र फार चांगलें दाखविलें आहे. सुनांना सासवांचा जाच, लग्नकार्यांतले विहिणींचे रुसवाफुगवीचे प्रकार, वृद्धांशीं तरुण मुलींचीं लग्नें, गतभर्तृकेचें वाईट मार्गांत पाउल पडलें असतां घडलेले दुष्परिणाम, विद्यार्जनाकरितां परदेशीं गमन इत्यादि सामाजिक चर्चेतले विषय या नाटकांत कर्त्यानें गोंवले आहेत. × × × कित्येक ठिकाणीं या नाटकांत अश्लीलपणा झाला आहे × × ते दोष बाजूला ठेवले तर हें नाटक भाषेच्या दृष्टीनें व रचनेनें चांगलें उतरलें होतें. " ( म. ना. पृ. १४१ ) मनोरमा नाटक ' चावट ' असलें तरी " कांहीं संविधानकाचें चातुर्य व विशेषतः भाषणांचा चटकदारपणा हे गुण चांगले असल्यामुळें त्यास " " उत्कृष्ट " " पंक्तींत " जयपाळ व थोरले माधवराव यांचे शेजारीं " बसविणें भाग आहे " असा अभिप्राय रसिकवर्य निबंधमालाकार यांनी व्यक्त केला आहे. ( मांडे प्रत पृ. २१४—भाषापद्धति. , या नाटकासंबंधीं कै. रा. ब. का. बा. मराठे यांनी आपल्या " नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध " ( इ. स. १८७२ · मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढें वाचला. ) या पुस्तकांत पुढील अभिप्राय दिला आहे, त्यावरून याच्या अश्लील स्वरूपाची कल्पना येईल व हें अलीकडील अंधविश्वासादि नाटकांच्या च पूर्वजपदवीला कसें लायक आहे तें समजेलः—' कोणच्या हि नाटकांत मुख्य पात्र एकीकडे ठेऊन दुसऱ्या गौण पात्रांच्या वृत्तांताचा धागा फार लांब ओढीत नेतां कामा नये. आलीकडे झालेल्या मनोरमा नाटकांत कुशी, गंगू, ठकू, गोदी अशा चार मुली व आणखी हि कांहीं मुली आहेत. त्यांत कुशीचें मनोरमा नांव ठेवून तिला मुख्य नायिका केली आहे. परंतु दुसऱ्या तीन मुलींचें ही वृत्त...ओढीत नेलें आहे... नाटकांत मुख्य नायिका कोण व उद्देश काय, हें शेवटचे दोन प्रवेश वाचीतोंपर्यंत लक्षांत येत नाहीं पुनर्विवाह अवश्य आहे असें दाखविणें होतें तर, मुख्य पात्रावरचा तो प्रसंग फार चमत्कारिक रीतीनें टाळला आहे. × × × **स्वैरसकेशा** नाटकांत असाच गोंधळ आहे. मुख्य पात्र किंवा नायक कोण, हें कांहीं च लक्षांत येत नाहीं. नाटकाचें नांव हि विचित्र ! " ( पृ. ३३ ) " मनोरमा व स्वैरसकेशा

ह्या नाटकांत हलकटपणाचा व दुष्ट वर्तनाचा कडेलोट केला आहे. नीच, कपटी, व्यभिचारी लोकांची एक मालिका च लावली आहे. ××× (पृ. ३५ )" " मनोरमा व स्वैरसकेशा ह्या नाटकांत पात्राचें सालिलोकी म्हणजे स्वतःशीं भाषण फार ठिकाणीं दिलें आहे, त्यामुळें त्यांतला नाटकपणा कांहीं अंशीं कमी झाला आहे ( पृ. ३४ )" मनोरमेच्या कर्त्यानें आपल्या इंग्रजी प्रस्तावनेंत नाटकांतील अश्लीलपणाच्या आविष्करणाचें समर्थन केलें आहे व रा. रामभाऊ जोशी यांनी हि या प्रकरणीं थोडें डोळे मिचकावल्यासारखें केलें आहे. ( मराठी वाङ्मयविवेचन पृ. ३१ ) आपल्या प्रयत्नाचें ध्येय रा. भाजेकर यांनी पुढील वाक्यांत सांगितलें आहे "In a word, there is here a systematic attempt at securing as much as possible a pleasant combination of nature and art." ( म. ना पृ. १४२ )

" इंग्रेजांच्या धाटणीवर " नाटकें, कीर्तने भाजेकर वगैरेंनी केली. तथापि पौराणिक पद्धतीचीं नाटकें चालू होतीं च. अशापैकीं एक रा. बजाबा बाळाजी नेने कृत सैरंध्री नाटक १८७२ त छापून झालें. यांतलीं पात्रें मुखानें कमलबंध, चक्रबंध असे बंध म्हणतात!! पद्यें तर बहुतेक " द्व्यर्थक " आहेत. भाषणप्रकार व विनोदप्रकार उगाच बाष्कळ शाब्दिक कोट्यांनीं भरलेले असतात रा. नेने यांनीं आपल्या प्रस्तावनेंत " बारा सार तत्त्वें क्रमानें... बारा अंकांत गर्भित आहेत " असें सांगून " सरळ वाक्य चालत असतां नियमित स्थळीं प्रास " साधून " ही वाक्यरचनेची पद्धत " काढिल्याचा संतोष मानिला आहे. ह्या ग्रंथास हि महाशय क्यांडीसाहेबांची " मान्यता " ग्रंथकारास मिळाली, अशी नाटकवाङ्मयाची हलाकीची स्थिती त्यावेळीं होती !

नाटकांप्रमाणें च स्थिती नावलांची (नवलपूर्ण तें नावल म्हणून Novel याला हाच शब्द ठेवावा असें का. बा. मराठे यांचें मत होतें.) होती. रा. ब. मराठे १८७२ त म्हणतात "आतांशीं नावलांची कीड फार झाली आहे. लहान मुलें बाळें देखील नावलें लिहून पैसे मिळवूं लागलीं आहेत. " (ना. ना. नि. पृ. १८) तथापि यांतही कित्येक कादंबऱ्या उच्च दर्जाच्या होत्या. मोरोबा कान्होबा यांची **घाशीराम कोतवाल** ही इ. स. १८६३ त प्रसिद्ध झाली. यांत ग्रंथकर्त्यानें नानाफडणीसांचे मर्जीतला पुण्याचा कनोजा कोतवाल घाशीराम याचे कारकिर्दी-

संबंधानें × × लोकांचे मनोरंजनार्थ व उपदेशार्थ गोष्टी लिहिल्या आहेत." यावरून त्यावेळची "अंदाधुंदी" व "अशुद्ध नीतिमार्ग" यांची कल्पना करून देण्याचा ग्रंथकर्त्याचा विचार आहे. या ग्रंथावर शालापत्रकांत पु. ५।१०) कृष्णशास्त्री यांनीं मोठी "विनोदात्मक टीका" केल्याचें विष्णुशास्त्री लिहितात (मांडे-नि. भाशा शुद्धि पृ. २२०) घाशीराम इ. स. १७९१ त लोकक्षोभाला बळी पडला! (ऐ.ले.सं.) परंतु ही वेळ पेशवाईच्या वैभवाची होती, अंदाधुंदीची नव्हती. मोरोबा यांनीं आपला व्यर्थ मिथ्याग्रह करून घेतला आहे. पुढें सर्जेराव घाटग्याची सोटेशाही सुरू झाली तेव्हां (१७९८) मात्र पुण्यांत मोठा कहर उसळला व लोकांची मोठी नागवण झाली. गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचे आत्मचरित्रावरून (अप्रसिद्ध) —तें जरी एकतर्फी समजलें तरी—१८०० च्या सुमारास व पुढें पेशवाईत मोठी बेबंदशाही झाली व त्याचें लवकरच पर्यवसान राज्यनाशांत झालें असें ठरतें स्वकीयांचा उणेपणा भडक रंगांत दाखविण्याचा प्रयत्न मोरोबा कान्होबा यांनीं केला असला तरी तिचे ग्रंथांत चटकदारपणा चांगला साधला आहे असें आम्हांस वाटतें. नांव देण्यांत आपण इंग्रजीचें अनुकरण केलें आहे, तसेंच अनेक गोष्टींच्या या कलापास कादंबरी कितपत म्हणतां येईल वगैरेंची जाणीव ग्रंथकारास असल्याचें आपल्या इंग्रजी प्रस्तावनेंत-अशा दुतोंड्या (!) प्रस्तावना तेव्हां लागत -त्यानें दर्शविलें आहे. विषयांविषयीं ग्रंथकार म्हणतो:—

"The Subjects treated of are partly scientific, literary, artistical, scriptural, historical, natural, and fictitions, calculated, the author trusts, to afford to the Vernacular reader instruction and light reading replete with interest and amusement; and offering to the European linguist......information...... relating to the social and religious notions......of the Hindu sect. With the exception of the kotwal and his priests.........the different characters introduced are preaching the philosophy of the author" (Preface).

या ग्रंथांत २८ गोष्टी आहेत. त्यांत अनेक संवाद घातले आहेत. त्यांत कोठें आळंदीच्या यात्रेची माहिती, गारोड्याच्या गोष्टी, दुर्भिणीचा इतिहास, गोलघुमट इ. चा वृत्तांत, राजापुरची गंगा, सेंटपालचें देऊळ, पापीचा स्तंभ इत्यादि विषय आहेत. असा हा ग्रंथ अद्यापि हि वाचकांचें मनरंजन करण्यास समर्थ आहे.

यानंतर "**मंजुघोषा**" नामक एक कादंबरी झाली. ती उल्लेख करण्या-सारखी आहे. ही नारो सदाशिव रिसबूड यांनीं लिहिली. "फे. स. रि." या संक्षिप्त नांवानें प्रसिद्धीस आलेले व "व्यवहारपद्यसहस्र" या बोधपर पद्यग्रंथाचे कर्ते यांचे "घराण्यांतच" ही मंजुघोषा, विश्वासराव आणि वसंतकोकिळा हीं निर्माण झालीं. यावेळच्या कादंबऱ्यांत ठरीव वर्णनें पुनः पुनः फार यावयाचीं. रा. ब. मराठे यांचा पुढील शेरा साधारणपणें तत्कालीन सर्व कादंबऱ्यांना लागू पडतो:-"सांप्रत जीं नावलें विकत आहेत" यांमध्यें "जेवढे पुरुष तेवढे मदनाचे पुतळे, जेवढ्या स्त्रिया तेवढ्या तिलोत्तमा; प्रत्येक शोकस्थलीं मरणासारखा शोक, व आनंदस्थलीं स्वर्गासारखा आनंद, दुसरी उपमाच नाहीं. नवराबायकोचें भाषण म्हणजे प्रेमाचा लोट! त्यांत अभिप्राय गूढ किंवा गांभीर्य हीं बिलकूल नाहीं." मजुघोषेचें पहिलेंच पान उघडा कीं वर्णनाची रेलचेल! तोच प्रकार मुक्तामालेंत! "विंझणवारे" चालले आहेत, पक्षी गाताहेत, बागा फुलल्या आहेत, मजलसींचा रंग उडाला आहे, जिकडे तिकडे चमचमाट, घमघमाट, लकलकाट, असा थाटच थाट आढळावयाचा! या वर्णनांनी कादंबऱ्यांस मोठी शोभा आली आहे परंतु वारंवार तींच तीं एकसांच्याचीं वर्णनें वाचून वीट येत असला पाहिजे.

या कथेचा नायक वसंतमाधव आहे व नायिका मंजुघोषा आहे. राजपुत्र वसंतमाधव यांस डॉन्‌कडून वायुयंत्र किंवा विमान मिळून तो देश फिरण्यास जातो. बरोबर आपला मित्र प्रधानपुत्र आनंदघन व स्त्री आनंदवल्लरी यांस हि घेतो. वाटेंत विमान भडकून या त्रिवर्गाची ताटातूट होते. मग मंजुघोषा या लावण्य-वती स्त्रीशीं वसंताचा गांधर्वविवाह लागतो. मंजुघोषेच्या आईकडून मंजुघोषेची छळणा होते. माधव व मंजुघोषा विमानांतून निसटतात, तीं अफाट दर्यावरून जातात; तेथें आसन्नप्रसूति मंजुघोषेसह माधवास एका ओसाड बेटावर उतरावें लागतें. तो साहित्य आणण्यास्तव जातो तों विमान तुफान होऊन भडकतो

व मंजुघोषा अरण्यांत एकाकी पडते. मग बेट दुभंगून माघवमंजूंचें नूतन अर्भक पाटींतून वहात जातें व मायलेंकरांची ताटातूट होते. नानाप्रकारचे हाल काढीत आनंदघन, आनंदवल्लरी, वसंतमाधव व मंजुघोषा हिंडत फिरत असतां वसंतमाधव व मंजु० यांची सोय चांगली लागून त्यांस वैभव प्राप्त होतें. अशा स्थितींत वसंतमाघव आईबापांस भेटण्यासाठीं वैदर्भदेशास जात असतां आनंदवल्लरी व आनंदघन या सर्वांच्या गांठी होतात. वसंतमाधवास या पुढें अधिक राज्य मिळतें, तो मुलगा हि हातीं लागतो. दोन बायका हि गुण्यागोविंदानें राहणाऱ्या मिळतात. अशा सुखसागरांत तो लोळूं लागतो. असें या कादंबरीचें थोडक्यांत कथासूत्र आहे. यांतील वर्णनांत घड्याळें, विमानें, वाल्शीटें आहेत, लोक वर्तमानपत्रें वाचतात व फोटोग्रॅफिक स्टूडिओ हि नगराला शोभा आणितात, मात्र राजाच्या स्वाऱ्या निघतात त्यावेळीं सर्व थाठ जुन्या पद्धतीचा असतो. एक काल, एक समाज असा, कांहीं मेळ नाहीं, सर्व खिचडी आहे. कादंबऱ्यां कशा रचाव्या याविषयीं शास्त्रीय माहिती या वेळच्या लेखकांना फारच थोडी होती. इंग्रजी शिकलेल्यांनीं या कामीं पुढाकार घेऊन मार्गदर्शी व्हावें म्हणून रा. ब. मराठे यांनीं आपला नावलनाटकांवरील निबंध लिहिला, पण रावब. लिहितातः—

"But no...the all-engrossing fondness for Government service will not leave our Marathas free for the pure and sublime purposes of extending the literature of the Vernacular and of conferring a blessing on their own people." सुक्षितांना असा उपदेश करून पुढें रावब. नी काय केलें? 'पीच्छेसे आया आगे चलाया' पैकींच प्रकार! मंजुघोषाकार रिसबूड यांनीं प्रस्तावनेंत "मला इंग्रजींचा संस्कार मुळीं च" नाहीं व हे कादंबरी "ग्रंथ अजून दहा दिवसांचे आहेत." अशी प्रांजळ कबुली दिली आहे. "विवाहविषयींचीं हल्लींची आपली रीत ती तर केवळ आपल्यास लाज आणणारी आहे × × × हिंदु लोकांच्या आयुष्यामध्यें अतिशय मोहक सद्गुण किंवा दुर्गुण हे दोन्ही ही आढळत नाहींत व ही च नाव्हेल्स्सारखे ग्रंथ करण्यास हल्लीं अडचण होते" असें हि हा ग्रंथकर्ता म्हणतो यावरून हा ग्रंथकार खोलबुद्धीचा व विचारी दिसत नाहीं, उथळ आहे. या हिंदुस्वभावदौर्बल्यामुळें आपण "अद्भुत गोष्टींच्या कबजांत येतो" असा याचा अभिप्राय आहे. पण हा

अभिप्राय कोता व लंगडा आहे. मनुष्यसमाजाची मार्मिक परीक्षा करून त्यांच्या अंतःकरणांत खोल बुडी देऊन तेथली तळचीं महार्ह रत्नें बाहेर प्रकटून त्या प्रभेनें जगाला थक्क करणारे ग्रंथकार अद्यापि मराठींत कादंबऱ्या लिहूं लागले नव्हते. प्रस्तुतची मंजुघोषा लिहिण्याचा आपला हेतू ग्रंथकर्ता येणेंप्रमाणें देतोः— "माझ्या मनांत दोन गोष्टींकडे विशेष लक्ष लावावें असें येऊन त्या साधण्याविषयींचा मी प्रयत्न केला आहे त्या गोष्टी ह्याः—कोणी मनुष्य आपल्या आवांक्याबाहेर एकादें कृत्य करूं म्हणेल तर त्यास त्या कामांत पुष्कळ संकटें येऊन अखेरीस कदाचित् तें काम सिद्ध होत नाहीं; व मातापितरांच्या आज्ञेचा भंग केल्यामुळें पुष्कळ दुःखें प्राप्त होतात आतां तो आज्ञाभंग करतांना जर तो मनुष्य सन्मार्गांत असला तर त्या दुःखाचा परिहार होऊन त्यास अंतीं सुख प्राप्त होतें. हे दोन उद्देश धरून मी लिहिलें आहे." (मंजुघोषा प. प्रस्तावना पृ. ५ सन १८६७.) वसंत माधव पितरांच्या इच्छेविरुद्ध देशपर्यटणास गेला व संकटचक्रांत सांपडला; परंतु तो सच्छील असल्यामुळें या संकटांतून हि बाहेर बचावून अंतीं सुखी झाला. एकंदर या कादंबरीची सजावट बेताची च आहे; एखादी साधुवाण्याची सत्यनारायणी कथा च म्हणाना पण! जरा अधिक मसालेदार व रसभंग!

**मुक्तामाला** ही कादंबरी मंजुघोषेची च समकालीन आहे. हिची दुसरी आवृत्ति १८७० त झाली आहे. ही मंजुघोषेपेक्षां मोठी आहे. मंजुघोषेचे दहा भाग व पृ. १६९ आहेत व मुक्तामालेचे ९ भाग असून पृ. २३० सुमारें आहेत. दोन्ही कादंबऱ्या वाचतांना एक मौज अशी वाटते कीं, यांच्या संविधानकांत कांहीं ठिकाणीं फार सारखवटपणा, जुळ्या भावंडाप्रमाणें, दिसतो. मुक्तामाला ही शांतवर्मा नामक एका जहागिरदाराची कन्या; ती भयानक राजाचा दुर्गम प्रधान धनशंकर यास देतात. शुक्राक्ष हा शांतवर्म्याचा लांबचा पुतण्या व सोमदत्त हा एक गरिबाचा मुलगा या दोघांस शांतवर्मा जवळ ठेवून वाढवितो व शुक्राक्षास धनशंकराचे वशिल्यानें हुद्याची नोकरी देववितो. शांतवर्म्यास बरे च दिवस पुत्र नव्हता, त्यामुळें शांतवर्म्याचे संपत्तीचा वारसा शुक्राक्षाकडे यावयाचा होता. परंतु मुक्तामालेच्या जन्मानें सारेंच फिसकटलें. त्यामुळें तो दांत धरून शुक्राक्ष भयानकराजास व्यसनी व जुलुमी बनविणाऱ्यांच्या कंपूंत राहून धनशंकरावर राजद्रोहाचा आळ आणून त्यास कैद करवून अखेर डोहांत बुडविण्याची तजवीज करितो. मुक्तामाला कोणा पंचाक्षराच्या नादानें धनशंकराची तुरुंगांत गांठ घेण्याचे खट-

पटींत असतां पंचाक्षरीबोवाच्या कपटानें ती शुक्राक्षाचे तावडींत सांपडते तों च तिला गुलालसिंग सोडवितो. हीं दोघे हि पठाणवेषानें उज्जनीस येतात. तेथं मुक्तामाला तुरुंगांत पडते व सुटते. पुढें तिला कमलाक्ष मुलगा होतो. उज्जनीचा उछू मामलेदार भद्राक्ष तिजवर बदनजर धरतो. शुक्राक्ष व भद्राक्ष मिळून तिचे हाल करतात; व कमलाक्षाची व तिची ताडातोड करितात. मग मुक्तामालेस पेटींत पुरून तिच्या मुलास ( कमलाक्ष ) डोहांत बुडविण्याची योजना करून दुष्टात्मा शुक्राक्ष कृतकृत्य होऊन परत येतो. भद्राक्षाची बदली होते त्यामुळें लांच देऊन सोमदत्त सुटतो व वादळांत सांपडून एका निर्जन बेटाला लागतो. शुक्राक्षास फसवून भद्राक्ष दुसऱ्या च एका स्त्रीस मुक्तामाला म्हणून पुरून टाकतो व मुक्तामालेस सोमदत्त लागला त्याच बेटांतल्या देवळांत बंदींत ठेवतो तेथें सोमदत्त तिला अचानक भेटतो व मग साहसानें तीं आपली सुटका करून घेतात. निराश झालेला शांतवर्मा तीर्थयात्रेस जातो. तेथें चमत्कारिक योगानें सर्वांच्या गांठी होतात. मग भयानक राजाचा पराभव करून जुनी धनशंकरपक्षी मंडळी सत्ताधीश होतात व शुक्राक्षाला शासन होतें.

मुक्तामाला व मंजुघोषा या दोघांवरील संकटपरंपरा, त्यांचीं साहसें, अरण्यवास, मायलेंकरांची ताटातूट, अकल्पित रीतीनें सर्वांची भेट व आनंदीआनंद हे प्रकार दोन्ही कादंबऱ्यांत सारखे च आहेत. उठावांत मात्र फरक आहे. मुक्तामालेपेक्षां मंजुघोषेंत कर्त्याची शब्दश्रीमंती वरचढ आहे. बाकी कथेचा नूर सारखाच. मुक्तामाला ही लक्ष्मण मोरे हळबेशास्त्री यांनी लिहिली. हे गृहस्थ मराठी ज्ञानप्रसारकांत हि लिहित असत. तसेंच हे मुंबईच्या परमहंस मंडळींत "आस्थेवाईक" म्हणून मोडत (अरुणोदय पृ. १७). रत्नप्रभा वगैरे कांहीं आणखी कादबऱ्या यानीच लिहिल्या.

मंजुघोषा—मुक्तामाला इत्यादि नायिकांवर कर्त्यांनी "जागोजाग अशीं संकटें आणलीं आहेत कीं पातिव्रत्यभंग झाला च पाहिजे" न झाला तर "त्या इहलोकच्या स्त्रिया नव्हत. सांप्रतच्या स्त्रिया त्यांच्या तुकीस उतरणार नाहींत; व तसें पातिव्रत्य त्यांच्या आटोक्यांत हि नाहीं" असा अभिप्राय रा ब मराठे ( ना. ना. पृ. ७ ) देतात. पण साध्याच्या मनाला टोंचणारी आंतली टोंचणी व शीलवंतांना आंतून खोलांतून च मिळणारा विलक्षण धीर व येणारा जोर यांची यथार्थ कल्पना लक्ष्यांत घेतली तर रा. मराठे यांच्या अभिप्रायांतला छातीठोकपणा

डळमळल्याशिवाय राहाणार नाहीं. मंजुघोषेंतल्या भाषेचा एक पुढील नमुना मराठे यांनी ( पृ. १० ) देऊन तिचा योग्य धिःकार केला आहेः—मंजुघोषेचा बाप आपल्या बायकोवर कधीं रागवायाचा नाहीं तो रागावला व म्हणतो "माझ्या इष्ट कन्येनें नृपश्रेष्ठ कुमारास शिष्ट जन ही संतुष्ट होऊन ज्यास मान तुकावतील अशा अष्टविवाहांतील वरिष्ठ गांधर्व विवाहें करून वरून ती यथेष्ट सुखोपभोगानुभव घेणार, तों या दुष्टमति भ्रष्ट स्त्रीनें केवळ एकनिष्ठ सापत्न व मत्सर भावानें तिजवर महा अरिष्ट आणावें असा हेतु धारण करून च माझे मनांत तिजविषयीं क्लिष्ट कल्पना भरवून रुष्ट अंतःकरणानें तिजला नाना कष्ट भोगावयास लावून नष्ट दशेस लाविलें हें स्पष्ट आहे." काय 'ष्ट' काराची गर्दी ! हें खष्ट वाक्य ऐकिल्यावर ज्यास वाद इष्ट आहे तो असें म्हणेल कीं असल्या रागाच्या अश्लिष्ट प्रसंगीं मष्टि व गरिष्ठ शब्दांचें साधिष्ठ काम नाहीं!

वरील दोन कादंबऱ्यांप्रमाणें च **विचित्रपुरी–सुलोचना** इत्यादि इतर 'नावलें' त्या वेळीं लिहिलेलीं होतीं. 'विचित्रपुरीमध्यें चार पुरुषांचें चरित्र लिहिलें आहे;' त्यांत राजपुत्र व प्रधानपुत्र हे कलकत्ता युनिव्हर्सिटीचे पदवीधर कल्पिले आहेत ! विचित्रपुरींतील पद्मनयनेला मंजुघोषा व मुक्तामाला यांचेप्रमाणें च किती तरी संकटें भोगावयास लाविलीं आहेत-" विचित्रपुरी नावलांत व हल्लींच्या बहुतेक नावलांत संविधानकांमध्यें गुंतागुंत फार." ×× "मंजघोषेमध्यें संविधानकाचे दोष जागजागीं आहेत." "सुलोचना व माधव यांतील गोष्ट बरी च सुलभ आहे." ( मराठे–ना. ना. )

याप्रमाणें स्वतंत्र कथानकांची हकीकत झाली. परंतु यांपेक्षां हि भाषांतर रूपानें एक दोन अशा सुंदर पुस्तकांची भर मराठींत पडली कीं त्या योगानें मराठी वाङ्मयाला कायमची शोभा आली. ही भाषांतरें म्हणजे **आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी व रासेलस** हीं होत. इ. स. १८६१ ते ६५ या चार वर्षांत पहिलें पांच भागापावेतों झालें व १८७१ त दुसरें झालें हीं कृष्णशास्त्री चिपळोणकर यांनी केलीं. दोन्ही अप्रतिम वठलीं आहेत. पुष्कळ भाषांतरें होतील पण कृष्णशास्त्रयांच्या रासेलसासारखें भाषांतर आढळणें मुष्कील ! मूळांतला अभिप्राय मनांत उतरवून मग तो पुनः स्वतःचे डोक्यांतून मराठींत आपलासा च दिसेलसा उतरून त्याचा जुना वास बिलकूल घालवून

वाचकांस सादर करण्याची अवघड हातोटी कृष्णशास्त्री यांस उत्तम साधली होती. दोन्ही भाषा चांगल्या पचनीं पाडल्याशिवाय उत्कृष्ट, निर्दोष व सरस भाषांतर निपजावयाचें च नाहीं. रासेलसांत रासेलस, इम्लाक असलीं परकीय नांवें काढलीं तर हें म्हणजे भाषांतर असेल अशी शंका स्वप्नांत सुद्धा यावयाची नाहीं. अरेबियन् नाइट्स् चे पुढील भाग विष्णुशास्त्री व हरिभाऊ दामले यांनी पुरे केले. रासेलसांत सुद्धा विष्णुशास्त्री यांचें अंग होतें असें रा. विद्याधरपंत भिडे यांनी निबंधचंद्रिकेंत ( १८८३।१०।११ ) प्रसिद्ध केलें होतें. १८७६ सालीं रासेलस पुनः छापतांना विष्णुशास्त्री यांनी हा ग्रंथ केवळ काल्पनिक नाहीं तर " प्रतिपादनरूप ग्रंथाचा आपल्या भाषेंत हा पहिलाच मासला होय " असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. तसें च " मराठी भाषेच्या सरणीस इंग्रजी ग्रंथांतील विचार कसे उतरवावे × × × त्याची समजूत पुढील ग्रंथावरून बरी च पडेल. तसेंच शब्दांचें व अर्थाचें सौष्टव व स्वारस्य ही हि मराठी अभ्यास करणारांस लक्षपूर्वक वाचनांतीं कळण्यासारखीं आहेत. " गोड, सोपे व साधे शब्द व त्यांचीं गोंडस वाक्यें यांनी याच्या ग्रंथांना रसवत्ता आलेली आहे; व ते फार लोकप्रिय झालेले असत. बाळबोधकर्ते कृ. शास्त्रीबावांविषयीं ते आमच्यांतले जॉन्सन् होत असें म्हणतात; ( बाळबोध पु. ६।७६ ) व या मराठी जॉन्सननें इंग्रजी जॉनसन्चा रासेलस किंवा सुखाचा शोध हा ग्रंथ मराठींत उतरावा यांत औचित्य वाटतें. वडिलांनी रासेलसचें भाषांतर केलें तर चिरंजीवांनी त्या महापंडिताचें चरित्र लिहून देशबांधवांस ( नि. मा. ) बोध केला.

**कृष्णशास्त्री चिपळोणकर** यांचा जन्म इ. स. १८२४ त झाला. त्यांची घरची गरिबी होती. ते प्रथम पुणें पाठशाळेंत मोरशास्त्री साठे यांजपाशीं अलंकारादि तीन शास्त्रें—कोणी म्हणतात एका वर्षांत—पढले. कृष्णाचें बुद्धिवैभव पाहून व त्यानें आपलाही पराभव केलासें पाहून मोरशास्त्री त्यांस बृहस्पति म्हणूं लागले. या चतुर गुरूनें 'प्रसंगवोळखी' धरून कृष्णशास्त्री यांस इंग्रजी शिकण्याचा उपदेश दिला व शास्त्रीबोवा लवकरच इंग्रजींत पंडित झाले. विद्वत्ता व बुद्धिमत्ता व इंग्रजी व मराठी यांचा असा संगम होतां च कृष्णशास्त्री मोठी प्रतिष्ठा पावले. त्यांस 'ट्रान्स्लेशन् एक्झिबिशनर' ची जागा १८५२ सालीं मिळाली. लवकरचे पुणें पाठशाळेंत ते मराठीचे असि. प्रोफेसर झाले × × इ. स. १८५९ सालीं कृष्णशास्त्री यांची बदली दक्षिणाप्रैझकमिटीचे सेक्रेटरीचे जागीं झाली....हें काम

करीत असतां च शास्त्रीबुवांनीं बरेच संस्कृत नाटकांचीं भाषांतरें तपासून शुद्ध केलीं. यानंतर त्यांस १८६५सालीं पूना ट्रेनिंग कॉलेजच्या प्रिन्सिपालाची जागा मिळाली × × यापुढें १८६८ सालीं शास्त्रीबुवांची बदली ' रिपोर्टर आन् दि नेटिव प्रेस ' या जागेवर झाली." ( ल. कृ. चि. यांचें वि. कृ. चिपळूणकर चरित्र पृ. ७-८ ) " विशेषेंकरून रिपोर्टरचें काम साहेब लोकांस देखील ह्यांच्या इतकें चांगलें करतां आलें न हीं, असें सरकारानें म्हटल " (बाळबोध पु ६–७५) या च जागेवर असतां निबंधमालेवर 'एलिफस' ऊर्फ 'हत्ती' बोवांनीं हल्ला चढविला व रिपोर्टर झोंपा घेतात काय, कां सगळे च ब्राह्मण कटांत शिरले आहेत असा बेहोष सवाल केला! त्या वेळीं थोरले शास्त्रीबोवा च रिपोर्टर होते, ती कथा पुढील काळांतली प्रसिद्ध आहे. ट्रेनिंग कॉलेजांत असतां त्यांना व्याकरणावर साहजिक च विचार करावा लागला. त्याचें फळ म्हणजे त्यांचे शाळापत्रकांतील त्या विषयावरील निबंध. शाळापत्रक हें मासिक १८६१ त निघालें व सुमारें १८७५ पावेतों चाललें! यांत पितापुत्र चिपळोणकर यांचे फार चांगळे लेख व ग्रंथपरीक्षणें आलीं। धाकट्या शास्त्रीबुवांनीं आपल्या लेखणीला धार लावून तयार केली ती या च शाळापत्रकांत. संस्कृत कविपंचकावर त्याचा उत्कृष्ट निबंध यांत च आला व मराठी कवींविषयीं त्यांनीं लिहिण्यास प्रारंभ केला होता तोंच माशी शिकली! शाळापत्रक मासिकानें वाङ्मयाची सेवा या काळांत केली, ती प्रतिष्ठित व खबरदारीनें केली यांत संशय नाहीं.

१८५२ चे सुमारास मिशनेरी मंडळींचा जोर फार वाढलासें पाहून कृष्णशास्त्री यांनीं 'विचारलहरी ' पत्र सुरू केलें होतें. " The Traimasik, the old Dnyanprasarak and the Vicharlahari had more brilliancy, uarnestness about them than the usual stuff with which the magazines are filled in these days." असा शेरा पंडितश्रेष्ठ रावब. रानडे यांनीं दिला आहे. ( R. on Marathi cat. p. 6) या कामीं सरकारची खप्पा मर्जी कृष्णशास्त्र्यांवर झाली, तेव्हां त्यांनीं स्वतंत्र शाळा काढण्याचा बेत धरला होता ( वि. कृ. च. पृ. ८ ) पण तितक्या थरावर प्रकरण गेलें नाहीं. कृष्णशास्त्री यांनीं १८६१ त 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' हा विविधविषयक सुंदर ग्रंथ लिहिला; त्यावरून इंग्रजीच्या सहवासानें हा मराठी शास्त्री फिरून पुढें नास्तिकवादांत कसा शिरला असेल, याचा धागा मनांत बांधतां

येतो. आतां सांगावयाचे राहिलेले शास्त्रीबोवांचे मुख्य ग्रंथ म्हटले म्हणजे एक साक्रेतिसाचें चरित्र व दुसरा पद्यमंजरी हा काव्यग्रंथ. दोन्ही सरस उतरले आहेत. एकंदरींत कृष्णशास्त्री यांनीं मराठीची सेवा फार उत्तम प्रकारें केली.त्यांचे ग्रंथ "बहुतेक भाषांतररूपानेंच आहेत; मूळ ग्रंथ असा एक ही नाहीं. तथापि त्यांची भाषा शुद्ध, सोपी, खुबीदार आणि गोड अशी आहे, ती इतकी कीं, ते ग्रंथ भाषांतरें आहेत म्हणून भासत सुद्धां नाहीं." ( वि. कृ. च. पृ. ८ ) रासेलस ग्रंथ पहा, म्हणजे शास्त्रीबोवांच्या विलक्षण करामतीचा अनुभव येईल.शास्त्रीबोवा जरी वर्तनाचे जरा ढिले होते,तथापि त्यांनीं आपल्या बुद्धिमत्तेमुळें व विद्वत्तेमुळें जुन्या नव्या,देशी व इंग्रजी सर्व मंडळी वर विलक्षण छाप पाडिली होती.तशीच छाप त्यांनीं आपल्या लेखांनीं व ग्रंथांनीं ही पाडिली व " आपल्या अलौकिक व मनोरम ग्रंथरचनेनें मराठी भाषेस बरेंच चांगलें रूप आणून ती विष्णुशास्त्री वगैरे पुढील विद्वानांचे उपयोगाकरितां उत्तम तऱ्हेनें कमावून तयार करून दिली असें म्हणण्यास हरकत नाहीं !" (वि. कृ. चि. च. पृ. ९) अशा जाड्या पंडिताच्या हातून झाली यापेक्षां ही भरींव पुस्तकें व्हावयास पाहिजे होतीं, ही रा. गायकवाड यांची तक्रार योग्य म्हटली पाहिजे. (पुर्णेवर्णन भाग १पृ.७९) कृष्णशास्त्री २० मे १८७८ रोजीं वयाचे ५४ व्या वर्षी वारले । मोठा कर्ता पुरुष गेला म्हणून सारें महाराष्ट्र हळहळलें !

आपण विवेचनासाठीं घेतलेल्या १८५७–७४ या काळांत वर वर्णिल्याप्रमाणें काव्य-नाटकांची नवी शाखा अस्तित्वांत येऊन ती जोमानें वाढूं लागली. परंतु ललित किंवा विदग्ध वाङ्मय सोडलें तरी या काळांत इतर विषयांवर ही वाङ्मय जोरानें वाढत होतें. हा काळ सामाजिक खळबळीच्या सुरवातीचा होता. धार्मिक व सामाजिक विषय यांची आपल्याकडे अगदीं एकजीव गुंतागुंत झालेली आढळते. १८७० सालीं पुण्यांत पुनर्विवाहाचा वाद झाला व त्या विषयावर अनुकूल प्रतिकूल बाजूनीं बरींच छोटीं पुस्तकें झालीं. नवीन मंडळींत या विषयावर पुष्कळ लिहिणाऱ्यांत **लोकहितवादी** कै. नामदार रावब. गोपाळराव हरी देशमुख ऊर्फ सुप्रसिद्ध यांस अग्रस्थान दिलें पाहिजे. हे पुण्यांत १८२३ सालीं जन्मले ( बा. बो. पु. ६ पृ. १७१ ) म्हणजे हे कृष्णशास्त्री यांच्यापेक्षां अमळ वडील होते. " त्यांचे वडील हरीपंतभाऊ हे इ. स. १८३७ त निवर्तले. तेव्हां त्यास पेशवाईपासून दहा हजारांची जहागीर होती ती जप्त झाली. × × × तेव्हां इंग्रजी शिकल्यावाचून चांगलें काम मिळावयाचें नाहीं, असें मनांत आणून इ. स.

१८४० त गोपाळराव पुण्याच्या इंग्रजी शाळेंत जाऊं लागले ... ... इ. स. १८४४ त त्यांस पुण्याच्या जज्ज कचेरींत ७७ रुपये दरमहाची इंग्रजी कारकुनाची जागा मिळाली. × × इ. स. १८४६ त त्यांची मुनसफीची परीक्षा उतरली आणि त्यांस इ. स. १८५२ त सातारा जिल्ह्यांत मुनसफी × × मिळाली. पुढें ते प्रिन्सिपाल सदर अमीन × नंतर—असिस्टंट इनाम कमिशनर (दरमहा रु. ६००) × नंतर एक दोन वर्षे हैकोर्टांत × बालविल्यावर १८६४ त गोपाळराव अमदाबादेस अ. जज्ज झाले. × × ह्या वेळेपर्यंत अ. जज्जाची जागा काळे लोकांस पूर्वी कधीं मिळाली नव्हती. इ. स. १८६५ त ह्यांस मुंबईस स्मालकाज कोर्टाचे जज्ज नेमिलें. × बदली इ. स. १८६७ त अमदाबादेस × तेथें ते १८७७ पर्यंत होते × पुनः नाशकास जाइंट जज्ज × आणि इ. स. १८७९ त × पेन्शन दिलें. ह्यानंतर ह्यांस मुंबईच्या युनिव्हर्सिटीचे फेलो जस्टिस ऑफ दि पीस, पहिल्या प्रतीचे सरदार, कायदे कौन्सिलचे सभासद इतके मानपान मिळून हे काहीं दिवसपर्यंत रतलामच्या महाराजाचे दिवाण ही झाले होते." ( बाळबोध पु. ६–१७०७१७१ ) हे इ. स. १८९२ सालीं ९ आक्टोबरला निवर्तले.

लोकहितवादी यांचा सार्वजनिक प्रश्नांचा अभ्यास फार दांडगा असून लोकांत स्वमतानुसार जागृति करण्यासाठीं ते मनोभावें करून सतत ४० वर्षे झटले. "त्याचा लोककल्याणनिमित्तक उद्योग अव्याहत चालू आहे. जुन्या-रीतिप्रमाणें म्हटलें म्हणजे अशा वयांत रावबहादुरांनीं एखादें क्षेत्र पाहून तेथें 'हरीहरी' म्हणत कालक्षेप करावयाचा व आमच्या अर्वाचीन मंडळीच्या पद्धतीप्रमाणें पाहिलें तर चहा, कॉफी, लायब्ररी समाज इतक्यांत कायतें सदोदित गुरफटलेलें असायाचें; पण त्यांचा क्रम फार वेगळया तऱ्हेचा आहे. दहा गेले पांच राहिले, आता आपलें काय उरलें आहे, स्वस्थ कोठें तरी बसून राहिलेले चार दिवस सुखासमाधानानें काढावे, संतत झाली, संपत झाली, संसार आटपला × × × इत्यादि नाउमेदीचे व सुस्तपणाचे उद्गार चाळिशीच्या सुमारास हि आमच्या देशांतील मंडळीचे सामान्यतः निघूं लागतात, त्यांतलें बिलकूल वारें ऐन साठीच्या अंमलांत हि प्रस्तुत ग्रंथकाराचे ठिकाणीं आढळत नाहीं. देशहितार्थ उलाढाल करण्याविषयीं हव्यास, ग्रंथरचना, सभापांडित्य वगैरेविषयीं हौस, हीं सर्व नव्या दमाच्या तरुण बांडांत हि आढळणार नाहींत अशीं या वयातीत पुरुषाच्या ठायीं आज घटकेला तरतरीत आहेत" असे आद-

राचे उद्गार लोकहितवादींवर 'यथास्थित कुठारप्रयोग' करतांना देखील मालाकारांना काढावे लागले यावरून मालाकारांची जशी गुणग्राहकता दिसून येते तशीच लोकहितवादींची थोरवी हि कळून येते. यांची देशस्थितिविषयक, विशेषतः आपल्या लोकांतील अनेक खरीखोटीं व्यंग्यें निर्भीडपणें दर्शविणारीं शेंकडों पत्रें १८४८ पासून च प्रभाकरादि पत्रांतून प्रसिद्ध झालेलीं आहेत; इंदुप्रकाश (१८६४) व वृत्तवैभव (१८८४।५) वगैरे पत्रांतून हि त्यांनीं पुष्कळ च पत्रें लिहिलीं आहेत. वृत्तवैभवांतले पत्रांत अनेकविध ऐतिहासिक माहिती सडकून भरलेली आहे. "आमच्या देशाच्या माहितीसंबंधानें रावब. हे केवळ समुद्र आहेत." असें कै. ओक म्हणतात तें अगदीं यथार्थ आहे. त्यांच्या ऐतिहासिक गोष्टी वगैरे लेख वाचले म्हणजे त्यांच्या अफाट माहितीचा अचंबा वाटतो. असें ऐकण्यांत आहे कीं, रावबहादुर कोठें गेले, कांहीं पाहिलें किंवा कोणी भेटला कीं, लागलीच यांचें गिरमीट सुरू व्हावयाचें व मिळेल ती माहिती काढून टिपणवहींत दाखल व्हावयाची. असा चौकस व साक्षेपी पुरुष फार थोडा आढळण्यांत येतो.

पुण्यास १८४८ त ज्ञानप्रकाश पत्र "यांनी मनःपूर्वक श्रम घेऊन चालविलें" (पुणेवर्णन भा. १।१२१). तसें च पुण्याची नेटिव्ह जनरल लायब्ररी स्थापण्यांत यांचा च पुढाकार होता. देश अज्ञानानें बुडाला तेव्हां सर्वत्र ज्ञान शतमुखांनीं वाढविलें पाहिजे हा यांच्या लिहिण्याबोलण्याचा मुख्य रोख आहे व तो सर्वथैव योग्य आहे. याचें प्रतिपादन करतांना त्यांनीं ब्राह्मणांवर व ब्राह्मणी राज्यांवर फारच हत्यार चालविलें; पण त्यांत समतोलपणा न राखल्यामुळें कित्येक स्थळीं याचें लिहिणें कुत्सित व अन्यायाचें झालें आहे त्यामुळें ह्यांच्या लेखांपासून व्हावा तितकी इष्ट कार्यसिद्धी झाली नाहीं. इतकेंच नव्हे तर स्वजनांविषयीं त्यांनीं अवास्तव व अतिरिक्त अनादर वाढविण्यास सहाय्य केलं. त्यामुळें कै विष्णुशास्त्री यांस 'इंद्रायस्वाहा तक्षकायस्वाहा' म्हणून आपल्या दुर्मतविध्वंसनसत्रामध्यें रावबहादुरांचा हि बळी द्यावा लागला. त्या काळीं शास्त्रीबोवांची मात्रा न मिळती तर बेहोषपणा वाढला असता; परंतु सांप्रत ती भीति उरली नाहीं; यामुळें लोकहितवादींचा प्रचंड लेखसंग्रह पाहून त्यांतील ज्ञानभांडार सर्वांनीं मनसोक्त लुटणें हितकारक च होईल. त्यांच्या निबंधसंग्रहांत 'राम' नाहीं असा ध्वनि शास्त्रीबोवांच्या टीकेंत प्रकट झाला आहे, परंतु तो ग्राह्य

नाहीं. शास्त्रीबोवांचे लेखावरून वाटतें त्यापेक्षां या ग्रंथकाराची योग्यता निःसंशय अधिक आहे. त्यांची कळकळ फार मोठी होती आपलें 'लिखितशतक' लोकांस नजर करतांना ते म्हणतात, "लोकहितवादीनें कोणाची मजुरी पत्करली नाहीं. कशाची अपेक्षा, आशा किंवा इच्छा धरली नाहीं. कोणाचे सांगण्यावरून व शिकविल्यावरून कृत्रिम वर्णन केलें नाहीं. लाभावर किंवा द्रव्यावर नजर देऊन कीर्ति व्हावी या हेतूनें लिहिलें नाहीं. इतके श्रम जे केले ते फक्त लोकांस त्यांची वास्तविक स्थिति कशी आहे, ती कळावी, त्यांनीं सुधारावें, त्यांस इहलोकीं सुखवृद्धी व्हावी, परलोकाचें साधन घडावें व आपले बहुत काळापासून दृढ ग्रह झाले आहेत त्यापैकीं कांहीं अविचारानें व कांहीं मूर्खपणानें जडलेले आहेत ते कमी व्हावे किंवा नाहींसे व्हावे इतक्या च हेतूनें मी यथामति व स्वइच्छेनें वेतनावांचून श्रम केले आहेत; व जितकें लिहिलें आहे तें अक्षरशः खरें खरें निवडून विचार करून काळजीनें लिहिलें आहे. हें सर्व लोकांस नजर आहे....... यास्तव या ग्रंथावर लोकहितवादी आपली सत्ता ठेवीत नाहीं." यांत फक्त 'खरेंखरें' म्हणजे लो. हि. वा. स जें तसें मनापासून वाटलें तें, असा अर्थ समजला म्हणजे यांतील शब्दनिशब्द मान्य करण्यास चिंता नाहीं. शास्त्रीबुवांनीं आपल्या प्रखर मालामंत्रोदकानें लो. हि. वा. नीं. उभें केलेलें स्वजननिंदेचें घोर भूत गाडून टाकिलें हें योग्य झालें. पण या भूताबरोबर ज्या त्यांनीं च लावलेवाढविलेल्या बहुशाख ज्ञानवृक्षावर तें भूत नाचत होतें तो आपण टाकण्याचें कारण नाहीं. तो भव्य व सेव्य च आहे! न्या. रानडे यांच्या विशाल व सूक्ष्म दृष्टीच्या परीक्षणांतून रावबहादुर देशमुख हे कसे सुटले, कळत नाहीं! रानड्यांच्या Remarks किंवा Growth of Marathi literature मध्यें लोकहितवादींचें नांव नाहीं हें मोठें वैगुण्य आहे! नाहीं म्हणायला फक्त निवडक यादींत लो. हि. वा. चा पृथ्वीराज चव्हाण आहे तेवढाच!

ऐतिहासिक ग्रंथांत रा. जगन्नाथ प्रभाकर सरंजामेकृत ( १८७२ ) **शिंदे अलिजाबहादर ह्यांचे घराण्याचा इतिहास** हें पुस्तक महत्वाचें आहे. रा. सरंजामे इनामकमिशनाकडे नोकर असल्यानें त्यांस ऐतिहासिक माहितगारी होती. त्यांनी प्रस्तावनेंत "महाराष्ट्र देशांत जे सरदार व मुत्सद्दी वगैरे लोक महान् पराक्रमी होऊन गेले त्यांचें इत्थंभूत वर्णन जर कोणी वेळोवेळीं लिहिलें असतें तर एक लहानसें भारत जाहलें असतें" असा योग्य अभिमान प्रगट

केला आहे. हा त्यांचा ग्रंथ बहुतेक इंग्रजी ग्रंथावरून च त्यांनीं केला आहे. जुने लेख भरपूर न मिळाल्यामुळें ग्रंथकाराची निराशा झाली.

तसेंच इ. स. १८६६ त रा. विष्णु गोपाळ भिडे चिटणीस निसबत पंत सचीव यांनी लिहिलेला सातारचे श्री. छत्र० **शिवाजी महाराज व प्रतिनिधी आणि अष्टप्रधान यांचा इतिहास** "सातारचे दप्तरांतील चांगले माहितीवरून" वगैरे लिहिला. हा फार महत्वाचा व मोठा म्हणजे २६२ पानांचा ग्रंथ आहे. हा तितका प्रसिद्ध नाहीं.

**हिंदुस्थानाची शकावली** ( इ. स. १८६० ) हें उपयुक्त पुस्तक रा. गोविंद राजी मांडे यांनी टॉमस् मॅक्कुडेनच्या ग्रंथावरून केलें. यांत इ. स. १ ते १९०० पावेतों सर्व प्रकारच्या ठळक कालगणनापद्धतींची जंत्री व थोडी ऐतिहासिक माहिती हि आहे. शोधकांस फार उपयोगी आहे.

ऐतिहासिक वाङ्मयांत लो. हि. वा. एवढा च ग्रंथकार या काळांत नांव घेण्यासारखा घेण्यासारखा निघाला! बाकी रा. विनायक नारायण भागवत–लिमडी कारभारी–यांनीं १८७१ त मेकॉलेच्या निबंधाधारें लिहिलेला "लार्ड राबर्ट क्लैव" किंवा असलीं कांहीं किरकोळ पुस्तकें काय झालीं असतील तेवढींच. किंबहुना या शाखेकडे लोकांचें लक्ष्य च गेलें नव्हतें. चरित्र-ग्रंथ व इतिहासग्रंथ या उद्दीपक ग्रंथांचे योग्यतेविषयीं कांहीं च योग्य जाणीव त्या समाजांत दिसत नाहीं व आतुरता हि कमीच. पुढें 'इतिहास' निबंध कै. विष्णुशास्त्री यांनीं लिहिला तेव्हां सर्वांचे डोळे एकदम लख्खन् उघडले व या प्राचीन इतिहासंशाखेचा उत्कर्ष झपाट्यानें झाला !

यानंतर सामाजिक व धार्मिक वाङ्मयाचा विचार करूं. यांत मुख्यतः ख्रिस्तीमतप्रसारक, नवीन सेश्वर व निरीश्वर परंतु हिंदु सुधारक व नरमगरम प्राचीनाभिमानी असे तीन चार प्रकारचे लेखक आढळतात. पैकीं एक लोकहितवादी हे आस्तिक परंतु हिंदुसुधारकपक्षाचे पुरस्कर्ते म्हणून मानले. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांस स्वतंत्र प्राचीनमताभिमानी समजावयास चिंता नाहीं. बाबा पदमनजी हे ख्रिस्ती मताचे अभिमानी निघाले. लोकहि. वा. ची हकीकत वर आलीच आहे. एकपरी त्यांच्याच शाखेचे परंतु विद्वत्तेंत त्याहून फार कमी असे रा. जोतीराव फुले यांनीं सत्यशोधकसमाज स्थापन केला. त्यांनी आपल्या **गुलामगिरी** ( १८७१ ) पुस्तकांत हवीं तीं बाष्कळ विधानें केलीं असून मुख्य कटाक्ष

भटांच्या मानसिक दास्यांतून भटेतरांस मुक्त करण्याचा आहे असें ग्रंथकर्त्यानें सांगितलें आहे. याचा हि समाचार "निबंधमाला" कर्त्यांनीं घेतलेला प्रसिद्ध च आहे. ब्राह्मणवर्गावर सुरू झालेले हे हल्ले अद्यापि तरी आमच्या ब्राह्मणबंधूंचे डोळे उघडतील काय? विष्णुबुवा ब्रह्मचारी व बाबा पदमनजी यांचे लेख व पुस्तकें मात्र वरिष्ठ दर्जाचीं आहेत. विष्णुबुवांचा ग्रंथ **वेदोक्तधर्मप्रकाश** (शके १७८१) नांवाचा असून तो भला मोठा म्हणजे सातआठशें पृष्ठांचा आहे. त्यांत २५ प्रकरणें विषय आहेत. ते येणेंप्रमाणें:—१ वेदोक्त धर्माचा विचार (प्रश्नोत्तर); २ (वेदोक्तधर्माच्या) आज्ञा ३ न्याय; ४ निराकार देव विषयीं (प्रश्नो०); ५ नीतिपर पुराणोक्त गोष्ठी; ६ वेदांतील सृष्टीचे नियम व त्यांची प्रमाणें–यांत सूर्य पृथ्वीला ओढतो—पृथ्विमुतघां मित्रः कृष्टीः इत्यादि, प्रमाणांवरून—अशा गोष्टी आहेत; ८ श्रीकृष्णावताराविषयीं कथा; ८ वेदोक्तधर्माचा थोरपणा; ९ ज्योतिषशास्त्रांतील नांवें व सिद्धांत, १० धर्मसंबंधीं लोकांच्या प्रश्नांचीं उत्तरें (प्रश्नो०); ११ वेदोक्त धर्माची मार्मिक प्रश्नोत्तरें; १२ आत्मज्ञान होण्याविषयींच्या रहाण्या; १३ हटयोग व राजयोग, १४ अनेक मतांच्या लोकांस सुबोध, १५ राजनीति, १६ बापांचा आणि मुलाचा संवाद, १७ आईचा आणि मुलीचा संवाद, १८ विचारप्रदर्शन, १९ म्लेंछ मतें, २० मंत्रशास्त्र, २१ सत्याचा वाद, २२ नास्तिकांना जिंकण्याचे वाद, २३ प्रार्थना, २४ सुभाषित, २५ हकीकत (स्वतःची), पुढें भावार्थसिंधू म्हणून स्वकृत **ओवीबद्ध** ग्रंथ असो. यावरून कळेल कीं, **स्वतंत्र विचाराचा एवढा मोठा मराठी ग्रंथ** त्या वेळीं दुसरा नव्हता. वेदोक्तधर्म म्हणून यांनीं स्वतःचाच एक नवीन धर्म प्रतिपादिला आहे. यांचें नांव विष्णु भिकाजी गोखले. यांचा जन्म ठाणे कुलाबा जिल्ह्यांत शिरवलीस १८२५ त झाला. शेतीभाती आवडेना म्हणून महाडास यांनीं दुकानावर चाकरी केली. मग मुलकी परीक्षा दिली व कष्टमखात्यांत सरकारी नोकरी बरीच वर्षें इमानें इतबारें केली. परंतु अंतरींची तळमळ फार होती म्हणून त्यांनीं १८४७ नोकरी सोडली. पुष्कळ गुरू पाहिले पण सारे ढोंगी व भोंदू. मग तपश्चर्या घोर केली, साक्षात्कार झाला. "मीं लग्न केलें नाहीं त्या कारणावरून मला ब्रह्मचारीबाबा म्हणतात." असें यांनीं आपल्या चरित्रांत लिहिलें आहे. मग यांनीं मुंबईस समुद्रतीरीं वगैरे व्याख्यानांचा सपाटा चालविला. यांची वक्तृत्वशक्ति चांगली

होती. "मला दत्तात्रयाचा वर आहे, यामुळें बोलण्यांत मला कोणी जिंकील असें नाहीं च नाहीं." असें हे सांगतात. साक्षात्काराविषयींची गोष्ट आपण अवश्य अभिमानपूर्वक खरी मानावी असें बालबोधकर्त्यांचें म्हणणें आहे. ( बा. बो. पु. ७ पृ. २६७ ) " ते मोठे वक्ते होते. समुद्रकांठीं ते भाषणें करीत तीं भोंवतालच्या सहस्रावधि लोकांस चांगलीं ऐकूं येत. × × ख्रिस्ती + वादी लोकांच्या कोट्या त्यांच्या च गळयांत कशा अडकावाव्या आणि त्यांस निरुत्तर कसें करावें हें त्यांचें सामर्थ्य इतरांस असो, पण प्रसिद्ध डॉक्टर विल्सन्, रे. मि. मंगर त्यांस देखील चांगलें ठाऊक झालें होतें. हे काशीस गेले होते. तेथें हि त्यांनीं आपल्या वाक्चातुर्यानें लोकांस थक्क केलें. × × ते अगदीं निरिच्छ होते. त्यांस बैबल चांगल अवगत होतें." त्यांच्या दोन तपांच्या धर्मसेवेमुळें ख्रिस्ती धर्मप्रसारास " बरा च धक्का बसला असावा." अशी हकीकत बालबोधकर्ते स्वावलोकनावरून देतात. ( बा. के पु. ७ ) ते पुढें लिहितात, हे "नवीन मताच्या मंडळींशीं हि पुष्कळ वाद करीत. त्यांत त्यांचे सांगणें असे कीं, तुम्हाला जें चांगलें वाटतें तें, नुसतें चांगलें चांगलें म्हणून घोकीत बसूं नका, तर करवेल तितकें प्रत्यक्ष उघड करून दाखवा" " हे महात्मे शके १७९३ ( इ. स. १८७१ फेब्रुवारी ) त काळपुळी होऊन समाधिस्थ झाले." विष्णुबुवांचीं मतें निरनिराळया धार्मिक, समाजिक व राजकीय प्रकरणीं पुष्कळ स्वतंत्र प्रकारचीं होतीं. सर्व स्त्रीपुरुषांना लिहिणेंवाचणें आलेंच पाहिजे, बाटलेल्यांना परत वेदोक्त धर्मांत घ्यावें, स्त्रियांना कांहीं अटींवर पुनर्विवाह करूं द्यावा इत्यादि प्रकारचीं मतें त्यांत आढळतात. इंग्रजी राज्यपद्धतीचा त्यांनीं अनुभव घेतला होता व नव्या वाऱ्याशीं झगडून त्यांची बुद्धि कणखर बनली होती. जुन्या पद्धतीच्या तपश्चर्येनें व एकांतांतील चालनेनें त्यांनीं आपलीं मतें स्थिर केलीं होतीं व युयुत्सुभावानें त्यांनीं स्वधर्मातर्फेनें तेजस्वी झगडा केला. त्यांत निर्भीडपणें आपला पवित्रा चालवून त्यांनीं चांगलें यश संपादन केलें. त्यांची मतें पाहतां तीं कांहीं अंशीं " कम्युनिझम् "च्या धर्तीवर होतीं असें निबंधमालेंत सुचविलें आहे, ( टीप:—आर्यभूषण निबंधमाला जॉन्सन् पृ ७८५ ) तें बरोबर आहे.

विष्णुबुवा स्वतंत्र झाले तरी सनातनपक्षाभिमानी च होते. उलट बाब पदमनजी हे मूळचे हिंदु असून ख्रिस्ती झालेले लेखक होते. बाबांचा जन्म बेळगांवीं १८३१ त झाला व ते १९०६ त वारले. ( अरु. टीप पृ. ५ ) यांचें घराणें

सुरतेचे कासारांपैकीं. मूळ उपनांव मुळे. यांचे वडील पदमनजी हे जर्व्हिसच्या एंजिनीअरिंग स्कूलांत शिकून बेळगांवास सर्व्हेअर झाले. बाबांचा मराठी इंग्रजी अभ्यास बेळगांवास मिशन स्कूलांत झाला. पुढें ते १८४० त मुंबईस आले. या वेळीं प्रभाकर पत्रांत अन्यायानें जकात उपटल्याविरुद्ध गिलयाचें पत्र बाबांनीं छापलें. पुढें ते एल्फिन्स्टन स्कुलांत जाऊं लागले. तेथें प्रथम त्यांची परीक्षा प्रो. दादाभाई नौरोजी यांनीं केली. वडिलांची बदली झाल्यामुळें यांचें सर्व कुटुंब आदनास ( Aden ) गेलें. तत्पूर्वी १८४८ त बाबांचें लग्न थाटांत उरकून घेण्यांत आलें. आदनाहून १८४९ त परत येऊन बाबा फ्री चर्च विद्यालयांत जाऊं लागले. तेथें प्रसिद्ध ग्रंथकार रा. गोविंद नारायण शेणवी माडगांवकर व धर्मांतर केलेले नारायण शेषाद्री या शिक्षकांचा सहवास त्यांस घडला. रे. नारायण यांच्या समागमाचा परिणाम होऊन यांचे मनांतली हिंदुधर्मावरील श्रद्धा हळूहळू ढळली. पुढें "कॉलेज डिव्हिजनांत गेल्यावर × रे. डॉक्टर उइलसन्, डाक्तर मरे मिचल व रे. निसबट यांच्यापासून मला शिक्षण मिळूं लागलें. ते जीं धर्मपुस्तकें शिकवीत तीं माझ्या फार उपयोगी पडलीं." असें बाबा आत्मचरित्रांत लिहितात. ( अरु. पृ. ८५ ) मग ख्रिस्ती पुस्तकें वाचून यांची मतें तदाकार होत चाललीं. त्यांत ज्ञानोदय व ज्ञानप्रकाशादि पत्रांनीं ही धर्मांतराच्या आढींतली कैरी लवकरच पिकविली. याविषयीं बाबा लिहितातः—" सारांश, ह्या तिन्हीं पत्रांकडून माझी तीन प्रकारची सुधारणूक झाली, म्हणजे ज्ञानोदयानें माझी ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेविषयीं व हिंदुधर्म ईश्वरप्रणीत नाहीं याविषयीं खातरी केली. प्रभाकरानें ( भाऊ महाजन यांचा ) माझ्या मनांत ब्राह्मणांविषयीं जी पूज्यबुद्धि होती ती नष्ट केली. (या प्रभाकरपत्रांत च लोकहितवादींचीं पत्रें प्रसिद्ध होत असत. "ब्राह्मणधर्म व ब्राह्मणांचें श्रेष्ठत्व यांजवरील माझी श्रद्धा व पूज्यबुद्धि हीं उत्तरोत्तर नष्ट होण्यास ही पत्रमालिका च बहुतेक कारणीभूत झाली."—अरु. पृ. ८८) आणि ज्ञानप्रकाशानें नास्तिक मताकडे माझी प्रवृत्ति होऊं दिली नाहीं." (अरु. पृ. ८९) प्रगटपणें ख्रिस्ती होण्यापूर्वी च बाबा बैबल शिकवूं लागले. त्यांनीं कांहीं दिवस परमहंसमंडळीचा रंग पाहिला पण पुण्याची मंडळी तेथें येऊन नास्तिकपणा माजवूं लागल्यामुळें ( अरु. पृ. १०५ ) बाबांनीं घाबरून ह्या समाजांतून काढता पाय घेतला. या च सुमारास मागील एका भागांत सांगितलेलीं पांच पुस्तकें बाबांनी लिहिलीं. १८५४ त बाबा प्रभूच्या पदीं लीन झाले; पण त्यांची हिंदु बायको कांहीं ख्रिस्ती

होईना. याबद्दल नवराबायकोंत झटापट बरी च झाली. पुढें हायकोर्टांत खटला गेला. बायकोनें "नाहीं" म्हणून जबाब दिला. तेव्हा बाबांनी दुसरी ख्रिस्ती बायको केली. मग पहिली बायको पस्तावून बाबांकडे येऊं लागली. तथापि ख्रिस्तीधर्माप्रमाणें दोन बायका करण्यास अडचण असल्यामुळें दयाळु बाबांनीं पहिले बायकोची गळ मानली नाहीं! या बायकोच्या वादापायीं रु. २०० बाबांस खर्च आला. तो "यमुनापर्यटण" हा ग्रंथ लिहून त्याचे उत्पन्नांतून बाबांनीं भागविला. या "यमुनापर्यटण" गोष्टीचा विषय थोडक्यांत सांगतों. यमू ही गणपतराव यांच्या एका मित्राची मुलगी; त्यांनी खुद्द आपला मुलगा विनायक यास च बायको केली. मिशनरी शाळेचा संस्कार झालेलीं यमी व विनायक दोघे हि मनांतून सुधारकी मताचीं असून त्यांची "तारक" येशूवर भक्ति होती. हिंदु उच्चवर्णी विधवांची स्थिति पाहून तीं तळमळत. शेजारीण कोणी गोदू हिनें नवरा मरतांच पुढील जाचाचे भयानें जीव दिल्याचा प्रसंग या तरुण जोडप्यानें डोळ्यांनीं पाहिला. पुढें नोकरीनिमित्तानें विनायकराव व यमुना नागपुरास जात असतां त्यांस वेणु विधवेची हकीकत कळते व तीस यमुना ख्रिस्ती शांतीचा उपदेश देते. पुढें नागपुरास दौलतराव नामें एक मिशनेरी संस्काराचा मित्र विनायकरावांस लाभतो. त्यांच्या संवादांत दौलतराव आपले मामेबहिणीस एका पुराणिकानें व साधूनें कसें फूस लावून पळविलें व तशीच एक शेणवी विधवा कशी कुमार्गांत शिरली त्या कथा सांगतो. नंतर नागपुराहून विनायकराव सहकुटुंब फिरत फिरत पंढरपुरीं येतो व एका बाईकडे उतरतो. ही मूळची कुलीन परंतु बिघडलेली बाई वाईट कामांत असतां तिच्या केशाचा टोप पकडून विनायकराव तीस फजीत करतो व अखेर तीस उपदेश करून आपणांजवळ आश्रय देतो. पंढरी सोडून सातान्यास आल्यावर विनायक जगन्नाथजीकडे पुत्रोत्सवास जातो. तेथें पुनर्विवाहावर वाद होऊन अनुकूलपक्षाची सरशी होते. सातारा सोडून जेजूरीस येतांना विनायकास गाडी भडकून इजा होते व त्या दुखण्यांत त्याचा अंत होतो. अंतसमयीं यमुना त्यास ख्रिस्ती शांती देते! मग मोरभटाचे उचलीमुळें यमुनेच्या केशवपनाचा प्रसंग येतो. त्यांतून आश्रित पंढरपुरकरीण बाईचा मुलगा शिवराम हा तीस सोडवितो व ती सर्व मंडळी दाजीबा या ख्रिस्ती पाद्रीचे आश्रयास रहातात. तेथें यमुना पुनर्विवाह करते व शिवराम ख्रिस्तसेवक होतो. अशी गोष्ट या यमुनापर्यटणांत आहे.

ही गोष्ट बाबांनीं इ. स. १८५७ त प्रसिद्ध केली. यांत विधवांची दुःस्थिति वर्णन करण्याबरोबरच ख्रिस्ती 'तारणा 'चा रस्ता निदान मनांतून तरी सर्वांनीं धरावा असा ग्रंथकर्त्याचा हेतु आहे हिंदुसमाज सर्व घाणीनें भरला आहे, अशी कल्पना व्हावी अशी याची रचना अहे. यातील सर्व वर्णनें साधारण स्थितीची द्योतक नाहींत, त्या नात्यानें तीं अत्युक्तिपूर्ण ठरतील. तशीं तीं दाखवून वाचकांस ख्रिस्ती धर्माकडे खेंचावयाचें असें बाबांचें, धोरण आहे. त्या वेळेस शिकलेल्या मंडळीच्या डोक्यांत काय विचार पिकत असत, त्यांची थोडी कल्पना बाबांच्या वरील पुस्तकावरून येईल. या पुस्तकांत मोठा उदात्त संस्कार होण्याजोगें कांहीं च नाहीं.

ख्रिस्ती झाल्यावर सुमारें १६ वर्षे बाबा पुण्यास होते, तेथें बराच काळपावेतों फ्री चर्च मिशन शाळेंत शिक्षकाचें काम त्यांनीं केलें. या कामावर असतां च इ. स. १८६० मध्यें बाबांनीं कँडीच्या **इंग्रजीमराठी** कोशाचा संक्षेप शब्दरत्नावली नांवाचा केला. १८७० त त्याची दुसरी आवृत्ति काढली. आपणांस या कामीं जाहिरात देऊन ही कोणी विद्वानानें साहाय्य दिलें नाहीं; तथापि, रे.मरे मिचल व एक इंग्रज मित्र यांनीं द्रव्यद्वारा आश्रय मिळवून दिला, असें बाबा प्रस्तावनेंत सांगतात. अखेर "भग्नपृष्ठकटिग्रीवः" हा प्रसिद्ध श्लोक देऊन या कामीं आपणांस किती कष्ट पडले तें त्यांनी दर्शविलें आहे.

१८६७ त बाबांस फ्री चर्च मिशन पुणें येथील 'पाळक' दीक्षा झाली. त्या कामाचा राजिनामा बाबांनीं १८७३ त दिला. 'ऐक्यवर्धक पत्रिका' 'सत्य दीपिका' ह्या हें काम करीत असतांना च त्यांनीं काढल्या. १८७३पासून लेखन-व्यवसाय हा च बाबांचा मुख्य आधार झाला. १८७७ त त्यांनीं बैबल सोसायटी व ट्राक्ट सोसायटी यांची एडिटरी पत्करली. 'नवा करार' वगैरे पुस्तकें यांच्या च हातून तडीस गेलीं.हें संपादकीय काम २५ वर्षे केल्यावर १९०२ मध्यें ७१ व्या वर्षी त्यांस पेन्शन मिळालें ! १९०६ त ते 'प्रभूंत लीन झाले !' ख्रिस्तवासी रे. टिळक म्हणतात:—"रे. बाबा पदमनजी म्हणजे मराठी ख्रिस्ती सारस्वताचे जनक होत. त्यांच्या हातून बनलेलीं मराठीं पुस्तकें वजा केलीं, तर आज मराठी ख्रिस्ती वाङ्मय असून नसल्यासारखें होईल. × × त्यांनीं एकट्यांनीं लिहिलेलीं लहान मोठीं पुस्तकें **शंभरावर** आहेत ! ह्यांत त्यांच्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या लेखांचा समावेश केला तर हें वाङ्मय कसें एकाद्या डोंगरासारखें दिसूं लागतें ! ह्या वाङ्मयाच्या ठायीं प्रतिभा ही तशीच विलक्षण आहे."

बावांची भाषापद्धति खरोखर च फार गोड आहे. त्यांत भक्तीचा जिव्हाळा आहे. समाजसुधारणेची तळमळ आहे. वाक्यें, शुद्ध, साधीं सरस व चटकदार आहेत. लिहिणें गंभीर व प्रौढ आहे. शब्द वेंचक आहेत. वळण जरा कोंकणी आहे. त्यांची गोड भाषा व सुंदर टापटिपीची मांडणी पाहतां बाबांची गणना उत्तम मराठी लेखकांत केली पाहिजे. त्यांचीं मतें कांहींही असली तरी त्यांची वाङ्मयसेवा कौतुकार्ह च आहे ! त्यांनीं 'आपलें हिंदु धर्मासंबंधीं जिणें व ख्रिस्ती होणें' या आत्मचरित्रात्मक गोष्टीचा सविस्तर वृत्तांत "**अरुणोदय**" नांवानें छापलेला आहे. त्यांत त्यांचें लहानपणचें शिक्षण, पुढें मिशनरींचा सहवास व बाप्तिस्मा इत्यादिकांचें वृत्त वाचतांना मोठें रंजन होतें व तत्कालीन स्थितीच्या एका अंगाचें चित्र ठळक, स्पष्ट मनासमोर उभें राहतें. या पुस्तकांत मी जागोजाग या अरुणोदयांतून आधार दिले आहेत, परंतु मूळ पुस्तक वाचण्याची शिफारस आग्रहानें वाचकांस करावीशी मला वाटतें. हें पुस्तक वाचल्यानें कित्येक मंडळी ख्रिस्ती झाल्याचें दिसतें. आपण तसें झपाटलें जाऊं असें ज्यास वाटेल तो खरा व पक्का हिंदू च नव्हे ! विशेषतः ज्यांना तत्कालीन मिशनरी मंडळींच्या हकीकती जाणण्याची इच्छा असेल त्यांनीं हें पुस्तक वाचलें च पाहिजे. महाराष्ट्राचा सामाजिक व धार्मिक इतिहास लिहिण्यास याचा फार उपयोग होईल व या च विषयावरील वाङ्मय व एका कर्त्या व्यक्तीचा इतिहास या दृष्टीनें ही त्याचा उपयोग मोठा आहे. एकीकडे बाबा पदमनजींचा कोंवळा लुसलुशीत अरुणोदय हा ग्रंथ पहावा व दुसरीकडे विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या दाठर व प्रखर वेदोक्तधर्मप्रकाश या ग्रंथांचें वाचन करावें म्हणजे धर्मविषयक मतांचा गलबला एकोणिसाव्या ख्रिस्ती शतकाच्या मध्याचे सुमारास कसा माजला होता तें बरेंच आकलन होईल. बाबांचे अरुणोदयांत कोठेंच बुवांचा उल्लेख नाहीं! त्यांचा यांचा सामना मोठा मोजेचा झाला असता ! बाबांच्या चरित्राचें वाचनावरून पहिल्या पिढींतली मंडळी मिशनरांच्या प्रयत्नांनी एकंदरीनें कशी चकून व दिपून गेली होती व त्यांची स्वधर्मश्रद्धा किती उडाली होती तें पाहून मोठा खेद वाटतो. हिंदुधर्माचे उज्वल चारित्र्याचे व जिव्हाळ्याचे असे विद्वान् पुरस्कर्ते त्या काळांत मुंबई प्रांतीं विष्णुबुवासारखे एक दोन सोडून फार करून कोणी नव्हते असें च खरें. याचा विलक्षण परिणाम त्या वेळीं झाला व कृष्णशास्त्री चिपळोणकरासारखी मंडळीसुद्धां शिथिलशील झाली. याचा तीव्र उद्वेग वाटून च कै विष्णुशास्त्र्यांनीं आपलें 'चाप'

सज्य केलें व ख्रिस्ती मिशनेरी व नवीन ढंडळीत मंडळी यांवर, ते सांपडतील तेथें प्रसंग असो, नसो, जोराचा मारा करून त्यांस त्यांनी नेस्तनाबूद केलें! लेख व ग्रंथ या टिकाऊ साधनांचा उपयोग न करितां त्याहून जलद परिणाम करणारीं भाषणें व कीर्तनें करणारे पुरुष ही या काळांत पुष्कळ होते व कित्येक सव्यसाची ही होते. ठिकठिकाणीं वक्तृत्वसभा निघत होत्या.पहिली मुंबईस १८६७निघाली(महाराष्ट्र वक्तृत्वोत्तेजक मंडळीचा अहवाल १८८३)गोपाळराव हरी,कृष्णशास्त्री चिपळोणकर इत्यादि मंडळी सभांतून बोलत. विष्णुबुवा ब्रह्मचारी व महादेवशास्त्री कोल्हटकर हे तर उत्तमापैकीं च वक्ते होते. १८७० सालच्या पुनर्विवाहवादसमयीं वक्तृत्वाचा पूर आला होता. त्या वादप्रकरणीं जुन्या पक्षातर्फे एक अप्रतिम विद्वान चमकून गेले. यांचें नांव **विठोबा अण्णा** दप्तरदार. यांचा जन्म कऱ्हाडास इ. स. १८१३ त झाला. कऱ्हाडकर सुभेदारांनीं “ विठ्ठल! तुला विद्या अजून नाहीं. छे! छे! फार वाईट!, असे काढलेले उद्गार मर्मी झोंबून विठ्ठल रामशास्त्र्याप्रमाणें विद्या करूं लागला; तो अंगच्या अपूर्व बुद्धीमुळें केवळ विद्यापति झाला. या कुशाग्र बुद्धीच्या विद्यार्थ्यांचें समाधान आपले हातून होत नाहीं असें पाहून यांचे गुरु अप्पाशास्त्री पुराणिक एका पहांटेस अदृश्य झाले! कृष्णाबाईच्या उत्सवाला हरिदास नाहीं म्हणतांच अण्णा बनले हरदास व सर्वांस थक्क केलें! मग ते कविता करूं लागले. त्यांचीं गोड पदें सर्वत्र प्रसिद्ध आहेत. संस्कृत कविता हि त्यांची चांगल्यांतली आहे. पुढें त्यांनीं गायनाचा चांगला अभ्यास केला. तसेंच ते वैद्यकांत हि प्रवीण झाले. त्यांस सातारकर महाराजांनीं कारकुनाची जागा दिली होती. पुढें पुनर्विवाहवादप्रकरणीं त्यांचा अपूर्व सन्मान पुण्यामुंबईकडे झाला. त्यांच्या पुराणाला ही थाप जमे! त्यांचें देहावसान शके १७९५ च्या चैत्रांत झालें. यांनीं गद्य ग्रंथ केले नाहींत याचें वाईट वाटतें! असो! पुनर्विवाहप्रकरण व महाराष्ट्रांतील सामाजिक चळवळ याचें नांव निघालें आणि त्यांत **विष्णु परशरामशास्त्री पंडित** यांचें नांव निघालें नाहीं असें व्हावयाचें नाहीं. ह्यांचा जन्म सातारा येथें इ. स. १८२७ त झाला. तेथें वे- राघवाचार्य गजेंद्रगडकर यांजपाशीं त्यांनीं व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. पुढें अभ्यासासाठीं १८४५चे सुमारास ते पुण्यास आले. १८५५त त्यांनीं भाषांतरखात्यांत नोकरी पतकरिली व पुढें धारवाड, मालेगांव इत्यादि ठिकाणीं शाळाखात्यांत काम करून त्यांनीं अखेर स्वतंत्र धंदा करावा म्हणून नोकरीचा राजिनामा दिला

व इ. स. १८६४ त ते इंदुप्रकाश चालवूं लागले. ह्या वेळीं विधवाच्या प्रश्नाचा त्यांनीं विचार केला. १८५६ त पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या चळवळीमुळें विधवाविवाहापासून झालेली संतति कायदेशीर ठरली. महाराष्ट्रांत हा विधवा-पुनर्विवाहाचा प्रश्न १८१७ त एका तेलगु व दक्षिणी अशा जोड लेखकांनीं चोपडें प्रसिद्ध करून पुढें आणिला होता, आणि त्यावर पुष्कळ उलटसुलट टीका मुंबई दर्पणांत (जांभेकरशास्त्री संपादक) झाली. (Indian Social Reform पृ. २९३ मधील रावब. वामनराव कोल्हटकर यांचा निबंध. हे वामनराव म्हणजे महादेवशास्त्र्यांचे चिरंजीव होत.) त्यानंतर मग या विषयावर बाबा पदमनजींची कुटुंबसुधारणा व यमुनापर्यटण हीं पुस्तकें. तदनंतर विष्णुशास्त्री पंडित यांनीं हा प्रश्न नेटाला लावण्याचे हेतूनें लेखणी व वाणी हीं त्यापायीं वेंचिली. "......... त्यांस पाठबळ देण्यास, वे. कृष्णशास्त्री तळेकरांसारखी कितीएक थोर विद्वान् मंडळी अनुकूल होती. (बा. बो. ४।९९)" यांनीं ईश्वरचंद्राच्या पुस्तकाचें मराठींत भाषांतर केलें व इंदुप्रकाशांत अनेक लेख लिहिले. विठोबा अण्णा व विष्णुशास्त्री यांचें वाग्युद्ध ठरलें होतें. परंतु सामनेसामने जरी हा योग आला नाहीं तरी १८६८ त पुण्यांत पाच्छापुरकरवाड्यांत अण्णा व मांडेवाड्यांत विष्णुशास्त्री यांनीं व्याख्यानांची धुमश्चक्री चालविली होती. पुढें १८७० च्या वादाचें वादळ उठलें! हा वाद नऊ दिवस दीक्षितांच्या वाड्यांत चालला होता. कृष्णशास्त्री चिपळोणकर, रावजी शास्त्री आगाशे, रघुनाथशास्त्री शेंडे, केशवशास्त्री गाडगीळ व व्यंकटेशशास्त्री माटे ही पुनर्विवाहपक्षीय पंच मंडळी व यांची वकिली विष्णुशास्त्री पंडित व रावब. रानडे यांजकडे आली आणि भिकुशास्त्री गोडबोले, दिनकरशास्त्री खांबेटे, अप्पाशास्त्री खाडिलकर, भिकाचार्य ऐनापुरे व गणेशशास्त्री कोल्हटकर हे पंच पुनर्विवाहनिषेधक पक्षातर्फे व यांचें अध्वर्युत्व नारायणाचार्य गजेंद्रगडकर व विठोबा अण्णा यांजकडे असा थाट होता. असा विष्णुशास्त्री यांचा या कार्याशीं एकजीव झाला होता. विष्णुशास्त्री हे उत्तमांतले वक्ते होते. सन १८७४ त त्यांनीं स्वतः एका विधवेशीं विवाह लाविला. परंतु १८७६ त त्यांस नवज्वरानें महाबळेश्वरीं देवाज्ञा झाली. (बाळबोध पु. ४ पृ. १००) यांनीं १८६१ त मरेच्या इतिहासाचें भाषांतर व १८६५ त संस्कृत आणि मराठी धातुकोश असे उपयुक्त ग्रंथ रचले होते; तुकोबागाथा सरकारी (इदु.) यांनींच संपादिला. तथापि त्यांचें एकंदर कार्य वाङ्मयसेवेपेक्षां समाजसेवेचें च अधिक झालें. समाजसेवेच्या हरघडीचें साधन म्हणून च त्यांनीं कांहीं वाङ्मय निर्माण केलें.

एक प्रकारें या च सामाजिक वाङ्मयाचे क्षेत्रांत ज्यानें बरी च कामगिरी केली असें म्हणतां येईल असा आपल्या या काळांतील ग्रंथकार म्हणजे **गोविंद नारायण शेणवी** माडगांवकर हा होय. रा गोविंद नारायण यांचा जन्म गोवें प्रांतीं मडगांव येथें सुमारें १८१५ इसवींत झाला. नववे वर्षी ते मुंबईस आले. वडिल पोर्तुगाली तपकिरीचा वगैरे व्यापार करीत. या गरिबींत सुद्धां त्यांनी गोविंदाकडून थोडी विद्या करविली. गोविंद नारायण यांनी पुढें फ्री चर्च मिशनचे शाळेंत नोकरी पतकरली व ती मरणापूर्वी एक वर्ष पावेतों अखंड केली. त्यांची प्रकृति अशक्त होती. बाबा पदमनजींच्या आत्मचरित्रांत यांचा उल्लेख बरेच ठिकाणीं आला आहे. मराठी ज्ञानप्रसारक मंडळीचें ह्यांनी पुनरुज्जीवन केलें होतें. ह्याची एकंदर पंधरा ( रा. रामभाऊ जोशी पंचवीस म्हणतात. मराठी वा. वि. पृ. २७ ) "लहान मोठीं मराठीं पुस्तकें...आहेत. शिवाय...मराठी ज्ञानप्रसारकांत हि त्याचे बरेच लेख प्रसिद्ध झाले आहे. त्यांची भाषा चांगली शुद्ध, सरळ आणि गोड...आहे....ते स्वतः गोंव्याकडचे राहणारे असून, मुंबई म्हणजे भ्रष्ट मराठीचें आगर, तेथें अशी चांगली भाषा त्यांनी इतक्या दिवसांमागें लिहिली हें त्यांच्या कीर्तीस मोठें भूषण आहे." ( बाळबोध पु. ७, पृ. १७२ ) रा. गोविंद नारायण यांच्या भाषेची कै. ओक यांनी केलेली तारीफ अमळ ज्यास्ती झाली असें वाटतें. ती साधारणपणें शुद्ध, सरळ व परिणामकारक आहे हें आम्हांस हि कबूल आहे. तथापि त्यांचेपेक्षां त्यांचे समकालीन बाबा पदमनजी किंवा गोपाळराव हरी यांजपेक्षां अधिक नीटस व गोंडस मराठी लिहीत असें तुलनेवरून ठरेल. रा. गोविंद नारायण हे इ. स. १८६५ त मरण पावले. डॉक्तर वुइल्सन् यानी "त्यांच्या आत्म्याच्या तारणार्थ × × प्रार्थना केली." ( बा. बो. ) तथापि गोविंद नारायण हे ख्रिस्ती नव्हते ( अरुणो० पृ १२६ ) कै. बाळबोधकर्ते म्हणतात कीं "हे आपलें काम मनोभावें करणारे, निर्व्यसनी, सुशील आणि भाविक होते." ह्यांचे ग्रंथ लहान लहान असून ते एक नीतिपर व दुसरे शास्त्रीय असे आहेत. पैकीं ( १ ) शुचिर्भूतपणा ( मागें उल्लेख पहा ) ( २ ) ऋणनिषेधक बोध, ( ३ ) हिंदु लोकांच्या रीती सुधारण्याविषयीं बोध ( ४ ) सत्यनिरूपण, ( ५ ) दारूपासून अनर्थ, ( ६ ) नीतिसंवाद, ( ७ ) व्यवहारोपयोगी **नाटक**, (८) भोजनबंधू पानतंबाकू हे सामाजिक उपदेशपर व (९) सृष्टींतील चमत्कार, (१०) वृक्षवर्णन, (११) उद्भिद्जन्यपदार्थ ( १२ ) लो-

खंडी सडकांचे चमत्कार हे शास्त्रीय व शिवाय ( १३ ) मुंबई वर्णन, ( १४ ) रोमशहरचा संक्षिप्त इतिहास ( फक्त तपासला ), ( १५ ) सुलेखनविद्या हे इतर, मिळून १५ ग्रंथ त्यांचे नांवावर आहेत. मुंबईचें वर्णन चांगलें व मोठें आहे. यांचे शास्त्रीय ग्रंथ हि सुबोध साधले आहेत. ते व त्यांच्या जोडीला " अनेक विद्या-मूलतत्व " ( १८६१ ) हें कृष्णशास्त्री यांचें पुस्तक आणि यापूर्वी जांभेकर, जारविस, हरि केशवजींचीं झालेलीं पुस्तके एवढें त्या वेळचें शास्त्रीय वाङ्मय असें समजावयाचें. खेरीज कांहीं शालोपयोगी पुस्तकें होतीं.

काव्यनाटकादि ललितवाङ्मय निर्माण होण्याच्या च धामधुमींत दुसरें एक मोठें च वाङमयकार्य या काळांत संथपणें चालू होतें. माजी ज्ञानचंद्रोदयानें ज्याला पूर्वी ( १८४० सुमार ) सुरुवात केली होती तें च प्राचीन महाराष्ट्र कविवर्यांचे ग्रंथ छापून काढून लोकांत पसरविण्याचें व तत्संबंधींची लोकांची भूक शांत करण्याचें सत्कार्य या काळांत **सर्वसंग्रह** मासिकद्वारा **रा. माधव चंद्रोबा** यांनी केलें. " या महाराष्ट्र देशांत प्राकृत भाषेंत कविता करणारे मुकुंदराज, ज्ञानेश्वर, × × मुक्तेश्वर, × × मोरोपंत × इत्यादि पुष्कळ रसिक, विद्वान् कवी होऊन गेले. त्यांचे ग्रंथ...फार उत्तम प्रकारचे असतां ही जसे प्रसिद्ध असावे नाहींत. × × × तशांत भाषेचें पूर्णज्ञान त्या भाषेच्या कवितेच्या पूर्णज्ञानाखेरीज होणें अशक्य. भाषा सुधारण्याचें हें एक मुख्य व मोठें साधन च होय. " असें मार्च १८६० च्या अंकांत माधव चंद्रोबा लिहितात; व पुढें सांगतात कीं " या कृत्यास रा. रा. परशुरामपंत तात्या गोडबोले यांचें सहाय घेतलें आहे. ... या गृहस्थाची विद्वत्ता आणि मराठी भाषेची अभिरुचि या प्रसिद्ध च आहेत. यांच्या सहायानें या " सर्वसंग्रह " ग्रंथास किती योग्यता येईल हें सुज्ञ जनास सांगावयास नको. या परोपकारी पुरुषानें केवळ लोकहितार्थ च आम्हास सहाय देण्याचें पत्करिलें आहे या स्तुत्य यांही आम्हावर जो उपकार केला आहे त्याविषयीं त्यांचे या स्थलीं उघडपणें आभार मानल्यावाचून माझ्यानें राहवत नाहीं. " या अंकांत अशी चमत्कारिक मौज दृष्टीस पडली कीं मोरोपंतांचीं उद्योग, काव्य, द्रोण व कर्ण हीं पर्वे पान दोन पान देऊन एकदम चालू केलीं आहेत. खेरीज पौराणिक पद्धतीचीं चित्रें हि यांत घातलीं आहेत. याची किंमत दरमहा ' अर्ध रुपया ' असून तो माधव चंद्रोबा यांनी आपल्या च शिलाछापखान्यांत मुंबईस छापिला. विरामचिन्हांचें लटांबर मराठीस तिच्या या इंग्रजी अवतारांतच चिकटलें.

त्या पूर्वी चरणरेघ, दुरेघी एवढीं च चिन्हें होतीं. त्यामुळें एका ओळींत लिहिलेली जुनी कविता पदें तोडून छापण्यास या सर्वसंग्रहाच्या चालकांस मोठेच कष्ट पडले असले पाहिजेत. "कित्येक कवितेंत विरामचिन्हें घालण्याचा प्रयत्न केला आहे परंतु हा **प्रयत्न पहिला** च आहे." त्यामुळें कर्त्यांनें क्षमेची याचना केली आहे. आज आपणांस सर्व संग्रहाचे अंक वाचतांना चुका आढळल्या तथापि त्यांच्या अडचणी जर आपण ध्यानांत घेतल्या तर परशुरामपंतादिकांनी या वेळीं केलेलें काम त्यांस निःसंशय मोठें भूषणावह ठरेल यांत तिळप्राय शंका नाहीं असा हा प्रयत्न "सरकारचा आश्रय तुटला असतां ही" चालविण्याची रा. माधव चंद्रोबा यांची इच्छा होती; पण ती सिद्धीला न जातां समारें १८६६-६७ त सर्वसंग्रहाचा कारभार त्यास आटपावा लागला! यासंबंधीं मालाकारांनीं पुढें खूप कडाखा उडवून दिला आहे:—" इतक्या काळांत शेंकडों गोष्टींचें 'उत्तेजन' व 'वर्धन' झालें—तालिमबाजांचे आखाडे ओस पडले होते ते पुनः गजबजून राहिले. लोकाचे ठायीं सद्धर्माचा अभाव होऊं लागला होता, तो दोन रु. रोजींचा महाग धर्मगुरु ...... आणवून त्यांच्या करवीं देशोन्नतीस मुख्य स्तंभभूत जी धर्मोन्नति ती करविली, कलाकौशल्य अस्तंगत होऊं पहात होतें, त्यांस शिवणकलेपासून पुनः ओनामा म्हणायला लाविला—तशी च गेल्या दशकांत लोककल्याणकर्ती मंडळी हि आर्यजननीचें बिरीद दंडाला बांधून जिकडे पहावें तिकडे कंबरा बांधून उठली व पटापट देशहिताच्या कामास लागली; पण इतक्या लोककल्याणेछूंतून एक दोन हि आमच्या बिचाऱ्या महाराष्ट्र कवींच्या वांट्यास आले नाहींत." (मोरोपंतांची कविता—नि. मा.) शास्त्रीबुवांसारखा च चाबूक आज हि उडविण्याची अवश्यकता पुष्कळांस भासेल! माधव चंद्रोबा यांचें आडनांव डुकले. यांचें घराणें गोमांतक प्रांतांत कळंगुटी येथील. यांची घरची गरिबी. यांचे बंधु डॉ. अनंत चंद्रोबा हे यांस सर्वसंग्रहाचे कामीं मदत करीत. डॉ. अनंत "हे मोठे रसिक होते. ह्यांस वामनी श्लोक आणि मोरोपंती आर्या हीं लावण्याचा नाद फार असे." (बाळबोध पु. ४-५३).

सर्वसंग्रहाचा स्तुत्य उद्योग बंद पडला, त्या च सुमारास मुंबईतील प्रसिद्ध गणपत कृष्णाजी यांचे मुद्रालयांत श्रीतुकाराममहाराज यांचा गाथा इ. स. १८६७ त छापून निघाला. पुढें एक दोन वर्षांत सर अलेक्झांडर ग्रँट यांच्या प्रोत्साहनामुळें शंकर पांडुरंग पंडित बी. ए. भाषाकोविदाच्या देखरेखीखालीं विष्णु

परशरामशास्त्री पंडित यांनीं तुकोबांचा गाथा परिश्रम करून संपादून छापला. (इ. स. १८६९ ) अलीकडे मी व नंतर माझे विद्वान् व शोधक मित्र ठाण्याचे रा. भावे ह्यांनीं संताजीच्या अस्सल वह्यांवरून तुकोबांचा गाथा छापला आहे; पण तत्पूर्वींच्या सर्व गाथ्यांत हा वरील सरकारी किंवा इंदुप्रकाशी किंवा पंडिती गाथा सर्वश्रेष्ठ आहे. यासाठीं २४ हजार रुपयांची रक्कम सरकारानें निराळी काढून ठेविली. ह्या चमत्काराचें चटकदार वर्णन निबंधमालाकारांनीं केलें आहे, तें थोडें उतरून घेतों:- 'राजा बोले आणि दळ हाले' या म्हणीप्रमाणें वरील प्रसंगीं मोठमोठे चमत्कार घडण्यांत आले. ज्यांच्या हातास मराठी पुस्तकांचा विटाळ कधीं सोसावयाचा नाहीं, ( बाकी शंकर-पांडुरंगादींवर हे दूषण यथार्थपणें लागू पडणार नाहीं असें आम्हांस वाटतें. ) ... ... असे बडेबडे किताबधारी तुकारामापुढें लीन होऊन कोणी अभंगांचें सूचीपत्र तयार केलें, कोणी ग्रंथप्रकाशन व टिप्पण हें काम पत्करिलें...कोणी अभंगांचीं बाडें जमा केलीं. असें होतां होतां कांहीं काळानें वरील संकल्प सिद्ध होऊन जो बिचारा शूद्रकवी आपल्या लंगोटेबहाद्दर व घोंगडीवाल्या भक्तमंडळींत च काय तो रमावयाचा किंवा फार झालें तर हरदासांच्या कथाप्रसंगीं सत्कार पावावयाचा त्यास एकाएकीं अरबी गोष्टींतील अबू हसनाप्रमाणें मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें ! इंदुप्रकाश मुद्रणयंत्रालयांतील मुक्ताफळें आंगभर उधळलेलीं महावस्त्रांत शरीर लपेटलेलें व युनिव्हर्सिटीचे शानदार झगे घातलेले तरुण विद्वान् डोक्यावर मोर्चेलें उडवताहेत व चवऱ्या ढाळताहेत अशा थाटानें तुकाराममहाराज फारा दिवसांनीं आपल्या अभिधानाची सार्थता पावून विराजमान झाले. महाराष्ट्र देशाच्या पहिल्या अधिपतीनें पाठविलेलें ऐश्वर्य परत लावून वरील कवीनें जी आपली हानि करून घेतली होती तिची भरपाई दोन शतकांनंतर त्याच देशाच्या परद्वीपस्थ प्रभूनें करण्याचें मनांत आणलें कीं काय कोण जाणे ! !" (मोरोपंताची कविता) असा हा प्राचीनकविसत्काराचा मोठा नामांकित प्रसंग घडून आला !

सर्वसंग्रहद्वारा प्राचीन कवींसंबंधानें आनृण्य जोडण्याचा उद्योग चालू असतांना सुप्रसिद्ध विद्वान् दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनीं पंतांच्या केकावली या सर्वप्रसिद्ध काव्यावर एक ' यशोदापांडुरंगी ' नामक विस्तृत पदपदार्थबोधिनी टीका (१८६५) प्रसिद्ध करून पंतांच्या बरोबर आपल्या मातापितरांचें हि तर्पण केलें. दादोबांचा हा ग्रंथ तत्कालीन मराठी ग्रंथांत बराच उच्च समजला पाहिजे. इतका विस्तृत टीकाग्रंथ कोणा हि सहृदय पंडितानें तोंवर मराठींत रचून प्रसिद्ध केला

नव्हता. या ग्रंथांत दादोबांची प्रौढ भाषापद्धति व मार्मिक परिशीलन यांचें मनोहर व मिष्ट मिश्रण पहावयास सांपडतें. या च विषयावर पुढें परशुरामपंतांनीं केलेल्या केकादर्शाचा उल्लेख मागें पृ. ६४ वर केला च आहे. तात्यांच्या नवनीताला कवींची माहिती व पद्यरचनेविषयीं असे दोन निबंध रावसा. भास्कर दामोदर पाळंदे यांनीं नुकतेच जोडले होते.

इ. स. १८६३ त रा. शंकर पांडुरंग पंडित यांनीं मयूरकृत बृहद्दशम अथवा कृष्णविजय या अवघड ग्रंथावर "इंग्रजींत क्लासिकल् कवितेस जशा "अनोटेशन्स" म्हणून असतात तशा सविस्तर टीका" च्या धर्तीवर एक टिपणपुस्तक समूळ छापलें. पंडित हे नांवाप्रमाणें च पंडित होते. त्यांचा हा पहिला प्रयत्न.

सर्वसंग्रह मासिकाखेरीज इतर हि कित्येक मासिकें या काळात निघालीं. "**विविधज्ञानविस्तार**, '**दंभहारक** वज्ञानसंग्रह हीं नवीं निघालीं. पैकीं विविधज्ञानविस्तार इ. स. १८६७ जुलैंत सुरू झालें. याची प्रथमपासूनची उभारणी भारदस्त व प्रतिष्ठित होती. हें आजतागायत चालू असून आपला पन्नाशीचा मंगलोत्सव हि त्यानें ग्रंथरूपानें साजरा केला ही भाग्याची गोष्ट होय. पहिल्या वर्षाचे अंकांतून आमच्या भाषेचा सांप्रत काळ कठिण आला आहे असें लिहिलें असून "मराठी भाषा" या विषयावर एक मोठा चांगला निबंध प्रसिद्ध झाला आहे. त्यांत बंगाली, हिंदी, गुजराथी यांपेक्षां मराठी श्रेष्ठ आहे असें प्रतिपादन केलेलें आहे; आणि वायव्यप्रांतांत त्या च सालीं "**देशी विद्वन्मंडळ**" म्हणजे देशी भाषेची युनिव्हर्सिटी काढावी अशी मागणी झाली होती. तिला जोराचा पाठिंबा देऊन इकडे आपण हि तशी मागणी सरकारात करावी म्हणून लेखकानें विनविलें आहे. जर ही कल्पना त्यावेळीं मूर्त स्वरूप पावली असती तर खरोखर आमच्या देशाचें पाऊल फार पुढें पडलें असतें. परंतु आज साठ वर्षें होऊन गेलीं, आमच्या प्रिय देशी भाषेचें विद्यापीठ आम्हांला स्थापतां येऊं नये ही केवढी शरमेची गोष्ट आहे! देशी भाषांनीं दुसऱ्या विद्यापीठांच्या गोठ्यांत देतील तो चारा व मिळेल तो वारा पिऊन च स्वस्थ असावें ना?

दुसरें मासिक **दंभहारक**. हें १८७१ त निघालें व ७५ पावेतों चाललें. पहिल्या च अंकांत "घरोघर मातीच्या चुली" हा निबंध चरणरेघांनी छापला आहे. निबंध लहान च परंतु चांगला आहे. अंक ४ मध्यें एक मोठा गमतीचा व

बोधप्रद वाद आला आहे. विषय " एतद्देशीय भाषांचें इंग्लिश लोकांचें ज्ञान " हा आहे. यांत " स्वतः च मराठीचे ज्ञाते म्हणून गर्व वहाणारे युरोपियनांचा आमच्या ग्रंथकारांवर हि कसा जोरा चालतो" त्याचें खासें उदाहरण दिलें आहे. शालेपक्रमाचा ( विद्योपक्रमाचा ? ) ग्रंथ (प्रकरण तिसरें, पृ. ५० ) प्रसिद्ध होण्यापूर्वी रे. नेसबीटकडे १८४५त लेखी खर्डा अभिप्रायासाठीं गेला त्यांनीं यावर 'supervision of a European well acquainted with Marathi' पाहिजे म्हणून डॉ. स्टेव्हेन्सन्‌कडे बोट दाखविलें. क्यांडी, मिचेल इत्यादिकांनीं त्याची 'री' ओढली. डॉक्तर स्टेव्हेन्सन् यांनीं पुण्यास मजजवळ 'Books necessary to refer' नाहींत म्हणून आधीं फेटाळलें. अखेर फार गळ पडली तेव्हां " I have carefully read over with a Brahmin ( हा उपाध्याय मग मध्यस्थ कशाला ? ) the whole of this collection, made the necessary changes in orthography " असें म्हणून ग्रंथकारास उपकृत केलें व सर्वांच्या शिफारशी व तपासण्यांचें बाळंतपण संपून ग्रंथ बाहेर पडला ! ही जुनी हकीकत देऊन दंभहारकांत याबद्दल झोड उठविली आहे. तसें च युरोपियन लोकांस "अभ्यास पक्का नसतो" सबब मराठीचे परीक्षकांत युनिवर्सिटींत नेमूं नये असा हि वाद त्यावेळीं चालू होता. असो. दंभहारकांतील निबंध हि चांगल्यांपैकीं असत. त्याचा कल जुन्या मताकडे झुकलेला दिसतो. यांत एकदा लोकहितवादींचीं दोन रूपकात्मक स्वप्न छापलीं होतीं. तसेंच संसार अंतःपूरपर्यटन, शरीरसंपत्ति, खोटा अभिमान, अलीकडील टीकाकार, धर्मनीति इत्यादि विषयांवर भारदस्त निबंध यांत आलेले आहेत.

तिसरें **ज्ञानसंग्रह** हें रा. विष्णुपंत महाजनी प्रभृति विद्वानांनीं वऱ्हाडांत १८७२-७४ पर्यंत चालविलें. ( म. ना. पृ. ६१ ) हें हि वरच्यासारखें च प्रौढ कोटींतलें होतें.

असो. दीपिका, धूमकेतू, इंदुप्रकाश प्रभृति वर्तमानपत्रें हि या वेळीं चालत होतीं, त्यांचा उल्लेख मागें आलाच आहे. त्याखेरीज " लोककल्याणेच्छू " वगैरे पत्रें पुण्यांत चालत. " लोककल्याणेच्छूंत गोल्या घुबड या सहींचीं दोन पत्रें व " ज्ञानप्रकाशांत "पढतमूर्ख" व तसेंच पिशाच या सहीचें एक पत्र ... अशीं खुबीदार लिहिलीं होतीं कीं कांहीं दिवसपर्यंत लोकांच्या तोंडीं त्याशिवाय दुसरा

विषय च नाहींसा झाला." (निबंधमाला, भाषापद्धति.) ही विनोदात्मक लेखाची प्रवृत्ति मराठींत पूर्वी गद्यांत नव्हती व पद्यांत हि नव्हती हें उघड आहे–ही वेरील रीत इंग्रजी भाषेवरून इकडे आली." (सदर)*

वैद्यक, कायदा इत्यादि प्रकरणीं कांहीं ग्रंथ व लेख कित्येक विद्वांनानीं या काळांत लिहिले. मुंबईस ग्रांट वैद्यकशाळा इ. स. १८३७ त निघाली. तेथें देशी भाषांतून शिक्षण देण्याची सोय बरेच दिवस (सुमारें १८७५ पावेतों) होती. त्यामुळें त्या शास्त्रांत कांहीं ग्रंथ आपोआप च मराठींत तयार झाले. वैद्यकविषयांत कै. डॉ. भिकाजी अमृत चोभे यांचें शारीर, तसेंच अन्यशास्त्रांत प्रो. दाजी नि॰ नगरकर यांचा शंकुच्छेद व बीजगणीत मूलतत्वें (१८५८) डॉ. नारायण दाजी यांचें रसायन व औषधिशास्त्र, प्रो. ||केरुनाना यांचें ज्योतिर्गणित, भूमापन (१८६३), कृष्णशास्त्री भाटवडेकर यांचा विद्युत्, हरिचंद्र चिंतामण यांचा प्रकाशलेख, महादेवशास्त्री पुराणिक यांचं भूवर्णन, गो. ग. फडके यांचें यंत्रशास्त्र (१८५६) इत्यादि ग्रंथ झाले. (Ranade, Growth of M. L., p. 16.) कायद्यावर कांहीं ग्रंथाचीं भाषांतरें क्यांडी साहेबांनीं केलीं; व पुढें रावसा. वि. ना. मंडलिक (१८३३–१८८९) यांनीं हिंदुधर्मशास्त्रावर ग्रंथशोधन वगैरे केलें. १८६३ त मुकुंदराव भास्करजींनी केलेलें प्रमाणशास्त्र (Law of Evidence) मंडलिकांनी तपासलें. १८६७ त व्यंकटराव रामचंद्र यांनीं महत्तम आणि लघुत्तम किंमत (बीज) यांवर दिल्लीचा हिंदु गणिती रामचंद्र यांच्या मतानुसार ग्रंथ केला व त्यांत या रामचंद्राचें चरित्र दिलें–१८६१ त

---

* **टीपः**— मुंबईस इंदुप्रकाश, नेटिवओपिनिअन, हिंदू रिफॉरमर, सुबोधपत्रिका हीं पत्रें निघून त्यांमध्यें विष्णुशास्त्री पंडित, मंडलिक, मोडक, रानडे, परमानंद हे लेख लिहित. पुण्यास ज्ञानप्रकाश निघून त्यांत बाबा गोखले, कृ. चिपळूणकर, विष्णू परशराम रानडे, विष्णु मोरेश्वर भिडे इत्यादिकांचे मार्मिक लेख असत. (म. वा. वि. पृ. २५, जोशी).

|| **टीप १**:—केरुनानांचा जन्म कुलाबा जिल्ह्यांत नागांवीं १८२४ त झाला. हे आर्लिबार व जांभेकर यांचे शिष्य. १८६५ त पुण्याच्या पाठशाळेवर आले १८७९ त पेनशन् व १८८४ त पुण्यास यांचें देहावसान झालें. नामांकित शोधक, गणिती व थोर ममताळू शिक्षक बा. बो. पु. ४।१

महादेव गोविंदशास्त्री यांनी हि ' पदार्थ आणि चलन' यावर भाषांतरी ग्रंथ लिहिला.

**प्रवास-स्थळवर्णनें** मराठींत फार थोडीं. देश पहावे, ज्ञान मिळवावें हा स्वभाव च नाहीं. लोकहितवादींनी या कूपमंडूकवृत्तीवर ठिकठिकाणीं यथास्थित प्रहार केले आहेत व आणखी हि करून ही घातकी प्रवृत्ति आमच्या मानगुटीं बसली आहे तिथून तिचें उच्चाटन केलें पाहिजे. कै. यशवंतराव आनंदराव उदास बी. ए. यांनीं केलेलें धौममहाबळेश्वर **वर्णन** फार चांगल्यापैकीं आहे. याचे लेखक हे ग्रॅज्वेट १८६६ ) होते हें विशेष. रा. उदास मूळ ओतूरचे. बी. ए. झाल्यावर यांनीं शाळाखात्यांत मध्यप्रांतांत नोकरी केली. पुढें मराठी ट्रान्सलेटर होऊन आणखीं खातीं बदलून सन १८७७ त हे वयाचे ३५ वें वर्षांचे आंतच क्षयानें वारले! दुर्दैव! हे चांगले शोधक होते. वृत्ति नम्र होती. लेथब्रिजच्या इतिहासाचें मराठी भाषांतर यांनीं केलें आहे. धौम म० वर्णन या १५० पानांच्या पुस्तकांत स्थलवर्णन, क्षेत्रमाहात्म्य, इतिहासप्रकरण आणि निबंधसार असे भाग चार कल्पिले आहेत. त्यांतील वर्णन व विवेचन दोन्हीं चांगलीं उतरलीं आहेत. तथापि पुस्तकाला वर्णन हें नांव दिल्यानंतर त्यांत ऐतिहासिक विवेचनाला निम्मा अधिक भाग योजणें हें प्रशस्त नाहीं. प्रतापगड म्हणजे मराठ्यांच्या वीर्यभूमीचें तेजस्वी केंद्र! तेथें प्रौढप्रताप श्रीशिवाजी महाराजांची व कडव्या अफझलखानाची ती काळभेट झाली व महाराजांनीं खान नामोहरम केला. या प्रसंगांतील वादग्रस्त मुद्यांचें विवेचन उदास यांनीं या ग्रंथांत विस्तारानें करून महाराजांची बाजू पुढें मांडण्याचा प्रयत्न केला आहे. तो चांगला साधला असला तरी त्याचा एवढा विस्तार करण्यानें या ग्रंथाच्या वर्णनात्मक स्वरूपांत ऐतिहासिक रंगाची छटा फाजील गडद उठली गेली आहे. परंतु उदात्त ऐतिहासिक प्रसंगांच्या स्मरणानें "जो कोणी विचारदृष्टीनें महाबळेश्वर पाहील त्याच्या सुशिक्षित, संस्कृत व सूक्ष्मदर्शी मनावर फार हितावह परिणाम होतील व असे परिणाम त्यांनीं करून घ्यावे हा च या विषयाचा उद्देश होय." असें रा. उदास यांनीं च याचें समर्थन केलें आहे. (धौ. म. व. पृ. १५९ ) पुण्याच्या 'ज्ञानचक्षू' कर्त्यांनीं "प्रस्तुत पुस्तकाची योग्यता लक्षांत आणून येथील नूतन मराठी विद्यालयांत + + हें पुस्तक वाचनाकरितां नेमलें आहे," याविषयीं युक्त संतोष व्यक्त केला आहे.

(१८९१). अशीं पुस्तकें जितकीं भाषेंत अधिक होतील तितकी भाषेला प्रौढी येईल व लोकसुधारणा होण्यास फार साहाय्य मिळेल.

**भाषिक** ग्रंथांत हि कित्येक चांगले ग्रंथ झाले. उदाहरणार्थः—(१) हिंदु **संख्यावाचक**...कोश हा इ. स. १८६८ त रा. रखमाजी देवजी मुळे यांनीं केला. नऊ दहा वर्षांच्या परिश्रमाचें हें छोटें फळ आहे. यांत चवदा विद्या, नवमहामणि, सत्ताविस योग असली माहिती अकारविल्हेनें दिली आहे. ग्रंथ लहान पण उपयुक्त आहे, स्वतंत्र मेहेनतीचा आहे.

**सर्व देशांतील निवडक म्हणी** हें ४६५ पानांचें मोठें पुस्तक पांचचार वर्षें श्रम घेऊन रा. सदाशिव विश्वनाथ ह्यांनीं १८५८ त केलें व जगन्नाथ शंकरशेट ह्यांस अर्पण केलें आहे. Fieldings Proverbs of all nations वरून हें भाषांतर केलें आहे. कर्त्यानें स्वतः **म्हणी रचण्याचा** यत्न यांत केला आहे. हा प्रयत्न निःसंशय कौतुकास्पद आहे. एक दोन उदाहरणें देतों:—Possession is nine points of the law=स्वाधीन आलें तें आपलें झालें किंवा The used key is always bright= वापरण्यानें किल्ली उजळ, उद्योगानें शरीर चंचळ.

सुप्रसिद्ध **हंसकोश** हा हि याच काळांत इ. स. १८६३ त झाला. याच कर्ते फार विद्वान् होते. यांचें नांव रा. रा. रघुनाथ भास्कर गोडबोले. यांनीच भारतवर्षीय अर्वाचीन व प्राचीन कोश व एक मराठी मराठी मध्यम कोश (१८७०) कलो. यांनी फार माहिती जमा करून प्रसिद्ध केली. किंबहुना अलीकडे संशोधनाचें युग सुरू होण्यापूर्वीच्या काळांत एवढा शोध एक लोकहितवादीशिवाय कोणी केला असें वाटत नाहीं. हंसकोशावांचून आज हि पदोपदीं जुन्या काव्याभ्यासकांचें अडून राहतें. गोडबोल्यांनची वाङ्मयसेवा मोठी संस्मरणीय झाली याबद्दल मतभेद व्हावयाचा नाहीं.

इ. स. १८६२ त रा. गंगाधर रामचंद्र टिळक (बाळ गंगाधर टिळकांचे वडील) यांनी एक मध्यम व्याकरण केलें तें 'क्यांदी' व परशुरामपंत तात्या यांनीं पुष्कळ श्रम घेऊन शोधलें.

दादोबांचे नंतर नांव घेण्याजोगा व्याकरणावरील ग्रंथ इ. स. १८६७ त कृष्णशास्त्री गोडबोले यांनी रचून प्रसिद्ध केला. याला एक प्राकृत भाषेचें संक्षिप्त

व्याकरण त्यांनी जोडलें हा विशेष होता. यांत शोधक दृष्टि आहे. या ग्रंथाचा विशेष म्हणजे यांत historical method चा अवलंब केला आहे असें कृष्णशास्त्री चिपळोणकर आपल्या अभिप्रायांत म्हणतात तें अगदीं यथार्थ आहे. ह्या पुस्तकानें शोधाचें व विचाराचें पाऊल पुढें पडलें.

वाङ्मयदृष्ट्या या काळांतील आणखी महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे **मुंबई युनिव्हर्सिटीची स्थापना** ही होय ही इ.स १८५७त स्थापन झाली. प्रथम हींत मराठी भाषेचा प्रवेश थेट बी. ए. पर्यंत होता. बी. ए. ला १८६१ सालांत बाळशास्त्री जांभेकर यांचा हिंदु० इतिहास—बाळमित्र भाग १—तुकारामबोवांचे अभंग ( नवनीतांतरून ! ) व दासबोधाचे कांहीं दशक व १८६३ सालीं मॉरल क्लास बुक—अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह—वामन ( नवनीत ) व मोरोपंत विराट-पर्व हीं एवढीं च पुस्तकें होतीं! रामकृष्ण गोपाळ ( भांडारकर ), महादेव गोविंद ( रानडे ) वामन आबाजी ( मोडक ) व बाळ मंगेश ( वागळे ) हे पहिले चार ग्रॅजुएट १८६२ त बाहेर पडले. परंतु चार दोन वर्षांत च वारें फिरलें व सर रेमंड वेस्ट, डॉ. वुइल्सन्प्रभृति देशी भाषाकैवाऱ्यांचा आक्रोश व्यर्थ होऊन देशी भाषांची हकालपट्टी विद्यापीठांतून झाली! प्रि. मोडक व रा ब. रानडे यांनीं पुढें स्थानभ्रष्ट देशी भाषांना स्थानापन्न करण्यासाठीं फार श्रम केले परंतु त्यांना आपल्या स्थानीं पूर्व वैभवानें अद्यापि हि विराजमान होतां आलें नाहीं. मेकॉलेनंतर ( १८३५ ) देशी भाषांच्या प्रगतीला एवढा धक्का तेथवर बसला नव्हता. या धक्यामुळें आमची 'झगेवाली' मंडळी जीं घरींदारीं इंग्रजी व्यवहार करूं लागून देशी भाषांना पारखीं झालीं तीं अद्यापि त्या झटक्यांतून बचावून निघालेलीं दिसत नाहींत. इंग्रजीच्या व संस्कृताच्या ज्ञानाच्या घमेंडींत च कृतकृत्यता मानून घोरत पडलीं आहेत. भोंवतालचा शेंकडा ९० अज्ञ देशबांधवांचा समाज देशी भाषेंत आपलीं मनोगतें बोलतो. परंतु तीं 'मनोगतें' आपले हातीं घेऊं पहाणार आपले नव शिक्षित पुढारी देशी भाषा कमाविण्यास कंबरा बांधून कांहींच हालचाल करीत नाहींत ही केवढी दुर्भाग्याची गोष्ट आहे ! न्या. रानडे यांचें काळीज ही दुःस्थिति पाहून चर्र झालें ! त्या शांत, विचारी, थोर व दूरदर्शी पंडितानें पुढीलप्रमाणें साफ अभिप्राय लिहून ठेवलाः—

"No mere foreign graftings can ever thrive and flourish, unless the tender plant on which th

grafting is to be made first germinates and sends its roots deep in its own indigenous soil. ( page 26 ) The fault does not lie with the individuals so much as with the system under which they are brought up Thus education is so exclusively foreign that all incentive to study and to add to, the stock of national literature is for the most part, entirely wanting and year after year this indifference and neglect are becoming more pronounced. This is the mournful conclusion taught by the figures... " (Ranade's Mis. Wr. page 44. )

यावरून मुंबईप्रभृती विद्यापीठें देशी भाषांच्या उन्नतीस पोषक तर झालीं च नाहींत, उलट तीं एकप्रकारें त्यांच्या मुळावर च आलीं असें च खरें. हा बिघाड सुधारण्याला उपाय दोन. एक जागृत देशी विद्यापीठें उभारणें व दुसरा जिव्हाळ्यानें मायभाषेची निरपेक्ष सेवा अंगचोरपणा टाकून करणें !!

स्वतंत्र मराठी पद्य ग्रंथ ही या काळांत तयार होऊं लागले होते. कृष्णशास्त्री चिपळोणकरांची पद्यरत्नावली ( १८६५ ), भास्कर दामोदर यांची रत्नमाला, कृष्णशास्त्री राजवाडे यांचीं उत्सव प्रकाशादि काव्यें व माधवराव कुंटे यांचा राजा शिवाजी, लेले शास्त्री यांचें शिवाजी चरित्र व महादेवशास्त्री कोल्हटकर, यांचें "प्राकृत कवितेचें दुसरें पुस्तक (१८६१)" वगैरे पद्य ग्रंथ यांत प्रमुख होते· कुंटयांचा शिवाजी म्हणजे अर्वाचीन कवितेचें रणशिंग च! आधीं तें कुंटयांचें प्रस्थ ! हृदय थरारून सोडणारा विषय! त्यामुळें पुष्कळ ठिकाणीं रसपरिपोष चांगला उतरला आहे. " दिसे मोहनी मूर्ति, तेजाळ डोळे ! कपाळीं चढे ढाळ; ते केश काळे । मिशा वांकड्या, तोंड गंभीर, भारी । जनांच्या मनीं जें उमेदी उभारी । " अशी 'Populus Vulgus' ची कणखर, कुणबाऊ भाषा योजण्याचा त्यांचा बाणा. अर्थात् हें ' नागर ' काव्य नव्हे. असो. त्याचा अधिक विचार येथें करतां येत नाहीं. त्यांची मोठी इंग्रजी प्रस्तावना जिज्ञासूंनी वाचावी.

छापखान्यांची हि वाढ या काळांत यथाप्रमाण झाली. त्यांत सुप्रसिद्ध **निर्णयसागर** छापखाना हा कै. जावजीशेट यांनीं इ. स. १८६९ त स्थापन

केला. पुढें हा छापखाना महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर आपल्या कर्तबगारीनें व नयनमनोहर छपाईमुळें गाजला तें सर्वश्रुत च आहे.

राजकीय आंदोलनास अद्यापि म्हणण्यासारखा आरंभ हि झाला नव्हता. त्यामुळें तें वाङ्मय शून्य च आहे म्हटलें तरी चालेल. १८६७ त पूना असोसिएशन निघून ती पुढें १८७० त सार्वजनिक सभेंत लय पावली. सार्वजनिक सभेचें दप्तर प्रथम मराठींत च होतें. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचा सुखदायक राज्यप्रकरणी निबंध किंवा राजनीति यांत निर्भिड व नवे विचार आहेत. वर्तमानपत्रें व मासिकें यांतून काय चर्चा झाली असेल तेवढें च एव्हांचें राजकीय वाङ्मय. इनाम कमिशनचा **गैर इनसाफ** म्हणून एक पुस्तक इ. स. १८५९ त प्रसिद्ध झालें होतें. त्यावर कर्त्यांचें नांव नाहीं. यांत कौपरसाहेब इनाम कमिशनर यांजवर कडाखा आहे. घरांची चौकशी सुरू झाली, तेव्हां " हें इनाम कमिशन कांहीं कालानें आमच्या बायकांची देखील चौकशी करील...." " या देशांतील रयत सर्वस्वी पंगू आहे म्हणून यांचे अर्ज ऐकणें व यांस हातीं धरून चालणें हें देशांतील सरकारास मोठें लाजीरवाणें वाटतें, यामुळें या रयतेच्या दुःखासुखाकडे हें मुनीम सरकार सहज दुर्लक्ष करतें असें ही अनुमान केल्यास गैर नाहीं.'..." सांप्रतचे काळांत वतनाचा टिकाव कसा लागेल तो लागो...हजार वळसे आणि एक गांठ, परजन्यानें भिजविलें व वाहून गेले, अग्नीनें पोळलें अगर दहन केलें व राजानें मारलें अगर लुटून नेलें याची फिर्याद कोण ऐकणारा समर्थ आहे, असा विवेक करून लोक विवंचनेंत निमग्न आहेत " असें हा ग्रंथकर्ता म्हणतो ( जै. इ. पृ. १२३ ).

वरील वाङ्मयतर्पणांत न आलेल्या **किरकोळ** ग्रंथांची यादी पुढें जोडली आहे.

एवंच निबंधमालेच्या पूर्वकाळांत मराठी वाङ्मयाचा जो बहुविध विस्तार झाला त्याचें स्वरूप येथवर वर्णिलें तें संकलित दृष्टीनें एकवार पाहूं:—

१८५७–७४ या काळांत:—

( १ ) मुंबईस (१८५७ त) नवीन विद्यापीठ निघालें; तेथून लवकर च देशी भाषांची हकालपट्टी झाली. या योगें मराठी वाङ्मयाचे प्रगतीस मोठा जबरदस्त धक्का पोंचला.

( २ ) गोडबोले, लेले, राजवाडे प्रभृतींनीं शाकुंतलादि रम्य संस्कृत नाटकांचा उतारा करून सर्वलोकसमाराधनाचा एक अभिनव मार्ग मराठींत खुला केला.

( ३ ) कोल्हटकरचिपळूणकरप्रभृतींनीं प्रसन्न, प्रौढ व प्रतापी इंग्रजी वाङ्मयाचें कोठार फोडून त्यांतील जीवदायक धनधान्याची लूट मांडली !

( ४ ) मोरोबा, रिसबूड, हळबे प्रभृतींनीं नवीन कादंबऱ्यांचा गुंजारव करून जनरंजन आरंभिलें.

( ५ ) कीर्तने, भाजेकरादिकांनी नवीन स्वतंत्र ऐतिहासिक व सामाजिक नाटकें रचलीं व लोकांस रिझविलें.

( ६ ) माधव चंद्रोबा व पंतपंडित यांनी प्राचीन मराठी कवींच्या अमोघ वाणीचे दिव्य पाट फोडून दिल्यामुळें नवनीताचें तळें सोडून महाराष्ट्र काव्य-समुद्रांत अखंड डुंबण्याची दुर्लभ सोय सर्वांस झाली.

( ७ ) यशोदापांडुरंगीची प्रभा फांकली.

( ८ ) रघुनाथशास्त्री, कँडी, तळेकर, बाबा पदमनजी प्रभृतींनी निरनिराळे कोश रचले; त्यामुळें व्यासंगी जनांना मोठा लाभ झाला. पण यांत फारसें पुढें पाऊल पडलें नाहीं.

( ९ ) पाळंदे, कँडी यांनी क्रमिक वाचनपुस्तकें रचलीं. बालांवर उपकार झाला.

( १० ) पुनर्विवाहवादप्रकरणीं वगैरे तुंबळ वाग्युद्धें माजून सभा, भाषणें, लेख व चोपडीं यांचा सुळसुळाट झाला. विचार वाढला परंतु त्या बरोबर च विकार हि बळावले.

( ११ ) ख्रिस्ती, सनातनी यांच्यांत वादाची खणाखणी होऊन बाबा पदमनजींचीं चोपडीं व विष्णुबुवांचा वेदोक्तधर्मप्रकाश जगाला दिसला. हिंदूंच्यांत धार्मिक आंदोलनास जोराची सुरवात झाली.

( १२ ) लोकहितवादींची टिकटिक ऐकूं येत; राहिली; तिनें कधीं निद्राभंग होऊन कपाळाला आंठ्या पडल्या तर कधीं तंद्री लागली!

( १३ ) भारतादिकांचीं भाषांतरें करून पुराण्या शास्त्री मंडळींनी आपल्या जाड्याच्या परिहारार्थ उद्योग केला.

( १४ ) शास्त्रीय वाङ्मयांत कांहींशीं भर पडली.

( १५ ) राजकीय स्वातंत्र्याच्या प्राणघेण्या अपहाराची पहिली ठुसठुस सुरू झाली.

अशा या नूतननिर्मित ललितवाङ्मयाची शोभा अवलोकन करीत रसिक समाज उभा आहे, इतक्यांत १८७४ त मालाकारांची 'ललकारी' होते; व मराठी वाङ्मयाचा जयजयकार होतो; तिकडे नजर जातांच आपापले ग्रंथ खांकोटीस मारून मंडळी धांदलीनें आपापल्या आसनावर बसतात; या ' धीरोद्धत ' पुरुषाच्या भाराखालीं धरित्री नमते आणि मराठी वाङ्मयाच्या बादशाही सिंहासनावर ही तरुण मूर्ति अधिष्ठित होते ! ! तिला लवून मुजरा करून आणि हा ग्रंथरूप अल्प नजराणा पुढें ठेवून मी रुखसत मागतो.

# परिशिष्ट

ग्रंथांतील मजकूर लिहून गेल्यावर जी **अधिक माहिती** हातीं आली ती येथें दाखल करितों:—

## म. ग. इं. अ. प्रकरण १ लें व २ दुसरें:—

मराठींत छापिलेला सर्वांत जुना लेख कोणचा याविषयीं मागें वर्तमान-पत्रांतून व मासिक पुस्तकांतून कांहीं वाद झाला होता व मराठी मुद्रणकलेच्या प्रारंभाचा शतसांवत्सरिकोत्सव करण्याचीही वाटाघाट झाली होती. या संबंधांत मुंबईच्या "**नवयुग**" मासिकांत रा. ब. पारसनीस यांनीं कांहीं माहिती प्रसिद्ध केली होती. तीवरून प्र. २ रें, पृ. ११ वर वैजनाथ व विद्यानाथ हे एकच असावे असा तर्क या ग्रंथांत केला आहे तो खराच ठरतो. हे विद्यानाथ पंडित **महाराष्ट्रीय असून** नागपूरकर भोंसल्यांचे वकील वेणीराम पंडित यांचे आश्रित होते असें रा. पारसनीस म्हणतात ( नवयुग, जून, १९१५ ). सन १८०४ मध्यें कलकत्त्याच्या फोर्ट विल्यम् कॉलेजांत मराठीचा वर्ग सुरू झाला. ट्रावर नांवाचा युरोपिअन मराठींत पास होऊन त्यास १,००० रु. बक्षिस मिळाले डॉ. कॅरे हा मराठीचा प्रोफेसर होता व पंडित विद्यानाथ त्याचा साह्यकारी " पंडित " होता. पुढें **इ. स. १८०५ त** ह्या पंडिताच्या मदतीनें कॅरी यानें **मराठी भाषेचें व्याकरण** छापिलें. १८०७ त पंडित विद्यानाथ हे याच कॉलेजांत मराठीचे अध्यापक झाले. यांनीं १८१६ मध्यें " राजा प्रतापादित्य ह्याचें चरित्र आणि नागपूरकर रघूजी भोंसले यांची वंशावळ हे दोन ग्रंथ प्रसिद्ध केले. ह्याच वर्षी **मराठी भाषेतील अस्सल पत्रसंग्रह** म्हणून एक ग्रंथ डॉ कॅरी यांनीं प्रसिद्ध केला. तोहि पंडित वैजनाथ ह्यांच्या मदतीचेंच फल होय." इ. स. १८०५ त श्री. मिरजकर पटवर्धन यांनीं छापील गीता ग्रंथ वांटण्यास प्रारंभ केला होता. सदर तीन पत्रे माझे मित्र कै. पांडोबा पटवर्धन यांनीं संपादन केलेले भा. इ. सं. मंडळाच्या वस्तुशाळेंत आहेत. १८०३ त नुकताच वसईचा तह झाला होता, त्यामुळें व मराठ्यांच्या विस्तृत साम्राज्याशीं झगडा पडल्यामुळें मराठी भाषेचें अध्ययन वसलीनें सुरू करविलें. वसलीचें कॉलेज येथें चालू राहिलें असतें तर

मराठीविषयीं युरोपिअन लोक आज राहिले आहेत इतके अज्ञान राहिले नसते. राजकारणी भाषा ( a diplomatic language ) म्हणून मराठीचें अध्ययन केलें असतां peculiar advantages होतील असा कॅ. आर्थर वेलस्लीचा अभिप्राय होता. यासाठीं तो म्हणतो-" It (मराठी भाषा) must possess powerful recommendations in the transaction of business with the Hindoos from its copiousness, from its colloquial case and from its analogy to their sacred writings". ( नवयुग, सदर. )

असो. रा. ब. पारसनीस यांनीं इ. स. १६७८ तील मराठी छापील लेखाचा नमुना सर्वांत जुना म्हणून दिला आहे; परंतु यापूर्वी १९ वर्षें म्हणजे इ. स. १६५९ त De Guimaraens यानें कोंकणी मराठींत ख्रिस्ती धर्मपुस्तकांचा मतलब छापल्याचें ग्रीयर्सन लिहितो.

( Linguistic Survey of India, Vol. VII, p. 16 )

हेंच पुस्तक Bombahim ( मुंबईंत ) १८४५ त पुन: छापलें. ( सदर पृ. ६५ )

यानंतर इ. स. १७४८ च्या आगेमागे शूल्ट्ज् यानें कांहीं 'बाळबंदि'चे व 'मराठी' चे ( म्ह. मोडीचे ) नमुने युरोपला पाठविलेले प्रसिद्ध झाले. तसेंच Lord's prayer चें मराठी भाषातर यानें (शूल्टझनें) करून पाठविलें. १७७८ त Grammatica Marata व आणखी कांहीं मराठीविषयीं ग्रंथ युरोपांत प्रसिद्धीस आले. बर्लिनास आडेलुंगच्या पुस्तकांत ( १८०६—१८१७ ) Goanish, (गोवानी) 'Kun Kanisch ( कोंकणी) and Maratti-sch ( मराठी--मोडी )-अशा भाषेंत लार्डस् प्रेयर प्रसिद्ध झाली. पुढें ग्रीयर्सन म्हणतो "The scriptures were partly translated into Marathi by the Serampore missionaries. The New Testament and the Pentateuch were published in 1807; the prophetic books in 1821. A konkani translation of the Bible appeared at Serampore in 1819." पृ. १७.

इ. स. १८०८ त Illustrations of the grammatical parts of the Gujerathi, Marathi and English languages या नांवाचें पुस्तक ड्रमंड यानें प्रसिद्ध केलें. (R. A. S. Library Bombay). प्रो. काणे यांनीं हें माझे नजरेस आणिलें याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

डॉ. ग्रियर्सन यानें लिंग्विस्टिक सर्व्हेमध्यें मराठी भाषेसंबंधीं जे ग्रंथ झाले त्यांची यादी दिली आहे. त्यावरून कांहीं येथें देतों:—

* Mitchell, Rev. J. Murray—The story of Tukaram ( 1849 ).

Ballantyne, Rev. Henry—On the relations of the Marathi to the Sanskrit—( 1853 ).

Stevenson, Rev. J. Observations on the Marathi Language ( 1853 ).

P–Daryasinha–A collection of proverbs...1858

Beams J.—A comparative grammar of the modern Aryan languages of India—1872–79.

Sinclair, W. F. On the boundaries of the Marathi language 1874

Wilson, Rev. John–Tribes and languages of the Bombay Presidency 1874.

* मरे मिचल् यांनीं १८९२ त मराठी कवींवर एक निबंध लंडनच्या पौर्वात्य परिषदेपुढें वाचला. १८४३ त यांनीं " मराठी भाषेच्या योग्यतेविषयीं इंग्रजींत लेख लिहिला त्यांत " मराठी वाङ्मय सजीव आहे असें म्हणणें यथार्थ होईल. " असा अभिप्राय त्यांनीं व्यक्त केला ( लेटलीकर पृ. १४ )

Carey; William—Grammar of the Mahratta language, *with Dialogues of familiar subjects*—1805.

Mahomed Ibrahim Makba—A grammar of the Mahratta language, Revised by Vans Kennedy—Bombay 1826—

मखबा हे नेटिव्ह एजुकेशन सोसायटीचे एक प्रमुख सभासद होते; आणि केनेडीसाहेब कोशकर्ते हेच पुढं अगदीं हिंदुमय झाले "त्यांस गायत्री मंत्र येत होता व ते गीता वाचीत." ( अरुणोदय पृ. १२७, आवृत्ति दुसरी, १९०८. )

Ballantyne J-Mahratta Grammar—1839 Edinburgh.

याची एक प्रत भा. इ. सं. मं. त आहे. डॉ. कॅरेचें पुस्तक दुर्मिळ झालें असून तें समाधानकारक उतरलें नाहीं; सबब, विलायतेतील हेलेबरी येथील ईस्ट इंडिया कॉलेजच्या मराठी वर्गासाठीं हें पुस्तक कर्त्यानें केलें. यांतील मोडी अक्षरें कर्त्याच्या खुदस्तुरचीं शिळेवर घेतलेलीं आहेत. यांत पृ. ९ वर एकच Exercise आहे. तो असा:— ( मोडी ) येके महाजनाने आपले पुत्रास अंतकालीं चार गोष्टी सांगून मेला जे अरे पुत्रा राज्याचे अनुग्रहाचा विश्वास करूं नको आणि कोत्वालाची प्रीति मनांत आणूं नको अणखीन धाकटे लोकाशी मैत्री करू नको अणीक मनाची गोष्टी वायकोस सांगूं नको." १८३९ सालीं म्हणजे दादोबांचें व्याकरण होऊन गेल्यावर असलें भिकार पुस्तक प्रसिद्ध करणें हास्यास्पद होतें. कोणा ब्राह्मण पंडिताच्या हस्तलिखिताचा उपयोग कर्त्यास विशेष झाल्याचें त्यानें नमूद केलें आहे.

Stevenson Rev.—The Principles of Marathi Grammar 1843.

Murathee Grammar 1848.

Wilson Rev. John-Idiomatical exercises, Illustrative of the phraseology and structure of the English and Marathi languages 1851.

Principles of English Grammar and idiomatical sentences in English and Marathi 1851.

Burgess—Grammar of the Marathi language 1854.

Bellairs H. S. K. and L. Y. Askhedkar-Grammar of the Marathi language 1868.

(Linguistic Survey of India, Vol. VII, pages 17-18-19.)

---

**जोतीराव गोविंदराव फुले**— ( स. १८२७—१८९० ) समाजसुधारक—शिक्षक व लेखक–जात फुलमाळी. यांस सरकारानें २०० रु. ची शाल बक्षीस दिली ! ( मनोरंजन दिवाळी अं. ) [ म. ग. इं. अ. पृ ९० ]

**मोरोबा कानोबा विजयकर**—( १८१३-१८७१ ) – पाठारे प्रभु–समाजसुधारक व घाशीराम को० चे कर्ते, मुंबई. [ म गं. इं. अ. पृ. ७७ ]

**मिशनेरी ग्रंथकार व लेखक**—यांचा उल्लेख मूळ ग्रंथांत यथाप्रसंग आलाच आहे. त्यांच्यापैकीं मरे मिचल्, निसबीट, इत्यादिकांविषयीं बरीच माहिती " अरुणोदयांत " आली आहे. रे. लोटलीकर यांच्या मराठी भाषेची योग्यता या छोट्या निबंधांतून पुढील उपयुक्त माहिती आढळली ती देतों:—" डॉ. मिचल् ह्यांनीं मराठीमध्यें **बारा** लहान पुस्तकें लिहिलीं; व संस्कृत सुबोध श्लोक ह्या नांवाचें संस्कृत श्लोकबद्ध पुस्तक लिहून त्याचें मराठी व इंग्रजी असें भाषांतर प्रत्येक श्लोकाखालीं दिलें आहे. सुबोध अभंग ह्या नांवाचें त्यांचें एक लहानसें पुस्तक आहे ......... १८७३ सालीं स्वदेशीं गेले. पण मराठी व्याकरण तुकारामाचे अभंग व इतर प्राकृत ग्रंथ ह्यांचा अभ्यास त्यांनी अव्याहत चालू ठेविलाच होता. ( पृ. १६ ) ... ( सुप्रसिद्ध डॉ. विल्सन्‌काका ... १८७५ त मुंबईस मृत्यु पावले. ) रॉबर्ट नेसबीट ह्या साधुपुरुषाचें मराठी भाषेवर मोठें प्रेम होतें. ह्यानें **चार** उपयुक्त पुस्तकें मराठीमध्यें लिहिलीं; त्यांत भगवद्गीतेवरील ह्यांचें पुस्तक महत्वाचें, उपयुक्त व सुविचारपूर्ण आहे. हें पुस्तक सध्या उपलब्ध नाहीं ही खेदाची गोष्ट आहे. ब्राह्मणांचें महत्व हें पुस्तक त्यांच्या विद्वतेचें, शोधकबुद्धीचें व मराठी भाषेच्या उत्तम ज्ञानाचें दर्शक आहे. ( १८५५ त मुंबईस वारले सदर पृ. १७ ) " यापुढेंहि कित्येक युरोपिअन मिशनरी मराठी लेखकांविषयीं माहिती रे. लोटलीकर यांनीं दिली आहे; पण कालनिर्देशाचे अभावीं ती दाखल करणें अयुक्त होईल. [ म. ग्र. इं. अ. पृ. ११ इ. ]

इतक्या पुस्तकांची या ग्रंथांत नोंद केली आहे; तथापि देशी संस्थानांत व पुण्यामुंबईबाहेर जे नवीन छापखाने निघत होते त्यांतून जीं पुस्तकें प्रसिद्ध

झालीं असतील त्यांतील पुष्कळ आमच्या हातांतून सुटलीं असण्याचा संभव आहे. जमखिंडी वगैरे संस्थानांतून हौशी अधिपतींनी छापखाने घातल्याचे दाखले आहेत. श्री रामचंद्रराव ऊर्फ आपासाहेब पटवर्धन यांचा इतर गुणिजनांना आश्रय असे. त्यांस एका कादंबरीकारानें 'परमाणगी' वरून १८६८ त लिहिलेली आपली प्रभवमालिनी व कमलावती ही २८ भागांत सांगितलेली कल्पित गोष्ट नजर केली या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत ग्रंथकर्त्यानें पुढील मननीय अभिप्राय व्यक्त केला आहे:—मराठी भाषेची हल्लींची स्थिति पाहिली तर अद्यापि वजनदारीची झाली आहे असें दिसत नाहीं परंतु ज्यांची ती स्वभाषा आहे त्यांस त्या भाषेचा अभिमान पडून ती लोकप्रिय करणें फार अवश्य आहे व यथाशक्ति प्रयत्न करून तिला प्रौढी आणणें हेंहि देशसंबंधानें त्यांचें एक कर्तव्यकर्मच समजलें पाहिजे; असें मनांत आणून ही गोष्ट कशी सिद्धीस जाईल याचा विचार केला तेव्हां ही भाषा लोकांस आवडती होण्यास सुलभ मार्ग म्हटला म्हणजे ह्या भाषेंत मनोरंजक व मनोवेधक अशा पुष्कळ गोष्टींच्या पुस्तकांचा भरणा असणें याशिवाय दुसरा दिसत नाहीं व तशा पुस्तकांची तर हल्लीं फारच कमताई दिसत आहे; जीं थोडींशीं आहेत त्यापैकीं बहुतेक भाषांतरें किंवा इंग्रजी अगर संस्कृत गोष्टींचा मूळ आधार घेऊन रचलेलीं दिसतात; तेणेंकरून त्या त्या भाषेच्या छायेचें (विशेषतः इंग्रजीचें) पांघरूण मराठी भाषेवर पडून तिला नटवत् विरूपता प्राप्त होत चालली आहे; यास्तव मराठी भाषेंतच मुळापासून पुस्तकांची रचना होत गेली असतां मराठी भाषा कालेंकरून अधिक रसभरित व गौरवयुक्त होईल असें मनांत येऊन पुस्तककर्त्यानें अल्पमतीनें ही एक रचित गोष्ट ज्ञानसंपन्न व विद्वज्जन समूहापुढें सादर केली आहे."

* * * *

"कहाण्या, ओंव्या, उखाणे वगैरे लोककथात्मक प्राचीन वाङ्मय माझे मित्र रा. वासुदेव दामोदर मुंडले यांनीं बरेंच गोळा करून भारत इ. सं. मंडळाचे ग्रंथमालेंतून वेळोवेळीं प्रसिद्ध केलें आहे. तें बहुशः पद्यरूप असल्यामुळें अतिमनोहर आहे तरी येथें त्याचा अधिक विचार करतां येत नाहीं. [म. ग. इं. अ. पृ. ८]

**भावचंद्रिका**—मराठी ग्रं. सं. मुंबई येथील यावर शके १७६१ छापला आहे. म्हणजे सन १८३९ येतो. १८१० नव्हे. [म. ग. इं. अ. पृ. १२ व पृ. ५२]

**वेताळपंचविशी**—पंचतंत्र किंवा तंत्राख्यायिक या लोकप्रिय ग्रंथाप्रमाणेंच हाहि ग्रंथ जुनाट आहे. जयसिंगाचे आज्ञेवरून सुरत कवीनें हा ग्रंथ व्रज भाषेंत केला. वेलस्लीचे अमलांत डॉ. जॉन् गिल् यानें ती लाल कवीकडून हिंदींत करविली. ती पुनः तारिणीचरण मित्र यानें बंगालचे हिंदी पाठशाळेसाठीं छापिली. इ. स. १८३० त बापू छत्रे यांनीं ती मराठींत उतरली. ज्ञानेश्वरकालीन गद्य पंचतंत्राप्रमाणें जुनी वेताळपंचविशीं ही असावी असा माझा तर्क आहे. पंचतंत्राचें भाषांतर पंचोपाख्यान म्हणून होऊन त्याची दुसरी आवृत्ति शके १७८५ ( १८६३ सन ) त मराठींत झाली.

**द्रौपदी वस्त्रहरणाची बखर** ( १८६४ ) म्हणून रा. वि. आ. काणे यांनीं नवनीतांतील प्रायः मोरोपंती आर्या व मुक्तेश्वरी ओंव्या आधाराला घेऊन केली होती.

**सभारंजनीः**—या ग्रंथाचा उल्लेख प्रारंभी उपोद्घातांत केला. त्यांतील कांहीं मौजा येथें देतों. त्यावरून ग्रंथाचें स्वरूप ही लक्ष्यांत येईल. ग्रंथाचे सोळा भाग आहेत. त्यांतील पहिले भागांत ग्रंथकार लिहितोः—

"या हिंदुस्थानचे सर्व लोक हिंदु अगर मुसलमान निर्मळ राहतात. खाणें पिणें व पोशाख चागले, सदैव हासतमुख, स्नेहास चांगले, मिळणसार व नैष्ठिक, कायमभिजास (म्हणजे स्थिरवृत्ती ) साहेबइनसाफ (न्यायी ), मोठे हिंमतवाले, तसच सावकार लोक बहुत प्रामाणिक, इतबारी, विश्वासू व त्याच प्रकारें शिपाई लोकही भले माणूस, शूर एकनिष्ठपणें इमानेंइतबारें चाकरीस हजर राहणार-स्वामीकामावर प्राण देण्यास निःशंक. जर धन्यांनीं जरब देऊन घरीं बसविलें तथापि समय पडल्यास मदतीस येतात. जमीदार लोकही मोठे अभिमानी आणि धैर्यवंत आहेत. या देशांतील स्त्रिया बहुत लावण्य, नेटक्या, पतिव्रतधर्मेंकडून युक्त, भर्ताराशीं परम प्रीतीनें अनुसरून असतात. एक क्षण वियोग साहत नाहींत. दैवदशें भर्ता मरण पावला तर सहगमन करितात अथवा सर्व उपभोगादि वर्ज करून शरीर शोषवून देह ठेवितात. याचप्रमाणें मुसलमान लोकांतहि हाच प्रकार वागतो. त्या लोकांत दुसरा भर्ता करावा असे त्याचे मार्गस्थापकाची आज्ञा आहे. परंतु हिंदुस्थानचे मुसलमान करीत नाहींत. ते व्यभिचार असें समजतात......... असो. या देशचे लोकांची तारीफ जितकी केली

तितकी थोडीच आणि शोभेल. याजकरितां इतर देशांतील लोक या देशांत येऊन राहण्याची इच्छा करितात. अवरंगजेब बादशहाचे वेळेपर्यंत सदरीं लिहिल्याप्रमाणेंच होते. आबादीहि पुर्तेपणीं होती. (पृ. ६–७)

*  *  *  *

बालकराम एक कसबा आहे तेथें एक आड आहे. त्याचें पाणी चाळीस दिवस जो पिईल त्यास गायनकला चांगली येती. फरुखशियर बादशहाचे वेळेस पावसाबरावर मिसरी साखर वर्षाव झाला होता म्हणतात. ही खबर वाकेनिगारांनीं बादशहास लिहिली. बादशहांनीं लटकी खबर लिहिली म्हणोन इतराजी करून त्यांस दूर केलें. तो वाकेनीसही मोठा शहाणा होता. त्याणे या गोष्टीचा सुरतमहजर लिहून त्यावर काजी व मुफती वगैरे सर्वत्रांच्या मोहरा करवून आपण बादशहापाशीं जाऊन तो महजर दाखवून मिसरीचा पाऊस पडला हें खरें करून मागती आपण आपले वाकनिशीचे कामावर बहाल होऊन आला. (पृ. २३)

*  *  *

“ मिनपूर येथें बारा हजार बिघे जमीन केशराचीं शेतें होण्याची आहे. तेथें वैशाखअखेरीपासून आउतें जोडितात. ते एक महिना ज्येष्ठअखेरीपर्यंत शेताची मेहनत करून केशराचे गड्डे त्यांत लावितात. एका महिन्यानें उगवतात. कार्तिकअखेरपर्यंत वाढतें. एक वितीवर झाड उंच होत नाहीं. नंतर फुलें उगवावयास लागतात. हरएक झाडास आठ आठ फुलें व एकएका फुलांत सहा सहा फकड्या असतात. फुलाचा रंग उदावरते असतो. आंत दर फकडींत तीन तार पिंवळे व तीन तार लाल निघतात. त्याचें केशर होतें. जेव्हां फुलाचा बहर होऊन जातो तेव्हां झाड हिरवें होतें. फुलें येण्याचे पूर्वीं झाडाचा रंग सफेत अखेरीस हिरवा होतो. एक वेळ झाड लाविलें तें सहा वर्षें फुलत असतें. पहिले सालीं बार कमी येतो. दुसरे वर्षीं बहुत बार येतो. तिसरे वर्षीं पूर्णत्वास येते. सहा वर्षांनंतर झाडाचा गड्डा काढून दुसरे जागीं लावावा लागतो. नाहींतर बार कमी होत जातो.” (पृ. ६३)

ग्रंथांत जागोजाग हिंदुस्थानांतील सुभ्यांचीं वर्णनें, पिकपाणी चमत्कार वगैरे वर्णिले आहेत.

इ. स. १८६५ **विधवाविवाहखण्डनः**—बाळकृष्ण लक्ष्मणशास्त्री बापट–हें १०३ पृष्ठांचें खंडनात्मक पुस्तक प्रशंसनीय पद्धतीनें लिहिलें आहे. मौज

ही आहे कीं, लेखक विधवाविवाहाचा पक्षपाती आहे, तथापि शास्त्राधार त्यास अनुकूल पडत नाहीं असें त्याचें प्रांजळ मत आहे. " सबब " तो म्हणतो, " शास्त्राच्या महाघोटाळ्यांत पडून तडीस पोंचण्याची कोणीहि आशा बाळगूं नये. तर सर्व श्रुतिस्मृति पक्क्या वेष्टनांत बांधून ठेवून ज्यांच्या अंगीं सामर्थ्य असेल त्याणीं या कृत्यास आज आरंभ करावा हाच एक मार्ग राहिला आहे. म्हणजे जशा आपल्या लोकांत शेंकडों प्रत्यक्ष शास्त्रविरुद्ध चाली यथाशास्त्र होऊन गेल्या आहेत त्याच रीतीनें विधवाविवाहही कालांतरानें त्यांच्या मालिकेंत बसेल हें खचित आहे आणि जो कोणी समर्थ पुरुष पुढें येऊन या महत् कृत्यास अनुकूल होईल त्यास वैधव्यदुःखाग्नीनें होरपळून गेलेल्या बालविधवांस द्वितीयसंबंधसुखरसानें संजीवित. शांत व जन्मभर सुखी केल्याचें श्रेय येईल यांत तिलप्रायही संशय नाहीं." ( पृ. ९९ ) प्रख्यात अक्षरकेसरी कै. **बंडुनाना रानडे** यांचाहि या विषयावर एक चटकदार लहानसा ग्रंथ आहे असें श्री. तात्यासाहेब मेहेंदळे यांनी कळविलें.

**मुक्तामाला, मंजुघोषा** याप्रमाणेंच त्या वेळीं पुष्कळ कादंबऱ्या वगैरे निघालेल्या आहेत. त्यापैकीं हळबेशास्त्री यांची रत्नप्रभा, सुलोचना, व विचित्रपुरी यांचा उल्लेख रा. मराठे यांनीं ( ना. ना. नि. ) केला आहे. तसेंच ज्ञानप्रकाशांत गोल्या घुबड या सहीचीं विनोदी पत्रें लिहिणारे बाबा गोखले यांनीं राजमदन कादंबरी लिहून १८६४ पूर्वीं प्रसिद्ध केली होती (Ranade M. Writings) मराठी गद्याच्या इंग्रजी अवतारांत कोणाही देशी स्त्रीनें १८७३ पावेतों ग्रंथ केल्याचें आढळलें नाहीं. या सालीं **साळूबाई** भ्रतार भाऊसाहेब तांबवेकर यांनीं **चंद्रप्रभाविरहवर्णन** नांवाची एक " मनःकल्पित गोष्ट फारच मनोरंजक " लिहून पुण्यास अग्निहोत्र्याचे छापखान्यांत छापली. याचीं पृष्ठें १८५ आहेत. यांत अधूनमधून व अखेरीस साक्या, दोहे व आर्या घातलेल्या आहेत. मंजुघोषा, मुक्तामाला यांतही असा प्रकार थोडासा आढळला. चंद्रप्रभावि० हें पुस्तक हातीमताईच्या जातीचें आहे. जादूनें स्त्रियांचे पक्षी व पक्ष्यांच्या परत स्त्रिया ही चंद्रप्रभा बनविते. असो. ग्रंथकर्त्री प्रस्तावनेंत म्हणते, ' स्त्रीशिक्षणांत असलेल्या स्त्रियांचा व लहान मुलींचा कांहीं वेळ कर्मणुकींत जाईल व सुबोधानें मनही रंजन होईल अशा प्रकारचें एक पुस्तक करून त्यांना यथाशक्ति सादर करावें असा हेतु माझे मनांत उत्पन्न झाला. परंतु हेतु झाल्याबरोबर मोठमोठीं पर्वतःप्राय संकटें येऊन कंबरा बांधून

मजपुढें उभी राहिली आणि मला म्हणाली, " तूं यत्किंचित् स्त्री जाती असून पुस्तक लिहिणार काय ? × × × त्यांत एकही त्वां परीक्षाही दिली नाहींस × × हें पुस्तक तूं स्वतः केलें असें कोणी म्हणणार नाहीं. × × कोणतेंही काम प्रथमच हातीं धरलें म्हणजे साधतें असा मुळींच अर्थ नाहीं. × × गुणज्ञहो, पुस्तक-कर्त्री स्त्रीजाती आहे म्हणून प्रथमच वाचण्यापूर्वी या पुस्तकावर राग भरूं नका. कारण माझे मनांत ज्ञानाचा मोड जो लहानसा उद्भवला आहे तो ही तुमची क्रोधयुक्त मुद्रा एकदम गदाप्रहाराप्रमाणें पाडून जेथल्या तेथें झडून जाईल तर कृपा करा आणि माझें मनास उत्तेजन द्या. म्हणजे मी या जगांत धन्य होईन आणि माझ्या या कोमल अंतःकरणास आपल्या अभयवचनाचें उदक मिळोन जो मोड उद्भवला आहे तो वाढीस लागेल व त्याचा वृक्ष होऊन पुष्पें, फळें येऊन सुशो-भित दिसेल, नाहींपेक्षां अल्प समजुतीनें या पुस्तकाचा रागच कराल तर तोच राग मला पुढें उपदेशास सहाय होईल तर याविषयीं विचारानें मेहर्बानी कराल ही विनंति आहे." कादंबरींत त्या वेळच्या रीतीप्रमाणें चतुरंग शहराचें प्रारंभीं वर्णन आहे. त्यांत सर्व फळें, सर्व फुलें, बाजारपेठ म्हटली कीं, तींत सर्व प्रकारचें कापडचोपड इत्यादि सामानाच्या यादी यावयाच्या ! ! स्त्रीचा ग्रंथ यापलीकडे यांत विशेष कौतुक नाहीं. या साळूबाईच्याही पूर्वी मराठींत एका लेखिकेचा लहा-नसा प्रयत्न झाला होता. ही **लेखिका मिस् विलसन्** अर्थात् देशी नव्हे. ही डॉ. विल्सन्‌ची संबंधी असावी. या "मडम विल्सनसाहेबानें" इ. स. १८३५ त "**आशूरी आणि बाबली लोकांचें वृत्तांतकथन**" म्हणून छोटेसें चोपडें लिहिलें. त्याची छापील प्रत पुणें मं. ग्रं. त आहे. ( म. ग. इ. अ. पृ. ७९ इ. )

* * * *

**ग्रहज्योतिष व फलज्योतिषसंबंधीं** बरेंच वाङ्मय या काळांत झालेलें आहे:-उ. स्फुट ज्योतिष इ. १८५३-५८-६७, गर्गाचार्य प्रश्नावली १८६१-१८७०, ज्योतिषरत्न १८५३, गणेश दैवज्ञकृत **जातकालंकाराचें** भाषांतर ( १८७३ ) आत्माराम काशिनाथशास्त्री यांनीं केलें.

* * * *

**भाऊ महाजन** यांचें नांव गोविंद विठ्ठल असें होतें. हे नागपुराकडील राहणारे असें रा. रामभाऊ जोशी म्हणतात. ( म. भा. घटना पृ. १४९ )

इ. स. १८६७—च्याळ दीनानाथजी प्रभु पाठारे यांनीं केलेला **मदालसा चंपू** ( संस्कृतावरून मराठी ) हस्तलिखित ( मुं. म. ग्रं. ) आहे. प्रस्तावनेंत ग्रंथकार " पूर्वीं म्या पंचायुध प्रपंच भाणाचें भाषांतर केलें " असें म्हणतो. संस्कृत नाटकें, पुराणें, महाकाव्यें, कल्पितकथा यांप्रमाणेंच चंपू वगैरे ग्रंथही मराठींत आणण्याचा यत्न झाला.

*      *      *      *

**गणेश सदाशिवशास्त्री लेले** यांचें जन्म त्र्यंबकेश्वरीं सन १८२५ त झालें व ते लाखलगांवीं सन १८९८ त ७३ वें वर्षीं आटपले. हे कुशाग्रबुद्धि व विवेकी होते. इंग्रजी शिकले होते व त्याचा परिणामही त्यांजवर झाला होता; पण ते बहकले नाहींत. ( माझे रसिक मित्र प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांनीं ही माहिती दिली. ) [ भ. ग. इं. अ. पृ. ६७ )

*      *      *      *

**कृष्णशास्त्री केशव राजवाडेः**—यांनीं केलेलें हरिमीडे स्तोत्राचें भाषांतर १९०८ त छापलें गेलें. कंसवध व हनुमन्नाटक हीं यांनीं मराठींत केलेलीं आहेत अशी माहिती यांचे नातू व माझे शिष्यमित्र रा. लोंढे एम्. ए. यांनीं कळविली. " यांचा जन्म शके १७४२, × × अखेरीस... संन्यास...मृत्यु शके १८२३ ( १९०१ ) " ( मनोरंजनाचा दिवाळीचा अंक १९१० पृ. ५ )

*      *      *      *

**माधव चंद्रोबा डुकळेः**--( स. १८२५-१८८५ ) सारस्वत ब्राह्मण, जन्म कळंगुटी ( गोमांतक ), घरची अत्यंत गरिबी सबब टांकसाळींत रु. ३ वर नोकरी, पुढें कारकुनीच्या निमित्तानें इंदूर, कराची असा बराच लांबचा प्रवास झाला. स्वभाव बाणेदार व अभिमानी, पुढें औषध, फोटोग्राफी व शिलालेख, असे धंदे केले व मग सर्वसंग्रह काढून मातृभाषा सेवा केली. शब्दरत्नाकर नांवाचा संस्कृत-मराठी मोठा कोश यांनीं १८७४ त प्रसिद्ध केला होता. ( मनो. दि. अ. १९१० पृ. ८ ) [ म. ग. इं. अ. पृ. १०० ]

❀      ❀      ❀      ❀

**किरकोळ वाङ्मयासंबंधांत** पुढील नांवें **महाराष्ट्रवाङ्मयसूची पृ. १५५-१५६ वर आढळलीं:**-१ कृष्णाजी गोविंद कानिटकर १८७१,

२ विष्णु बाळकृष्ण बिवलकर १८७१, ३ काशिनाथ बहिरव लिमये १८७२, ४–५ रामकृष्ण वासुदेव तळेकर व गोविंद कृष्ण नगरकर १८७३, ६ भास्कर बल्लाळ आपटे १८५३ ( १८७३ ? ), ७ गोविंद विठ्ठल किल्लेदार १८७३, ८ रंगो अनंत देशपांडे १८७३, ९ गंगाधर गणेश घनेश्वर १८७४, १० गोपाळ जिवाजी केळकर १८६६, ११–१२ काशिनाथ विष्णु व जगन्नाथ १८६६, १३ जनार्दन रामचंद्र १८६६, १४ विष्णु वासुदेव १८६६, १५ रामचंद्र कृष्ण जोशी १८६७, १६ वृत्तसूचक १८७०, १७ शंकर मोरो रानडे १८७०, १८ कित्ते इ. सिताराम बल्लाळ महाजन १८७४, १९ विष्णु मोरेश्वर थत्ते १८७२

**मासिकें:**—मासिकें वगैरेंची एक यादी महाराष्ट्रवाङ्मयसूचीवरून तयार केलेली येथें देतों. त्यावरून या जातीचे प्रयत्न कसे व किती झाले तें कळेल.

**आनंदरत्नाकर:**—१८६२ ( भा. ).

**इंजीनिआरिंग:**–विषयावर त्रैमासिक–बा. बा. साने (?). १८७६ (भा.)

**कथारत्नावली:**—सं. विनायक नीळकंठ व आनंदराव रावजी–मुंबई १८७४ ( भा. ).

**काशीखंड:**— शके १७६७ ( १८४५ ) भा.

**काव्यार्थदीपिका:**—१८७० ( भा. ).

**गायनाब्धिसेतु:**—१८७० ( भा. )

**गॉस्पेल** आणि **चर्च मिसलेनी:**—१८७४ ( भा. )

**चंद्रिका:**—१८५४ ( भा. )

**जगद्धितेच्छु पुणें:**—१८७० ( भा. )

**तारप्रसारक:**—सं. हरि केशवजी १८५०.

**त्रैमासिकपत्र:**— सं. गोविंद विठ्ठलजी ( भाऊ ) महाजन १८५५

**दंभहारक:**—सं. रामचंद्र सदाशिव १८७१ ( भा. )

**न्यायदीपिका:**—सं. वामन रा. ओक–चौबळ व खारकर १८७०-७१

**न्यायलहरी:**—१८६८ ( भा. )

**न्यायाश्रम:**—राजमाचीकर व कै. शि. ह. साठे पुणें १८६६

**न्यायास मदत**:—देवभानकर व दातार १८७०

**पुणें पाठशाळा पत्रक**:-- सं. कृ. चिपळूणकर १८६१-६२

**प्रबोधचंद्रोदय**:—१८५१ (भा.)

**प्रभोदय**:-- सन १८५६ (भा.)

**बालबोधमेवा**:--सं. रे. ह्यूम् १८७३ (भा.)

**बृहत्संहिता**:--[ वराहमिहिर ] १८७३-७४ (भा.)

**बोधसागर**:—१८४९ (भा.)

**भारतीय कथाकलाप**:--१८७३ (भा.)

**मत्स्यपुराण**:--पाक्षिक १८६९ (भा.)

**मनोविहार**:—१८६९ ठाणे (भा.)

**महाभारत**:--प्राकृत अर्थासहित १८७१ (भा.)

**वकिलाचा साथी**:--१८६७ (भा.)

**वाल्मिकिरामकथामहोदय** १८७४-७५ (भा.) सं. गोपाळशास्त्री भाटे; प्र. शेट जावजी.

**विद्याकल्पतरु**:-सं. रावजी केशव सांवारे बडोदें व ठाणें १८६८-६९(भा.)

**सत्यदीपिका**: - जुनी ख्रिस्ती १८६१ (भा.) नवी, सं. बाबा पदमनजी १८६१.

**सद्धर्मदीपिका**:—शके १७७८ (भा.) १८५६

**सुमार्गदर्शक**:—सं. परशराम भिकाजी भाटे १८६८

**सुरस गोष्टीसंग्रह**:--१८६४ (भा.)

**सुज्ञानामृत**:--कोल्हापूर १८७३

**स्त्रीभूषण**:--१८६४ (भा.)

**स्त्रीज्ञानप्रदीप**:--सं. लक्ष्मण शंकर अभ्यंकर, ठाणें मुंबई सन १८६९

**ज्ञानदर्पण**:-१८६१ (भा.)

**ज्ञानदर्शन**:--(त्रैमा) १८५४ (भा.)

**ज्ञानप्रसारक ग्रंथः**--१८५० ( भा. ) [ मराठी ज्ञा. प्र. ( ]

**ज्ञानविस्तारः**--१८६०-६१ ( भा. )

**ज्ञानसंग्रहः**—पहिली मालिका-सं. वामन बाळाजी ओझरकर-अकोला पुणें-१८७२-७३ ( भा. ).

**ज्ञानाकरः**—१८३२ ( भा. ).

**ज्ञानोदयः**—( मुलांचा भाग ) १८७३ ( भा. ).

+ + + +

ऐतिहासिक ग्रंथांत **कै. नीळकंठ जनार्दन कीर्तने यांची " ग्रांट-डफचे मराठ्यांचे बखरीवर टीका "** :— हा चटकदार ग्रंथ अद्यापिहि कौतुकानें वाचण्यासारखा आहे. नीळकंठराव यांनी ही टीका इ स. १८६७ त पुणें कॉलेजांत कृष्णशास्त्री चिपळोणकर अध्यक्ष असतां निबंधरूपानें वाचली. ती सर्वांस आवडल्यावरून प्रसिद्ध केली. आमच्या मराठी बखरींत वगैरे " स्वराज्य-प्रीति व धर्म यांचे अभिमानानें जो एक प्रकारचा रंग उठला आहे तोहि साहे-बाचे ( ग्रांट डफाचे ) ग्रंथांत नाहीं " असें कीर्तनें यथार्थपणें लिहितात ( सदर पृ. ६३, अ. १८८३ ). कीर्तनेरानडेप्रभृति तरुण मंडळींचा पुढा स्वदेशेतिहासा-भिमानानें भरलेला होता. डफनें प्राचीन इतिहास मुळींच दिला नाहीं, वाङ्मयाचा इतिहास दिला नाहीं इत्यादि डफाचे ग्रंथांतील दोष कीर्तन्यांनी चांग-ल्या प्रकारें दाखविले आहेत. याच नीलकंठरावांनीं पुढें मल्हाररामरावकृत श्रीशिव-छत्रपतींचें चरित्र वि. ज्ञा. विस्तारांतून प्रसिद्ध केलें.

+ + + +

**जयपाळः**—( म. ग. इं. अवतार पृ. ७३ ) — हें नाटक कीर्तन्यांनीं लिहितांना त्याचें संविधानक Old Testament मधील Job च्या चरित्रांतून घेतल्याचें रा. ब महाजनी म्हणतात. परंतु वास्तविक शोध पाहतां जयपाळ नाट-काचें संविधानक old Testament मधील Genesis या पर्वांतील ४१ ते ४९ या अध्यायांतील कथेचे आधारानें रचिलें आहे असें उघड दिसतें. या कथेंत नायक Joseph हा आहे. सात वर्षांचा दुष्काळ, गूढ स्वप्न, आप्त भावांची पुनः भेट इत्यादि सर्व Joseph कथेंतील प्रकार जयपाळ नाटकांत

आणिले आहेत. जयपाळ म्हणजे Joseph; Job मव्हे. कदाचित् जोसेफचा बाप Jacob व Job यांचे नांवांचा विस्मरणानें घोंटाळा होऊन रावब. महाजनी यांनीं वरील अभिप्राय दिला असावा. ही चूक माझे मित्र प्रो. रा. प. सबनीस यांनीं माझे नजरेस आणिली.

---

**लक्ष्मणशास्त्री हळवे**—यांचे वंशज मु. वाई जि. सातारा येथें आहेत असें कळतें. ( म. ग. इ. अ. पृ. ८२ )

---

**ज्ञानप्रसारकः**—या मासिकांच्या अंकांचें एक बांधीव पुस्तक ( पांचवें व सहावें १८५५।१८५६ ) पुणें अनाथविद्यार्थिगृहांत पहाण्यास मिळालें. या मासिकानें बरीच कामगिरी त्यावेळीं केलेली आहे. तिचें स्वरूप थोडें से अधिक समजावें म्हणून या पुस्तकांतील लेख व लेखक यांची यादी देतों:— ांविषयीं निबंध ( विष्णु घनःश्याम ); वादळांविषयीं निबंध ( गोवर्धन लक्ष्मण छत्रे ); उपदेशपर कथा (? ); पद्यरचना ( पाळंदे ? ) निरुपाय प्रसंगीं सहनशीलता ० ( विष्णु घनःश्याम ); विद्यावृद्धीविषयीं विचार ( लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री. हा छोटा निबंध त्यावेळच्या लोकांचे विचार समजून येण्यास फार उपयोगी आहे. ) उपदेश ( विष्णु घनःश्याम ) ज्योतिःशास्त्र ( परशराम विष्णु ); कागद रंगविण्याविषयीं; ज्ञानप्रसार; चातुर्य; देशांतील संपत्ति वाढविण्याचीं साधनें (भास्कर हरी); ग्रीस देशांतील सप्तज्ञानी (विष्णु घनःश्याम); आशा; मुलांच्या शिक्षणपद्धतीवर विचार; देवी या रोगाचा संक्षिप्त वृत्तांत● ( नारायण रघुनाथ ); संपत्तीचें स्वरूप व पदार्थांच्या किंमतीचीं कारणें (विष्णु घनःश्याम ); योग्य उत्तर; वचन; वचननिष्ठा; एतद्देशीय तरुण विद्वान् लोकांचीं स्वदेशसंबंधीं कर्तव्यें ( ); संपत्तीच्या उत्पत्तीचीं मुख्य साधनें ( विष्णु घनःश्याम ); रात्रीपासून लाभ; भोजननियम; दुःखाविषयीं; एतद्देशीय स्त्रियांची स्थिति ( नारायण रघुनाथ ); ज्योतिःशास्त्र ( परशराम विष्णु योगी ); देशव्यवहारशास्त्र ( परशराम विष्णु योगी ); नैआगाराचा धबधबा. क्षितिरचनाशास्त्र व मनुष्याचा प्रसार ( परशराम विष्णु योगी ); ग्रहण पाहण्याची रीत; श्रवणशास्त्र ( बाळ दिनाजी ); व्यापारापासून लाभ

( परशराम विष्णु योगी ); गरीब व मातबर ( प. वि. योगी ); १८५६ तील ग्रहण; संसारचातुर्य ( जनार्दन रामचंद्र [ कविचरित्रकर्ते ? ] ) जीवमात्रशास्त्र ( शामराव पांडुरंग ); देशव्यवहारव्यवस्थाशास्त्राचीं मूलतत्त्वें (सदानंद बालकृष्ण); लोहचुंबकशक्ति; मला असें वाटतें.

यावरून त्यावेळीं जे प्रौढ विद्यार्थी जे जे विषय शिकत व शिकवीत त्यांज-वर तसेंच इतर सामाजिक वगैरे विषयांवर मराठींत लेख लिहित असत, त्यांचें स्वरूप समजून येतें व तत्कालीन सुशिक्षितांचें ज्ञान व मनोभावना यांचा अदमास येतो.

\+ + + +

**कविचरित्रः**—(जनार्दन रामचंद्रजी कृत "सन १८६७ शके १७८२" गणपत कृष्णाजीकडे छापला. ) या ग्रंथांत संस्कृत कवि, प्राकृत कवि, तामिळ कवि व तेलंगी कवि यांची माहिती दिली आहे. ती इंग्रजींतले एशियाटिक रिसर्चेस वगैरेंतील व प्रोफेसर वुइल्सन् वगैरेंच्या लेखांवरून दिली आहे. १८४७तील कावेली वेंकटरामस्वामी यांच्या इंग्रजी पुस्तकाचा, तसाच नवनीत, व महीपतीचे ग्रंथ यांचा ग्रंथकारानें उपयोग केला आहे. या ग्रंथाची प्रस्तावना प्रौढ व मार्मिक आहे. प्राकृत कवींचें वृत्त चांगदेवापासून आरंभ करून अखेर बाळशास्त्री जांभे-करांना कवींत—अर्थात् क्रांतदर्शी या अर्थानें—ओढून संपविलें आहे. जुन्या कवींची वगैरे माहिती " ईषन्मात्रही कोणाजवळ नाहीं " " याकरितां लोक-बुद्धीच्या शिक्षणासाठीं सहाय्यभूत हा ग्रंथ केला आहे. " अद्यापि ही मोठा उपयुक्त वाटण्याजोगा असा हा ग्रंथ त्या काळच्या नामांकित ग्रंथांत गणला पाहिजे. जनार्दन रामचंद्रजींचा उल्लेख आमच्या ग्रंथांत आला आहे तथापि हा कविचरित्र ग्रंथ भा. इ. सं. मंडळांत पहावयास मिळाला तेव्हां हें टिप्पण लिहून येथें दाखल केलें. गद्य वाङ्मयाची मगदुरी हळूहळू वाढत चालली होती त्या काळांतच हा ग्रंथ झाला.

× × × ×

**डॉ. भाऊ दाजी लाडः**—हे प्रसिद्ध गृहस्थ नाट्यप्रेमी व विद्वान् होते. ( इ. स. १८१८–१८७४ ) तात्या व हे एकाच सालीं वारले! ( पाणंदीकर—महा–साहित्य वर्ष ६ अंक २ ).

———

## म. ग. इं. अ. यांत पृ. ११० वर उल्लेखिलेली किरकोळ ग्रंथांची यादी



इ. स. १८५८ **ब्लांद्स आल्जिब्रा**-पाटणकर-भला जंगी—भाषांतर पृ. सुमारें ६०० च्या वर. आपण 'कुट्टक' भाग नवीनच मराठींत उतरला असें ग्रंथकर्ता म्हणतो.

इ. स. १८५८ — **विदुरनीति** (१८२३ वरून ?) व **नारदनीति**-गणपत कृष्णाजी (ठा. ग्रं.)

इ. स. १८५८ **इंग्रजी मराठी कोश**— श्रीकृष्णशास्त्री तळेकर.

इ. स. १८५८ **राममोहनराय चरित्र**—भा. ह. भागवत.

इ. स. १८६० **हिंदुस्थानचा इतिहास भाग २**-नरसिंह विनायक-शास्त्री ओक-मराठी ट्रान्सलेटर-मरेच्या पुस्तकाचें भाषांतर (ठा. ग्रं.)

सन १८६० **इंग्लिश इतिहाससार**—खंडेराव बाळाजी फडके—रत्नागिरी जगन्मित्र छा. छा. शेवटीं बंडाचा (५७ च्या) इतिहास जोडला आहे. त्यांतील प्रासयुक्त रचना—रट्टे, घट्टे, पट्टे—इ. प्रसिद्ध आहे. शेवटीं श्लोक-युक्त इतिहाससार दिलें आहे. त्यांतील कटावांत "त्यावरि विक्टोरिया बैसली! थाटमाट तै, दाट चालला, घाट वाट जणु सोडुनि आला॥ ताट ताट ती धन दे त्याला! साट पाट तो लेश न आटला। अशा प्रकारें उत्सव झाला" इ. उद्गार आहेत. प्रस्तावनेंत "बहु श्रमें इंग्लिश हिस्टरीचें। खरी सुवृत्तें कळवी अर्शाचें॥ रचूनि भाषांतर काव्यकामीं। घ्याया समस्ता विनवी अबा मीं॥" असा 'संगीत' विज्ञप्तीचा नमुना आहे. (ठा. ग्रं.)

इ. स. १८६० **शब्दरत्नावली**—बाबा पदमनजीकृत क्यांडी मोल्सवर्थ-वरून निवड. अगदीं लहान. प्रस्तावना गोड.

इ स. १८६१ **गुजराथचा इतिहास**—कॅ. ए. मॅक्डोनाल्ड्-अली-महमदखानाचें पुस्तकावरून बर्डनें इंग्रजींत केला त्यावरून मराठींत. (ठा. ग्रं.)

१८६१ **हिंदु० इति०**— एल्फिन्स्टनचें भाषांतर १८६१ उपोद्घात भाग (१८६२.)

१८६१ **हिंदु० इति**—मरेचें भाषांतर भाग ३.-विष्णुशास्त्री पंडित—लाइव्ह उमीचंद प्रकरणीं निकाल क्लैव्ह विरुद्ध. " This book has not received European revision " असा लक्षणीय शेरा यावर आहे !

इ. स. १८६२ **विराटपर्व**—मराठी बखर-थत्ते व डोंगरेशास्त्री-शास्त्री मंडळीच्या ओबडधोबड गद्याचा मासला. श्री. विंचूरकर यांचे सहाय्यानें याच सुमारास किंवा जरा पुढें भारतांतील शांतिपर्वांतील राजधर्म प्रकरण छापलें गेलेलें पहाण्यांत आलें होतें.

इ. स. १८६२ **श्रीपत्तनप्रभुलेखमाणि** ( पाठारे उत्पत्ति )

इ. स. १८६४ **शब्दसिद्धिनिबंध**—वि. वा. गोडबोले व भास्करशास्त्री तामनकर-लहान.

इ. स. १८६५ **श्री भिल्लिणी** नाटक—" महाराष्ट्र काव्यप्रसारणेच्छू मंडळीनें विनायकशास्त्री नातू यांजकडून करविलें; पौराणिक."

इ. स. १८६५ विष्णु परशरामशास्त्री **पंडित**कृत-संस्कृत आणि मरा धातु**कोश.**

इ. स. १८६६ हिंदु व ख्रिस्ती **धर्मतुलना. बाबा पद्मनजी.**

इ. स. १८६७ **लेखनपद्धति**—गणेश बापूजी ( माटे ? ) शालोपयोग पण बऱ्यापैकीं. भाषांतरात्मक.

इ. स. १८६७ ( शके १७८९ ) **श्रीहरिचरित्रमंजरी**—शामराव मोरोजी-भरतखंड भूगति कथानत्र-विक्रमादिकांची पौराणिक हकीकत यांत आहे.

इ. स. १८६७ **इंग्लंडांतील प्रवास**- ( गुजराथींतील करसनदास मूळजींच्या पुस्तकाचें भाषांतर ) भा. ह. भागवत पृ. ५०२.

इ. स. १८६८ **हिंदु० संक्षिप्त इति०**—वि. कों. ओक-सरकारी-हें ९५ पृ. चें पुस्तक " फार प्रयासानें मीं तयार केलें." असें ग्रंथकार गंभीपणानें सांगतात. यांनीं देशी राज्य नाशाचीं दोन कारणें ( पृ. ९३ ) वर दिलीं आहेत:- ( १ ) " आपलें राजांची आपसांत व घरचें घरांत वैमनस्यें होतीं; हें एक, आणि ( २ ) राज्यांत व्यवस्था नसून शिपाई लोकांस कवाईत येत नव्हती हें दुसरें. त्यांत पहिलें कारण विशेष बलवत्तर होय." ( ठा. ग्रं. )

इ स. १८६८ **गुणसागर**—आ. ल. टिकेकर—पौराणिक कथांधारें मुलांस बोधप्रद. पृ. ५५ वर. जयाजीराव महाराज शिंदे हे शिवाजी महाराजांपेक्षां सुद्धां श्रेष्ठ असें प्रतिपादलें आहे. कां पुसाल तर हंसाल ! त्यांनीं ब्राह्मणभोजनादि १२ अपूर्व कृत्यें केलीं म्हणून ! !

इ. स. १८६८ **महामारी**च्या रोगांवर लोकोपयोगी सूचना—पांडुरंग गोपाळ मंत्री G.G M.C.

इ स १८६८ The Principles of Marathi Grammar the Rev. J. Stevenson ( 4 th edition ) परशुरामपंत गोडबोले व दाजीशास्त्री शुक्ल यांची मदत झाली. यांत Burgess च्या व्याकरणावर टीका आहे.

इ. स. १८६९ **त्रैराशिकसंग्रह**—ह. ना. लिमये मास्तर-शाळा गोलप आ ३ री.

इ. स. १८६९ **रत्नकोश**—क्रमिक सहावे पुस्तकांतील शब्दांचा—कर्ता वांडेकर, तळेकरशास्त्री यांचे मदतीनें.

इ स. १८७० मराठी शुद्ध लिहिण्याविषयीं **अनुगम०**—रा. वि. ओक. शालोपयोगी.

इ. स १८७० **अर्वाचीन बखर**—सदोबा पोवार—पिनॉकच्या Modern History चें भाषांतर. ( ठा. ग्रं. )

इ स. १८७० **शब्दरत्नाकर**—माधवचंद्रोबा—संस्कृत प्राकृत **कोश** सुरवात १८६१, पूर्ण १८७०. मोठा व चांगला.

इ स. १८७१ भिकाजी वासुदेव आठल्ये कृत मराठी इंग्रजी लघु **कोश.**

इ स. १८७२ भगवंत वासुदेव घुमेर यांचा इंग्रजी मराठी **कोश** लहान-
(ठा. ग्रं. )

इ. स. १८७१ **चित्पावनविनोद**—ल. ना. केणीकोटकर-चित्पावनांना प्रतिकूल—

* * * *

**( पुरवणी )**

इ. स. १८४२ **फुर्दकवही**—ज्ञानसिंधु ( म. वा. सूची )

इ. स. १८६२ **कर्मण**—नकुल पंडित ( म. वा. सूची )

इ. स. १८७१ **प्रश्नोत्तरशेखर**—रा. श्री. गोंधळेकर (म. वा. सूची)

इ. स. १८७३ **चंद्राचा इतिहास**—बायना सोमन (म. वा. सूची)

# उतारे.



[ मागें ग्रंथांत जी ग्रंथांची व ग्रंथकारांची माहिती दिली आहे व विवेचन केलें आहे त्याचा नीट बोध मनास व्हावा एतदर्थ त्या त्या ग्रंथकारांचे ग्रंथांतून थोडे उतारे नमुन्यासाठीं देतो. हे उतारे हि म्या कालानुक्रमानें लाविले आहेत. म्हणजे १८१०-३८-१८३६-५७-१८५७-७४ या तीन खंडाप्रमाणें च साधारणत: त्यांची वाटणी केली आहे. कोठें विषय आधींचा व ग्रंथ लिहिला मागाहून असा प्रकार झाला आहे. उदाहरणार्थ दादोबांचें आत्मचरित्र. यांतील विषय ज्या खंडांत पडतो त्या च वेळीं तो लिहिलेला नाहीं. या उताऱ्यांतील भाषेविषयीं वगैरे विवेचन अन्यत्र करण्याचें योजिलें आहे. ]

## ( स्वतंत्र व्हावयास इच्छिणारीं मुलें. )

### (१) मुलें जीं स्वतंत्र व्हायास इच्छित होतीं.

कामू—आहा बाबा ! मला वाटतें कीं, मी मोठा असतों तर बरें होतें ! मोठा तुझे इतका.

आबाजी – माझे लाडक्या, तुला असें कां वाटतें ?

कामू—एवढ्यासाठीं कीं, मग मला कोणाचे आज्ञेंत रहाणें नलगे. (नको.) माझे मनास येईल तें (मी) करीन.

आबा०—मला वाटतें कीं, मग तूं मोठे चमत्कार करिशील.

कामू—यांत काय संशय ? तसें झाल्यास दाखिवलें असतें. ( तसें होईल तर दाखवीन. )

आबा०—आणि जाई, तुला पण स्वतंत्र व्हावेंसें वाटतें गे ?

जाई—होय बाबा, मला ही तसेंच वाटतें.

कामू—आहा ! जर आम्ही दोघें स्वतंत्र झालों, तर मग काय पाहिजे ?

आबा०—बरें तर मुलांनो, हें तुमचें कोड मी पुरवीन. उद्यां सकाळपासून तुम्हांस मोकळीक देतों कीं, जें तुमचे मनास येईल तें करा.

कामू—बाबा, तूं (आमची) थट्टा करितोस.

आबा•—नाहीं, मी खरें च म्हणतों. उद्यां तुमची आई, मी किंवा दुसरीं कोणी घरांतील मनुष्यें तुम्हांस कांहीं आडकाठी करणार नाहींत.

कामू—आहाहा ! तसीं (शीं) झालों असतां आम्ही किती सुखी होऊं !

आबा•—मुलांनो, तितकेंच नव्हे, मी ती मोकळीक उद्यांचेच दिवसापुरती देतों असें नाहीं; तर जंवपर्यंत(जोंपर्यंत) तुम्ही होऊन माझे पाठीस लागाल कीं नको बाबा, आतां तुझा अधिकार तूं फिरून घे, तंवपर्यंत (तोंपर्यंत) देईन.

कामू—आहा ! असें झालें तर मग आम्ही फार दिवस स्वछंद (स्वच्छंद) वागूं.

आबा•—बरें तर, तुम्ही आपलीं आपणांस संभाळतीं झालींत हें पाहून मला संतोष वाटला; तर आतां उद्यांपासून तुम्ही मोठीं मनुष्यें व्हायास सिद्ध व्हावें, आणि मनास येईल तें करावें.

असें बोलणें होऊन तीं मुलें निजायास गेलीं. दुसरा दिवस उगवला तंव (तों) तीं उजाडतां उठावीं तीं प्रहर दिवस येईपर्यंत अंथरुणावरच होतीं. अधिक वेळ निजतात त्यांचें आंग जड होतें, कांहीं सुचत नाहीं, तसें कामूस आणि जाईस झालें. शेवटीं कोणी हांक न मारितां, तीं आपले आपण खावरींबावरीं (काव०) झालेलीं उठलीं. मग त्यांचे मनांत आलें कीं, आपण सगळा दिवस हवें तें करूं. तेणेंकरून त्यांचे जिवास अंमळ संतोष वाटला. मग कामू जाईस म्हणतो, "ताई, आपलीं जेवणें झाल्यावर आपण पहिल्यानें आज काय करावें बरें ?"

जाई—कां ? खेळावें.

कामू—काय खेळावें ?

जाई—आपण गंजिफांनी खेळूं.

कामू—तो खेळ हिडिस, मला आवडत नाहीं गड्ये (गडे).

जाई—बरें तर, आपालिपा खेळूं.

कामू—काय ! आपण दोघेंच ?

जाई—तर विटीदांडू, नाहीं तर सुपाऱ्यांनीं.

कामू—मला असले खेळ आवडत नाहींत.

जाई---बरें तर तुझे आवडीचे कोणते असतील ते सांग

कामू---गळ्ये, (गडे) आपण काठीचा घोडा करून खेळू.

जाई---आहारे ! लहान मुलींस तो खेळ काय शोभेल !

कामू---तो नाहीं तर घोडा खेळूं. तूं घोडा हो, आणि मी हांकणार होतों-

जाई---होय तर ! चाबूक मारायाला ! ते दिवशींचीं मला अजून आठ. वण आहे !

कामू---तें मी काय दाद्धन करितों गे ? तूं उडत चालत नाहींस म्हणून मारायाचें पडतें.

जाई---होय, पण मला लागतें, म्हणून मी तसला खेळ खेळत नाहीं.

कामू---नाहीं नाहीं, नाहीं ना तूं खेळत ? बरें तर ससाकुत्रा तर खेळ शील ? मी पारधी होतों, आणि तूं ससा हो. चल धावूं लाग, मी पाठीस लागतों.

जाई---छत् ! मला तुझी पारध नको तो, माझे पाठीस लागून तूं मला घाबरें करणार !

कामू---तुला माझा कोणताही खेळ आवडत नाहीं, तर मी तुशीं कधीं खेळणार नाहीं; ऐकिलेंस ?

जाई---मी ही तुशीं खेळणार नाहीं; हें पण ऐकिलेंस ?

असें बोलून तीं दोघें दोहों कोंपऱ्यांस रुसून उभीं राहिलीं. तीं तशींच तेथें फार वेळ होतीं; एकमेकांशीं बोलतना कीं एकमेकांकडे पाहातना. इतक्यांत दहा घट (टि) का दिवस आला. मग दोन प्रहर लवकरच भरतील, म्हणून कामू बहिणीजवळ येऊन म्हणतो, " बरें तर, तुला जें आवडतें तेंच मी करीन. चला आपण सुपाऱ्यांनीं खेळूं; एकेक डावास बारा बारा सुपाऱ्यांचा पण. "

जाई---पण मजकडे सुपाऱ्या नाहींत. तूं मला पन्नास सुपाऱ्या देणें आहेस त्या माझ्या पहिल्यानें दे, म्हणजे खेळायास येत्यें. ( येते. )

कामू---होय, पण त्या मी कालचे दिवसीं ( शीं ) देणें होत्या; आजच्या नव्हत.

जाई---असें ! तर त्या देण्यापासून तूं सुटलास का ?

कामू---जे स्वतंत्र आहेत ते कोणाचें कांहीं लागत नाहींत.

जाई--बरें तर, ही तुझी ठकविद्या मी बाबास सांगेन.

कामू--पण आतां मजवर बाबाची सत्ता नाहीं.

जाई—असें आहे तर तुशीं मी खेळत नाहीं.

कामू--तुझी इच्छा.

मातक्यानें (न्) तीं एकमेकांवर चडफडून दोघें दोहों कोनांस गेलीं. कांहीं वेळ जाऊन कामू शेउळ (शीळ) घालूं लागला. जाई गाऊं लागली; तो कुरकुरूं लागला, ती श्वास टाकूं लागली. एक तास पुनः गेला आणि दोन प्रहर होत आले. पुढें कामूनें रागानें आपली छडी खिडकींतून बाहेर झोंकिली; जाईनें आपली बाहुली कोनांत आदळली. तीं एकमेकांकडे पहात, पण काय बोलावें तें (त्यांस) सुचेना. शेवटीं जाई बोलली, चल कामू मी तुझा घोडा होत्यें (ते).

कामू--आतां ठीक. बरें, घोड्याला लगाम पाहिजे ती (तो)? मजकडे लांब दोरी आहे; ही पहा, ही तूं आपल्ये (ले) तोंडांत घाल.

जाई—मी ती तोंडांत नाहीं घालणार. माझे कमरेस बांध, नाहीं तर भुजेस (दंडाला बांध).

कामू--हें तूं वेड्यासारिखें काय बोलत्ये (सांगते)? घोड्याला तोंडावांचून दुसरे कोठें का कोणी लगाम देतें?

जाई—पण मी कांहीं खरा घोडा नव्हें.

कामू—तऱ्ही (री) पण, आपणास घोडा असें मानून तुला तसें केलें पाहिजे.

जाई—त्याचें कांहीं कारण दिसत नाहीं.

कामू—जो मी अष्टौप्रहर घोडशाळेंत (घोड्याचे पागेंत) असतों, त्या (तर) मजपेक्षां काय तं (तुला) या कामांत अधिक समजत्येस (समजतें)?

जाई—तूं किती दिवसपर्यंत ती धुळींत मळविली आहेस; ती मी तोंडांत नाहीं च घालणार.

कामू—तर मी ती तुला दुसरे कोठें घालूं देणार नाहीं. त्यापेक्षां मी तुशीं खेळूं नये हें चांगलें.

जाई—असें तुला बरें दिसेल तसें.

आतां तीं तिसऱ्यानें रुसलीं, तीं अशीं कीं, मागल्ये( ले ) पेक्षां अधिक एकमेकांवर दांतओंठ खाऊं लागलीं. मग कामू ( नें ) छडी फेंकिली होती ती ( तो ) आणायास गेला, तों छडी कोणी मोडून टाकिली होती. जाईनें भुईवरून बाहुली हातीं घेतली, तो तिचीं चिरगुटें फिटलीं आहेत ( होतीं ). मग कामू निसास ( उसासा ) टाकूं लागला; जाई रडूं लागली. इतक्यांत जेवणाची वेळ झाली. आबाजी त्यांस पुसायास गेला कीं, " हवें असलें तर पान वाढितों." तों दोघांस ही तशीं पाहून म्हणतो, " मुलांनो, तुम्हांस आज झालें तरी काय ? " तीं म्हणालीं, " कांहीं नाहीं बाबा." आणि डोळे पुशीत तीं त्याचा ( च्या ) मागें जेवणघरांत (जेवायाच्या जागीं ) गेलीं. त्या दिवशीं जेवायास नानाप्रकारचीं पक्कानें केलीं होतीं. तीं जेवायास बसलीं त्या वेळीं त्यांस बाप म्हणतो, " मुलानो, तुम्ही हीं पक्कानें फार खाऊं नका; यांपासून तुम्हांला उपद्रव होईल; ( तुमची प्रकृति बिघडेल. ) पण तुम्ही स्वतंत्र आहां त्यापेक्षां ( पक्षीं ) तुमचा ( च्या ) इच्छेस येईल तें खा प्या." असें बापाचें तोंडांतून निघतांच एकानें मोठमोठे लाडवांचे तुकडे करून गट्ट केले. दुसऱ्यानें चटण्या, सांभारीं यांची धण घेतली. तें पाहून त्यांची आई त्यांचे बापाचे कानाशीं लागून म्हणत्ये ( ते ), " अहो, आतां हीं मुलें दुखण्यांत पडतील." बाप म्हणाला, " पडतील तर खरीं, परंतु पडूं दे ( त ), तसें होईल तरच त्यांची खोड मोडेल आणि त्यांस समजेल कीं, स्वतंत्रपणापासून मुलांस असें भोगायाचें पडतें म्हणून मी त्यांस अडथळा करीत नाहीं." दादल्याचा कल पाहून आई ( बायको ) ही उगीच राहिली. मग तीं मुलें ओ येई तों जेवलीं; जेऊन थोडा वेळ गेला तंव ( तों ) कामू जाईस म्हणतो, " चल माझा ( झ्या ) बरोबर." असें म्हणून तिला तो वाडींत घेऊन गेला. आबाजी हळूच त्यांला ( ना ) न कळता ( तां ) मागून जाऊन आडोशीं उभा राहिला. त्या वाडींत एक मोटें ( ठें ) पाण्याचें टांकें होतें. त्याच्या कांठाशीं चिमणीची एक नांव होती. कामूस तींत ( तींत कामूस ) बसावेसें वाटलें. जाईनें त्यास वारिलें. ( ती ) म्हणाली कीं, " आपण आंत बसूं नये, बाबा रागें भरेल." ( कामू म्हणाला ), " बसूं नये, कां ? आपण स्वतंत्र आहों हें तूं विसरलीस वाटतें ? " जाई म्हणाली, " होयरे होय खरें ! " मग ती भावाचा हात धरून नौकेंत ( नावेंत ) बसली. आबाजी अंमळ त्यांचेजवळ जवळ आला; पण त्यांचे दृष्टीस पडला नाहीं. त्यानें मनांत आणिलें कीं, टाकें उथळ आहे. जरी हीं आंत

पडलीं, तरी काढायास अवघड पडणार नाहीं; म्हणून तो उगाच मौज पहात उभा राहिला. नौका ( नांव ) कांठाशीं बांधलेली होती, ती सोडून मधलेकडे ( मध्यें ) ढकलून न्यावी असें त्यांणीं ( नीं ) मनांत आणिलें, परंतु ती दोरीनें बळकट बांधली होती, ती सोडितां येईना; तेव्हां कामू म्हणतो, " बरें तर, आपणांस आंत बसून फिरणें साधत नाहीं तर नाहीं; पण झोंकवून तरी पाहूं या." असें म्हणून तो या आंगीं त्या आंगीं तीस झोंकवितो आहे, तों ( त्याचा ) कल जाऊन ( तो ) पाण्यांत पडूं लागला. त्यास जाई हातीं धरून सांवरायास गेली, तंव ( तों ) दोघेही पाण्यांत पडलीं. तें पाहून आबाजी वाऱ्याचे वेगानें धांवला; आणि पाण्यांत शिरून त्यानें उभयतांस ( दोघांस ) काढिलें. तीं अवधाकानें अर्धमेलीं झालीं. त्यांस घरीं आणून शेकलीं संवरलीं तों, अधाशीपणानें खाल्लें होतें तेणेंकरून त्यांचे पोटांत कळा उठूं लागल्या, मस्तक दुखूं लागलें, मूर्च्छा आली, कांप सुटला व श्वास गुदमु ( म ) रला. अशा विपत्तींतत्यांचा बाकीचा दिवस गेला व तीं रडतां कुंथतां थकलीं. त्यांस रात्रीस थोडी कांहीं झोंप आली न अ ली प्रातःकाळीं आबाजी त्यांस पुसतो, " मुलांनो तुमचा काय समाचार आहे ? " तीं ओंड ( खोल ) शब्दानें म्हणाली, " समाचार बहुत वाईट आहे ( चांगला नाहीं ). बाबा, रात्रीं आम्हांस स्वस्थ झोंप आली नाहीं. आमचें मस्तक व पोट अजून दुखतें आहे." तो म्हणाला, " बापड्यांनो, तुमची मला काकळूत वाटत्ये ( ते ). असो; पण आता पुनः आजचे दिवसीं ( शीं ) तुम्हीं आपल्या स्वतंत्र पणाचें काय करणार आहां, तें मला सांगाल काय? आजही स्वतंत्रता तुम्हाकडेस च आहे, ही तुम्हांला आठवण आहे ना ? तीं म्हणाली, " आतां स्वतंत्रता पुरे बाबा." तो म्हणाला, " असें कां माझ्या मित्रांनो ( मुलांनो ) म्हणतां ? कालचे दिवसीं ( शीं ) तुम्हींच म्हणालीं ( लां ) होतात ना, कीं दुसऱ्याच्या आज्ञेंत वागणें हें बहुत खोटें ( फार वाईट ) आहे ? " कामू म्हणाला, " आमचें मूर्खत्वाचें आम्हांस चांगलें पारिपत्य झालें." जाई म्हणाली, " आम्ही या गोष्टीची फार दिवस आठवण ठेवूं बाबा."

आबा॰—तर अतःपर तुम्हीं स्वतंत्रता इच्छीत नाहीं ?

कामू—नाहीं बाबा नाहीं. तूं सांगशील तसें करावें, यांत चांगलें आहे.

जाई—त्यांत आमचें बरें होईल.

आबा०--याचा पुरता विचार करा, कां कीं, जर मीं माझा ( आपला ) अधिकार पुन: घेतला, तर तुम्हांस सांगतों कीं, मी पहिल्यानें जें सांगेन तें तुम्हांस वाईट वाटलें तरी करावें लागेल.

कामू--कांहीं चिंता नाहीं बाबा; तुला जें बरें दिसेल तें आम्ही करायास सिद्ध आहों.

आबा०---बरें तर मजजवळ ही हिरवी बुकी ( फकी ) आहे. हिला सोनामुखी म्हणतात. हिचा स्वाद वाईट आहे; पण ज्यास अजीर्ण होतें त्यास हि ( ही ) बहुत गुणकारी आहे. आतां जर तुम्ही माझें ऐकणार, तर ही बुकी ( फकी ) या क्षणीं घ्या. माझें कसें ऐकतां तें पाहूं बरें.

कामू--घेतों बाबा घेतों.

जाई--ती जरी विखासारखी कडू असली तरी मी घेईन.

आबाजीनें त्यांला ( ना ) तें औषध दिलें. त्यांणीं ( नी ) पूर्वी करीत असत तशीं वेडींवांकडीं तोंडें न करितां तें घेऊं आदरिलें. ( संतोषानें घेतलें. ) तें अधिक संतोषानें कोण घेतों याविषयीं त्यांचा पण चालला. त्या औषधानें गुण लवकरच ( लवकरच गुण ) आला आणि तीं बरीं झालीं. त्यानंतर त्यांपासून कधीं अन्याय होई तेव्हां पारिपत्याचा धाक दाखविणें झालें तर त्यांचीं आईबापें त्यांस म्हणत कीं, " आम्ही तुम्हांस स्वतंत्र करूं." त्या शब्दानें त्यांस असें भय होई ( पडे ) कीं, तुम्हांस बंदीशाळेंत ( बंदीखान्यांत ) टाकूं असें म्हट-ल्यानें ( ही त्यांना ) तसें भय वाटत नसे.

**स. का. छत्रे—बाळमित्र** ( भाग १ ला ) पहिली आवृत्ति ( १८२८ ) पृ. ७० ते ८० ( कंसांत १८८४ तील दुसऱ्या आवृत्तींतल्या दुरुस्त्या मुद्दाम दाखविल्या आहेत. ठळक ठशांतले शब्द दुसरींत गाळले आहेत.

---

## २ [ माधवराव व रामशास्त्री ]

तो माधवराव अनेक गुणसंपन्न होता; त्यानें युद्धादिकार्यनैपुण्येंकरून मोठी ख्याति मिळविली, परंतु त्याची राजनीतिदक्षता अशी होती कीं, तिचा पुढें त्याची शौर्यप्रशंसा हलकी. तो राज्य करूं लागला ते वेळेस त्याचा मुख्य कारभारी फारा दिवसांचा आणि मोठा चतुर असा सखारामबापू नामें होता. तो लोभी

असूनही त्याचा चातुर्यामुळें लोकांस त्याची भीड फार असे; त्याचा पुढें माधवराव राज्यारूढ असतांही त्याचा मान तादृश होईना. आणि रघुनाथराव तो हि मोठा पराक्रमी, त्यामुळें त्याची प्रशंसा होईना. पुढें त्याणें रघुनाथरावाला बंदीस घातला त्यापासून त्यास कांहींसें लोक मानूं लागले; मग त्याणें त्या सखारामबापूला आपल्ये प्रतिष्ठेस प्रतिपंथी असा जाणोन एक दिवस एकांतीं त्याला नेऊन विचारिलें कीं, या लोकांत माझा मान किमपि दिसत नाहीं; त्यास मी अयोग्य आहे किंवा दुसरें कांहीं कारण आहे तें सांगा, व यास उपाय काय तो सांगा. त्यावर त्याणें त्याचे मनांतील अर्थ समजून उत्तर केलें, कीं याचें कारण मीच आहें. त्यास मोरोबा फडनवीस याला कारभार सांगावा. असें त्याणें ब्राह्मणपणाचें उत्तर केलें त्यावरून माधवराव प्रसन्न होऊन, त्या सखारामबापुनें आपली जहागीर खाऊन स्वस्छ रहावें असें केलें; आणि मोरोबा फडनवीस यास कारभार सांगितला.

याप्रमाणें माधवराव मोकळेपणा पावल्यावर पुढें तो कांहीं मोठें कार्य करणें तर तें आपल्ये आज्ञेवाचून करूं देत नसे, त्याणें त्यावेळेस लोकवृत्त समजावयास अनेक प्रकारचे उत्तम कायदे केले. तो माधवराव राज्य करीत असतां, त्यास युद्धाखेरीज कधीं रिकामपण सांपडलें तर त्या अवकाशांत तो आपल्या प्रजेस कोणे प्रकारें सुख होईल तो अर्थ पहात असे, कोणेही ठिकाणीं फिर्याद झाल्यास त्याचा न्याय शुद्ध करण्याविषयीं त्यास मोठी आवड होती; याविषयीं त्याणें कोणी एक रामशास्त्री नामें ब्राह्मण बाळगला होता; तो फार उपयोगी असे. त्या रामशास्त्र्यानें जा जा युक्तीकरून पंचाइती ठरविल्या ते ठराव अद्यापि न्यायाचे उपयोगी पडतात. तो रामशास्त्री चांगल्या वागणारास सुमार्गदर्शी आणि खलास यमसदृश होता; तो साताऱ्यानजीक माहुलीक्षेत्रीं जन्मला. त्याचे अडनांव परभुणे. तो तरुणपणीं विद्याभ्यास करावयाकरितां काशीस गेला होता. त्यास बाळकृष्णशास्त्री याचा मृत्यु झाला ते समयीं पुण्याचे दरबारीं त्याजकडून कांहीं यत्न नसतां बोलावून सर्व शास्त्री यांचा तो मुख्य केला; पुढें माधवराव योग्यतेस येऊं लागला ते समयीं तो त्यास नीतिविचार सांगत असे; त्याविषयीं एक गोष्ट आहे. तो प्रकार असा. कोणे एके समयीं माधवराव यास पंडितांचे भाषणेंकरून इछा झाली कीं, कांहीं तपस्या करावी. त्यामुळें माधवराव जप करूं लागला. मग एक दिवस तो जपास बसला असतां, रामशास्त्री कांहीं कामानिमित्त त्याजकडे गेला तेव्हां त्या

जवळच्या शिष्यांहीं सांगितलें कीं, या वेळेस श्रीमंतांची गाठ पडणार नाहीं. कांकि ते जपास बसले आहेत; त्यावरून तो आपल्या घरीं जाऊन विचार करिता झाला, कीं, जर याविषयीं वाद करावा तर ठिक नव्हे; त्यास याचा आश्रय सोडून जावें हें च बरें. मग दुसरें दिवशीं तेथें जाऊन बोलिला कीं, मला काशीस जावयाची आज्ञा द्यावी. तें ऐकून माधवराव बोलिलां कीं, आपण येऊन गेला तेसमयीं मीं जप करीत होतों. त्यानिमित्तें आपली गांठ पडली नाहीं, त्यावर त्याणें उत्तर केलें कीं, आपण जें निमित्त सांगतां तें ब्राह्मणास योग्यच आहे; परंतु ब्राह्मण जर आपलें कर्म सोडून राज्य करूं लागले तर त्यांनीं प्रजापालन करावें; तें टाकून जप करीत बसले तर अन्याय. त्यास जर आपल्या चित्तांत जप करावा असें आहे तर हें सर्व राज्य टाकून मजबरोबर चलावें; मी तें आपणास पुर्तेपणें शिकवीन. त्यावरून माधवराव मनांत समजून त्याणें तें कृत्य टाकिलें.

**मराठ्यांची बखर**— पृ. २८९।२५०. आवृत्ति...केपन् ( साने ) सन १८२९.

---

## २ गांवढेकरी उंदीर आणि नगरकरी उंदीर.

एक साधाभोळा गांवढेकरी उंदीर होता; त्याच्या घरीं दर्शनसंतोष, पुष्ट, असा एक नगरकरी उंदीर आला. त्याची याची जुनी ओळख होती, त्यावरून गांवढेकऱ्यानें त्याचा फारच पाहुणचार केला. जे पदार्थ आपल्या घरीं अनुकूळ होते ते, व जवळच्या शेतांतील कांहीं कोंवळ्या कोंवळ्या गव्हांच्या ओंब्या, व वाटाण्यांच्या शेंगा, व कांहीं भाकरीचे तुकडे असे त्यापुढें ठेविले. याप्रमाणें गांवढ्यांत मिळत्या जितक्या परी होत्या, तितक्या त्याणें आपल्याकडून मिळविल्या; परंतु नगरकऱ्यास त्या रुचल्या नाहींत. मग तो गांवढेकऱ्यास ह्मणूं लागला :— " वडील बावा, मला आज्ञा द्याल तर मी अंमळ मन मोकळें करून बोलतों. अहो, अशा ह्या कंटाळवाण्या जाग्यांत, तुह्मी राहतां तरी कसे? हें अरण्य; एथें आसपास गवत, झाडें, डोंगर, आणि पाण्याचे ओहोळ, या वेगळें दुसरें कांहीं दृष्टीस पडत नाहीं; तर, या पक्ष्यांच्या किलकिलापेक्षां मनुष्याचे शब्द बरे नव्हत काय? या ओसाड रानापेक्षां राजधानी बरी नव्हे! तर मी ह्मणतों हें प्रमाण

माना, आणि नगरांत चला. तेथें तुह्मी फार समाधान पावाल. आतां विचार करूं नका, लवकर चला. या मृत्युलोकींची वस्ती क्षणभंगुर, एथें जो क्षण साधेल तो आनंदांत घालवावा." अशा त्याच्या बढाईच्या गोष्टी ऐकून म्हाताऱ्यास मोह पडला. मग ते उभयतां तेथून निघाले, ते रात्र पडली तेव्हां नगरांत गेले. पुढें जात आहेत तंव त्यांणीं एक मोठा वाडा पाहिला. तेथें आदल्या दिवशींच लग्नाचा समारंभ झाला होता. त्या वाड्याच्या आंत जाऊन ते कोठींत शिरले. तेथें नानाप्रकाचे पदार्थ भरले होते, आणि कोणी मनुष्य नव्हतें; तें पाहून गांवढेकऱ्यास फार आनंद झाला. मग नगरकरी त्यास म्हणतो, "बाबा, आपण खोलीच्या मध्यभागीं बसावें. मी एक एक पदार्थ देईन तो चाखून मला रुचि सांगावी" मग तो नगरकरी उंदीर तेथें जितकीं फळें पक्वान्नें होतीं त्यांतून एकेक पदार्थ अनुक्रमानें आपल्या पाहुण्यास देई, तो चाखून, डोळे मिटून, "आहाहा! काय मिष्ट आहे हा!" असें म्हणून गांवढेकरी त्याचा स्वाद वर्णन करी; याप्रमाणें एक घटकापर्यंत त्यांणीं आनंदांत काळ घालविला. इतक्यांत तिकडून कोणी कोठीचें दार उघडूं लागला; तें समजतांच दोघेही उडून एका कोनांत बसले. तितक्यांत दोन मातलेले मोठे बोकेही तेथें आले; त्यांणीं मोठा शब्द केला, तो ऐकून, गांवढेकरी उंदिराचा ऊर धाकानें धसधसां उडूं लागला. मग तो हळूच नगरकऱ्यास म्हणतोः—"असें जर तुझें नगरचें सुख आहे, तर तें तुझें तुला अक्षयी असो. मला माझें गांवढेंच बरें, तेथील शेतच्या शेंगा चांगल्या, परंतु रात्रंदिवस जिवास धुसधुस होऊन एथें हें पक्वान्न खाणें नको."

## तात्पर्य.

नगरांत वास केल्यापासून पुष्कळ सुखें प्राप्त होतात हें खरें. परंतु त्या सुखाबरोबर दुःखें व भयें हींही फार असतात. गांवढ्यामध्यें मौजा कमी पण उपद्रव व संकटें हींही कमी. यास्तव ग्रामवासाचा धिक्कार करूं नये इतकें च नव्हे तर तो कांहीं अंशीं नगरवासापेक्षां चांगला असें ह्मटलें तरी चालेल.

छत्रे—इसापनीति.

———

## ४ देवशर्मा पंडित.

एके समयीं देवशर्मा पंडित खेळत होता, तें पाहून कोणी एका दुसऱ्या पंडितानें त्याची थट्टा केली. त्याचा गर्व उतरावा म्हणून देवशर्म्यानें एक धनुष्य आणविलें आणि त्याची दोरी काढून तें निर्वाक करून भुईवर ठेविलें. मग तो त्या पंडितास म्हणतो' " हें माझें कूट सांगशील तर तूं विद्वान् खरा. " पंडितास तें उकलेना, तेव्हां तो देवशर्म्यास म्हणाला, " याचा अर्थ आतां तूं च सांग, मला समजत नाहीं. " देवशर्मा म्हणालाः— " तुला समजत नाहीं तर मी सांगतों ऐक. जर हें धनुष्य सदा वांकविलेलें असलें तर लवकरच मोडून जाईल. आणि जर काम पडेल त्या त्या समयीं वांकविलें, तर फार काळपर्यंत टिकेल आणि अधिक काम करील. "

## तात्पर्य.

मनुष्याचें मन हें धनुष्यासारखें आहे; याला सदा वेधून ठेविलें असतां, तें क्षीण होऊन तादृश उपयोगीं पडणार नाहीं. म्हणून विनोद आणि खेळ हे चित्तास विश्रांतिकारक तसेच बुद्धीस तीक्ष्णता आणणारे आहेत. ते निर्दोष आहेत तर प्रसंगीं थोरांनींही करावें.

**स. का. छत्रे. पृ. ५६ इसापकृत कल्पित गोष्टी मू. १८२९ सु.** दु. आवृत्ती १८७७. (हींत जरा मूळ बदललें आहे असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे.)

मागील बाळमित्रांतील उताऱ्यांत दोन्ही आवृत्तींतील फरक लक्ष्यांत येण्यासाठीं दिले आहेत. त्यावरून येथें कल्पना होईल.

---

## ५ परिभाषा.

इंग्लिश भाषा शिकणारांस भाषा आल्यानें काय उपयोग आहे, हें एथें लिहावयांच कारण नाहीं. इंग्लिश भाषेंत या लोकीं आणि परलोकीं उपयोगीं पडावयाजोग्या सर्व प्रकारच्या विद्या लिहिल्या गेल्या आहेत आणि भाषाज्ञान पुरतें झाल्यावांचून सरकारचा रीति समजत नाहींत, हें सर्व लोकांस ठाऊक आहे.

इंग्लिश भाषा शिकणारांस शब्दोच्चार भाषारीतीप्रमाणें यथास्थित होण्यास कठिण पडतें यास्तव वाकर म्हणून कोणी एक पंडित होता त्याणें जे नेम सांगि-

तले, त्यांतून कांहीं मुख्य मराठी भाषेंत उतरून घेतले व त्याणें सर्व उच्चार दाखवायाकरितां जो संकेत केलेला आहे, त्यास अनुरोधून बाळबोध अक्षरानें उच्चार समजावा म्हणून नवा संकेत केला आहे. त्याणें जो उच्चाराचा प्रकार सांगीतलेला आहे, तो च प्रायः सांगीतला आहे. रेफ पुढें असतां दीर्घ ईकारापुढें अकाराचा अंश उच्चारणकाली भासतो पण तो लिपींत कोणी घेत नाहीं अई, आइ, औ, ह्रीं तीन अक्षरें संयुक्त स्वर आहेत म्हणून त्यांचा एकाक्षरासारिखा उच्चार करावा.

शब्दाचे अनेक प्रकार सांगणें व शब्दास प्रत्यय लावणें इत्यादिविषयीं मरे म्हणून कोणी महा व्याकरणी होता. त्याणें जा रीति सांगितल्या आहेत त्याप्रमाणें एथें लिहिल्या आहेत, परंतु जेथें इंग्लिश आणि मराठी यांचा फारसा भेद नाहीं, तेथें संकोच केला आणि जेथें संशय पडावयाजोगें स्थळ आहे, तेथें विस्तार करून लिहिलें आहे.

हामिलतन म्हणून कोणी पंडित भाषेचा शिकविणारा होता; त्याणें भाषा शिकण्याचीं उदाहरणें लिहावयाची रीति काढली, त्याप्रमाणें आम्ही एथें घेतली ती अशी कीं, वरचे ओळींत इंग्लिश शब्द लिहून त्याचेखालीं प्रत्येक शब्दाचे उच्चार लिहिले मग तिसरे ओळींत प्रत्येक शब्दाचे अर्थ लिहून संपूर्ण वाक्याचा सारांशार्थ एकीकडे लिहिला. याप्रमाणें जागोजाग उदाहरणें लिहिलीं आहेत, शिकणारानें पूर्वी प्रत्येक शब्दाचा उच्चार पाठ करून मग शब्दाशब्दाचा वेगळा वेगळा अर्थ पाठ करावा. मग आपले तर्कानें वाक्यांत काय सारांश आहे तो पाहून नंतर तो सारांश आमचे सारांशाशीं लावून पहावा, अशानें भाषेंत गति चांगली होईल. प्रथम प्रथम वाक्यांत मुख्य उदाहरणार्थ जे शब्द लिहिले आहेत ते कांहींशे मोठे अक्षरानें लिहिले आहेत.

जो शिकवणार आहे त्याणें तिसरे पृष्ठावर जे वर्णाचे उच्चार लिहिले आहेत, ते कोणेक इंग्लिशाचे मुखांतून ऐकून पुरतेपणीं शिकावें म्हणजे उत्तरोत्तर शब्दोच्चार सुलभ होईल.

प्रत्येक शब्दाचा आक्सेंत सांगितल्याप्रमाणें त्या त्या अक्षरावर स्पष्टपणीं पाडला पाहिजे. आक्सेत चुकला असतां प्रत्येक वर्णाचा जरी शुद्ध उच्चार केला तरी त्या शब्दाचा उच्चार बिघडतो.

प्रथमावृत्तींत उच्चाराविषयीं जे संकेत केलेले होते, त्यांतून कांहीं संकेत या दुसऱ्या आवृत्तींत मुंबईतील शिक्षामंडळींचे संमतावरून फिरविले आहेत, ते असे

की, fat या शब्दांत जो a आहे त्याला पहिल्यानें खुणेशिवाय नुस्ता आ असा लिहिला होता, आतां ऑ अशा खुणेनें लिहितों, तसेंच far फार या बदल फार असे व not नॉद् या बदल नॅत् असें व fall फील् या बदल फॉल् असें लिहितों. i व ou यांचा उच्चार दाखवायाकरितां प्रथम आई व ऑउ असें लिहिलें होतें आतां अई व औ असें लिहितों people.-able अशा जातीचा शब्दांचा उच्चार दाखवायास इंग्लिश व्याकरणाचे रीतीनें प्रथम पिप्ल, एब्ल असें लिहिलें होतें, आतां शिकणारास सोपें पडायाकरितां पिपल् व एबल् असें लिहितों.

भाषा व विद्या दोनी बरोबर यावी म्हणून उपयोगीं विद्या कळायाकरितां उदाहरणें योजिलीं आहेत. दोहोंत शिकणारानें चांगला अभ्यास करावा, अशी ग्रंथकर्त्याची ईश्वराजवळ प्रार्थना आहे.

*       *       *       *       *

[ पृ. ३१ वरील एक वाक्य नमुन्यासाठीं देतों म्हणजे त्यावेळीं हा ग्रंथ किती कचा उतरला आहे तें दिसेल.]

An elephants characteristics are sagacity and Strength.

ऑन् एॅल् इफॅान्ट्स कॉरॉक्तिरिस्तिक्स् आर सॉगॉसइति ऑन्द् स्त्रेङ्थ्.

इंग्लिश भाषेचा व्याकरणाची मूळ पीठिका.

Rev. J. Stevenson

for B. N. E. Society,

१८३३ मुंबई.

टीपः—मूळ ग्रंथांत मला याचा उल्लेख करावयास आला नाहीं.

## ६ [ पृथ्वीचा आकार ]

दुसरें निश्चय अतिदृढ करणारें प्रमाण चंद्रग्रहणापासून अनुभवास येतें. असें कळलें आहे कीं सूर्य आणि चंद्र यांमध्यें पृथ्वी आली, आणि ज्या सूर्याच्या प्रकाशापासून चंद्रबिंब प्रकाशित होतें, त्या प्रकाशास प्रतिबंध झाला म्हणजे चंद्रास ग्रहण लागतें. म्हणोन पृथ्वीचे छायेचा चंद्रावर जो आकार तोच ग्रहणकाळीं चंद्रबिंबाचा काळा भाग होय त्यावांचून दुसरें कांहीं नाहीं. आतां ग्रहणाचे वेळेस पृथ्वीची स्थिति कोणत्याही प्रकारची असली, तथापि चंद्रबिंबावर तिची छाया सर्वदा वर्तुळाकार किंवा वर्तुळखंडाकार असती. याकरितां पृथ्वी निश्चयें गोल आहे. कारण कीं दुसरे कोणते आकृतीचा पदार्थ दुसऱ्या प्रकाशदायक पदार्थाच्या समीप कसाही ठेवला असतां तिसऱ्या पदार्थावर त्याची छाया सर्वदा वर्तुळ पडेल असें घडणार नाहीं. पृथ्वी वर्तुळस्तंभाकार आहे असें जर कल्पिलें तर जेव्हां तिच्या दोन बाजूंतून कोणती एक सरळ चंद्रासमोर येईल, तेव्हां मात्र तिची छाया वाटोळी पडेल. जर ती चंद्रासमोर उभ्या आंगाकडून आली. तर तिची छाया चंद्रावर लांबट पडेल. आणि जसजशी चंद्रग्रहणसमयीं ती तिकस असेल तसतशी तिची छाया थोडीबहुत दीर्घवर्तुळाकार पडेल.

पृथ्वी वर्तुळाकार आहे अशी कल्पना केली असतां वर लिहिलेले सर्व गोष्टींस मिळती. आणि या सिद्धांताशीं विरुद्ध जा दुसऱ्या कल्पना लोकांनीं काढल्या आहेत त्या या वर सांगितल्या प्रमाणांतून कोणत्या तरी एकाशीं विरुद्ध दिसून येतात व त्यांस कोणत्याही सबळ अनुभवाचा आधार नाहीं. परंतु आमच्या मतावर पाहिलें असतां कांहीं विरुद्ध युक्ति येत नाहीं, म्हणोन हा सिद्धांत निर्विवाद असें सिद्ध होतें.

**बाळशास्त्री जांभेकर**—भूगोलशास्त्र. ( गणित भाग )
पृ. ११।१२. इ. स. १८३६

---

## ७ [ कृत्रिमहेतुक. ]

नंतर मी पहातो तों ते उभयतां बाजार सोडून पुढें चालले नाहींत इतक्यांत पुढें एक गृहस्थ चालला होता त्याची त्यांची गांठ पडली. त्याचें नांव

कृत्रिमहेतुक. त्यास यानी विचारलें, कां महाराज आपला गांव कोण, आणि आपण किती दूर चाललां ? त्याजवरून त्यानें उत्तर दिल्हें कीं मी मधुरवाणी-पुराहून आलों आणि दिव्यपुरास जात आहे. याप्रकारें तो बोलला, परंतु त्यानें आपलें नांव सांगितलें नाहीं.

ख्रिस्ती पुसतो, अहो आपण मधुरवाणीपुराहून आलां काय ? त्या पुरांत कोणी चांगला गृहस्थ राहतो काय ? कृत्रिमहेतुकानें उत्तर केलें, होय राह तोसा वाटतो.

ख्रिस्ती—बरें, महाराज आपलें नांव काय ?

कृत्रिमहेतूक—तुमची आमची ओळख नाहीं. आपण या मार्गानें जात असला तर मी आपल्या समागमें येईन, आपण जर जात नसला तर मग एक-टेंच जाणें प्राप्त.

ख्रि०—म्यां असें ऐकिलें आहे कीं, मधुरवाणीपूर मोठें मातवर शहर आहे.

कृ०—होय, मोठें मातबर आहे, व माझीं तेथें मोठीं मोठीं मातबर सोयरीं आहेत.

ख्रि०—आपलीं तेथें कोण कोण मातबर सोयरीं आहेत ?

कृ०—माझीं तेथें बहुधा सर्व गांवभर सोयरीं आहेत; त्यांतून कित्येकांचीं नांवें सांगतों. बहुमतराव, कार्यसाधकराव, मधुरवाणीराव; या मधुरवाणी राव-जीच्या नांवावरून आमच्या नगराचें नांव मधुरवाणी असें पडलें; सरळदर्शकजी, द्विमार्गचरजी, उत्तमानुत्तमसमजी, हे ही आमच्या गांवीं आहेत. द्विमुखजी, हे आमच्या गांवाचे धर्मोपदेष्टे आणि आमच्या आईच्या बंधुवर्गातील आहेत. आम्ही अलिकडेस कुलीन झालों, आमचा पणजा तर वल्हीं मारणाराच होता. तो पुढें पाही, आणि मागें जाई, व त्याच धंद्यानें मला इतकी संपत्ति मिळाली.

ख्रि०—आपलें लग्न झालें आहे काय ?

कृ०—होय, माझी स्त्री मोठी पतिव्रता आहे. तिची आई ही तशीच पति-व्रता होय. ती कृत्रिमेची कन्या म्हणून ती मोठे कुलीन कुटुंबांतील होय. तिची शिक्षा फार उत्तम आहे. त्या शिक्षेच्या योगानें, कुळवाड्यापासून तर राजापर्यंत सर्वांनीं कसें वर्त्तावें, हें तिला कळतें. आमचा व जे धर्मात नियमानें चालणारे

त्यांचा भेद आहे खरा, पण फारसा भेद नाहीं, इतकेंच कीं वायु आणि भरती हीं प्रतिकूळ असल्यास आम्ही कधीं चालावयाचा प्रयत्न करीत नाहीं, आणि धर्माची प्रवृत्ति श्रीमंताकडेस झाली म्हणजे आम्ही धर्माविषयीं फार निर्भर दाखवितों. संपत्तिरूपसूर्य धर्मावर प्रकाशूं लागला आणि लोक त्याची स्तुति करूं लागले तरच आम्ही धर्माच्या गतीनें बाहेर चवाठ्यांत चालावयाची फार आवड धरतों.

नंतर ख्रिस्ती कांहींसा एकीकडेस होऊन आपल्या आशावान सोबत्यास बोलतो. अहो हा गृहस्थ तर मला मधुरवाणीपुरांतील कृत्रिमहेतुक दिसतो; आणि हा जर तोच गृहस्थ असला तर एथें जे सोदे आहेत त्यांमध्यें यापेक्षां कोणी मोठा सोदा नाहीं. आशावान उत्तर देतो, तो कोण आहे, हें त्यास पुसावें; मला वाटतें त्यानें आपलें नांव सांगायास लाजूं नये. त्याजवरून ख्रिस्ती त्याच्याजवळ जाऊन म्हणतो, आपल्या बोलण्यावरून तर आपण असें दाखवितां कीं, आपणांस जगांतील सर्व लोकापेक्षां कांहीं विशेष कळतें, पण मी जें अटकळेनें सांगतों तें नीट असावें. अहो, मधुरवाणीपुरांतील कृत्रिमहेतुक हें आपलें नांव नाहीं काय?

कृ०—तें माझें वास्तविक नांव नाहीं, तें आडनांव ठेविलें आहे. असो, तें निंदेचें नांव म्यां सहन करून उगें च असावें. पूर्वी जे उत्तम गृहस्थ होऊन गेले, त्यांनीं अशींच नांवें साहलीं आहेत.

ख्रि०—बरें पण असलें नांव पडायाजोगीं आपण लोकांबरोबर वर्तणूक तर केली नाहीं ना ?

हरि केशवजी—यात्रिकक्रमण–पृ. १४२।१४४
उताऱ्याची आवृत्ति पुढली. ( मूळ १८४१ )

---

## ८ सुस्वभावाचें एक अलौकिक प्रतीक.

जिनिवा येथील आबारेट म्हणून एक तत्वज्ञ पुरुष होता. त्याजविषयीं असें सांगतात कीं, त्याची वृत्ति कधीं क्षोभातें पावलीच नाहीं त्याच्या घरीं एक स्त्री तीस वर्षें चाकरीस होती, तिनें त्यास कधीं रागें भरतां, पाहिलें नाहीं. यास कसोटीस लावून पाहावें असें कितीएकजणांच्या मनांत आल्यावरून तूं त्यास कोप

आणण्याविषयीं उद्योग करशील तर तुला अमुक द्रव्याची रक्कम मिळेल असें त्या स्त्रीस त्यांनीं कबूल केलें तें तिनें मान्य केलें. आपला बिछाना चांगल्या रीतीनें केलेला असावा म्हणून यास फारच आवडत असे. हें असें तिनें जाणून नेमलेल्या दिवशीं तो बिछाना करण्याविषयीं दुर्लक्ष केलें. तें पाहून आबोरटानें दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तिला तें वर्तमान सांगितलें. तेव्हां तिनें उत्तर दिल्हें कीं, मी बिछाना करावयास विसरलें आणखी कांहीं ती बोलली नाहीं. पुनः त्याच दिवशीं संध्याकाळीं तिनें तो बिछाना करण्याविषयीं आळस केला, तेव्हां दुसऱ्या दिवशीं तो पंडित पहिल्याचासारिखें बोलला, त्याजवरून तिनें पूर्वीपेक्षां विशेष शांतपणानें कांहीं निमित्त सांगितलें. तिसरे दिवशीं तो तिला म्हणाला " त्वां अझून माझा बिछाना केलास नाहींस, बिछाना करण्यानें तुला श्रम होतात, असें कदाचित् आढळलें असेल म्हणून त्याविषयीं त्वां कांहीं निश्चय केला आहेस, असें दिसण्यांत येतें; पण इतकेंही असून ती कांहीं मोठी गोष्ट आहे असें नाहीं, कां तर तो जसा बिछाना आहे त्या तस्याची मलाही संवई लागत चालली आहे." तेव्हां ती त्याच्या पायीं पडून त्याजवळ सर्व कबूल झाली. पृ. ११९ ( शालोपयोगी नीतिग्रंथ. )

## ९ क्षांतीनें एकत्र ठेविलेलें कुटुंब.

एक असा लेख आहे कीं, चीनचा पादशाह आपल्या राज्यांतून गमन करीत असतां साहजिक एका घरीं जेवण्याचा त्यास प्रसंग आला. तेथला धनी त्याच्या बायका, लेंकरें, सुना, नातुंडें, चाकर अशा सर्वांच्या ठायीं पूर्ण शांति आहे व तीं एकोप्यानें रहात आहेत, असें दृष्टीस पडल्यावरून पादशाह आश्चर्यानें चकित झाला. मग इतकीं व असीं तऱ्हेतऱ्हेचीं मनुष्यें असतां या सर्वांच्या ठायीं शांति राहण्याविषयीं तुम्हीं कोणत्या उपायांची योजना केली आहे तें मला सांगावें म्हणून त्यानें त्या घरधन्यास विनंति केली. तेव्हां त्या वृद्ध पुरुषानें शिशाची लेखणी काढून हे तीन शब्द लिहिले, " क्षांति, क्षांति, क्षांति." पृ. १२० (शा. नी. ग्रं. )

## १० स्वदेशप्रीति.

आपण ज्या देशांत जन्मलों व आपलें पालनपोषण झालें, त्या देशावर प्रीति करणें ही एक आपल्या स्वाभाविक वृत्तींतली च वृत्ति होय. कोणी कसेही गंव्हार असोत अथवा त्यांचा तो देश इतर लोकांस कितीही तुच्छ वाटो, परंतु

ही प्रीति प्राय: सर्व देशीं जन्मलेल्या मनुष्याच्या मनांत वागती. ही वृत्ति विवेकाचे मर्यादेंत राही असी ठेविली असतां इचा उपयोग आहे. ही प्रत्येक देशाच्या लोकांच्या ठायीं आपआपल्या सर्वसाधारण भूमीविषयीं आस्था उत्पन्न करिती, त्यास त्या भूमीवर इतर देश चढ करूं लागले असतां त्याजपासून तिचा बचाव करायास, तिचें साधारण कल्याण वृद्धिंगत करायास व तेथले जे कोणी त्या अवघ्यांविषयीं आपल्या मनांत प्रीति वागवावयास प्रवृत्त करिती. यास उदाहरण. डच इतर कोणत्या देशापेक्षां अथवा लोकांपेक्षां हालंडावर व डच लोकांवर विशेष प्रीति करितो. शत्रूपणाचा घाला पडला असतां हालंडाचें रक्षण करायास तो आपला जीव अरिष्टांत घालील, हालंडांत उद्योगाची भरभर व्हावी व आपल्या बरोबरीचीं आपल्या देशींचीं मनुष्यें त्यास जें कांहीं उत्तम तें प्राप्त होतां आपण पहावें असें तो इच्छितो तो तेथल्या राज्याविषयीं चांगला वळलेला असतो, कां तर तें त्याच्या देशीचें राज्य, नीति करून देणें, धर्माचा सांभाळ करणें व जनव्यवहाराचीं जीं खटलीं त्याची योजना करणें, याविषयीं जे नियम ते त्यास आवडतात, कां तर ते त्याच्या देशींचे नियम—म्हणून तो आज्ञापालक प्रजा आणि स्वस्थचित्त नगरकरी असा होतो आणि तेथल्या लोकांचें ऐक्य व परस्परांविषयीं शुभ इच्छा इहींकरून त्या देशाचे व्यवहार वृद्धीस पावतात. असें परदेशीय राज्य व परदेशीय नियम यांच्या ताब्यांत हालांड असतें तर होऊं शकलें नसतें. तीं कसींही असोत तीं ज्या देशाचीं तेथें तीं यथायोग्य होत.

परंतु स्वदेशप्रीति परिमितपणें करून असी उत्तम असतां तिचा अतिशय केला अथवा ती विवेकानें आवरिली नाहीं, तर अनुचित आणि अपकारक होती. देशसंबंधानें जीं आपलीं व्यंगें अथवा सुधारणूक ज्यास पाहिजे अस्या जनव्यवहारांतल्या ज्या आपल्या चुक्या यांविषयीं आपल्यास ती आंधळे करी असें आपण करून घेऊं नये. आपण आपल्या देशावर प्रीति करितों म्हणून अन्य देशांचा व तेथल्या राहणारांचा द्वेष अथवा धिक्कार करूं नये; हें, माझ्यासमान मान्यता व सद्गुण दुसऱ्या कोण्या मनुष्यास नाहीं, असें प्रत्येक मनुष्यानें आपल्यास थोर मानिलें असतां जसें वाईट होतें तसें होईल. गैरवाजवी आगळिकेपासून आपल्या देशाचा बचाव करण्याविषयीं सिद्ध असण्यांतही आपण सावधगिरी ठेवावी. नाहींतर शेजारचे देश आपल्यास पुरतेपणीं संतापवीत नसतां त्यांजवर शस्त्रें धरावीं, असा भाव कदाचित् आपल्या ठायीं उत्पन्न होईल, कां तर युद्ध हें एक घोर अनिष्ट

होय, त्याचा आश्रय अत्यंत आवश्यकता असली तर करावा, नाहीं तर कदापि करू नये. कसबें व व्यापार होई असें करून आपल्या देशाचें कल्याण वृद्धिंगांत करण्याचा आपण यत्न करीत असतां या प्रकरणीं इतर देशास अपाय केल्यनीं आपल्या देशाचें हित होईल, असें आपण कधीं देऊं नये. याविपरीत असें आहे कीं, इतर सर्व देशाची संवृद्धि झाली असतां प्रत्येक देशाचें हित होतें. कां तर एखादा देश संवृद्ध झाला असतां इतरांकडेस जें विकायाचें असतें तें त्या तर-पासून विकत घ्यावयास समर्थ होतो. सारांश मनुष्यांच्या वर्तनाविषयीं जे नियम ते देशांविषयीं एकसारिखे लागू पडतात. आपल्या स्वार्थाचें सर्व सरळ उपायें करून संवर्द्धन करायास आपला यत्न चाले तेथपर्यंत आपण आपल्यावर प्रीति करावी; पण आपल्या बरोबरीचे जे प्राणी त्यांजवर ही आपल्यास प्रीति केली पाहिजे व आपल्या शक्तीप्रमाणें त्यांचें सर्व प्रकारें बरें केलें पाहिजे. तसेंच एखाद्या देशानें आपल्या स्वार्थाचें सर्व सरळ उपायें करून संवर्धन करायास आपला यत्न चाले तेथपर्यंत आपल्यावर प्रीति करावी, परंतु त्याचे जे शेजारी त्यांजवरही त्यास प्रीति केली पाहिजे आणि आपल्याकडून घडायाजोगें असेल तसें त्यांचें सर्व प्रकारें बरें केलें पाहिजे, त्यांचें त्यानें निखालस वाईट करूं नये. असें जें उभयप्रकरणीं समान वर्तन हें उभयपक्षींच्यास चांगलें आहे; कां तर जसें जसें आपले शेजारी समाधानी, सुखी व चांगले होतात, तसें तसें आपल्यास त्यामध्यें राहणें विशेष आनंदकारक विशेष हितकारक होतें आणि जसेजसे इतर देश सम्वृद्ध, संतुष्ट व क्षोभरहित होतात तसेंतसें आपल्या देशाची समृद्धि व अक्षोभता होण्यास चांगलें होतें. पृ. २१८

हरि केशवजी—शालोपयोगी नीतिग्रंथ.
इ. स. १८४६ ( चेंबर्स मॉरल क्लासबुकवरून )



## ११ कागदाची उत्पत्ति (पृष्ठ २४३ विद्यो. प्र )

सांप्रत जे कागद लिहिण्याची प्रवृत्ति आहे, ते पहिल्यापासून सर्व पृथ्वीवर ठाऊक आहेत असें नाहीं. प्राचीन ग्रीक आणि रोमान लोक मेणाच्या किंवा धातुमय पत्र्यांवर लिहीत असत, आणि अजूनही या देशामध्यें तेलिगण इत्यादि प्रांतांत तालपत्रांवर लिहितात. यावरून असा तर्क वाटतो कीं, पूर्वी इकडील लोक झाडाच्या पानावर लिहीत होते. यास दुसरें प्रमाण असें आहे कीं, प्राचीन संस्कृत ग्रंथांत जेथें लिहिण्याची गोष्ट आहे, तेथें केतकीपत्र, भूर्जपत्र, तालपत्र इत्यादिकांचें ग्रहण आहे, त्यांशिवाय दुसऱ्या पदार्थांचें नांव कोठें अढळत नाहीं.

चिनई लोकांमध्यें कागद पहिल्यापासून प्रसिद्ध आहे, परंतु ते रेशिमाचे करीत असत. सन ३० हिजरीच्या सालीं असे रेशिमाचे कागद करण्याचा कारखाना एक समर्कंद एथें उत्पन्न झाला. पुढें अठ्ठावन्न वर्षांनीं मक्का शहरांत राहणारा कोणी युसफ अमरू म्हणून होता. त्यानें कापुसाचे कागद करण्याचा प्रकार चालू केला. पुढें आरब लोक युरोपखंडामध्यें स्पेन देशात जाऊन राहिले, तेथें कापूस आणि रेशीम हे दोन्ही पदार्थ मिळायास कठीण म्हणोन ते तागाचे कागद करूं लागले. तेथून सर्वत्र पसरूं लागले. स्पेन [illegible] तील दप्तरांत ख्रिस्ती सन ११७८ त झालेला एक तह आणि सन १२५१ त [illegible] दिलेली एक सनद अशीं दोन कागदावर लिहिलेलीं आहेत. तेथून पुढें काग[illegible] फ्रान्स, इटाली, जर्मनी इत्यादि इतर मुलुखात पसरले. फ्रान्स एथें सेंट लुईस राजाच्या वेळचें सन १२७० च्या सुमारें लिहिलेलें एक पत्र आहे. या रीतीनें कागद युरोपखंडामध्यें उपयोगांत आले.

या देशांत प्रथम कागद केव्हां करूं लागले [illegible] हें खचित ठाऊक नाहीं; परंतु ख्रिस्ती शकापासून दहाव्या शकांतत (श[illegible]त ?) मुसलमान आले त्या सुमारें कागद प्रसिद्धींत आले असतील असें अनु[illegible]. ( विद्योपक्रमाचा ग्रं. नाना मोरोजी—१८४६.)

## १२ ॥ करपल्लवी भाषा ॥ ( पृष्ठ १४३ विद्यो प्र. )

### श्लोक.

आदर्शः कमलंचक्रं टंकारस्तलहस्तकं ॥
पत्रंच याचनं षट्कं भाषासौ करपल्लवी ॥ १ ॥

या श्लोकांत वर्णज्ञानार्थ करावर आठ मुद्रा सांगितल्या त्याचें स्वरूप.

१ आदर्श—ह्मणजे कर सरळ उभा आर्शा सारिखा दाखवावा.

२ कमल—ह्म. कर प्रफुल्लित कमलाकार करावा.

३ चक्र—ह्म. इतर बोटें मिटून तर्जनी ऊर्ध्व करून चक्राकार फिरवावीं.

४ टंकार—ह्म. तर्जनीचें नख आंगठ्याच्या मध्य रेषेपुढें दृढ लावून तर्जनी वेगानें समार लोटावीं; जसें मडकें, फणस इत्यादिकावर टीच मारितात.

५ तलहस्तक—म्हणजे बोटांचीं अग्रें त्यांच्या मुळाशीं मिटून तळाथ उताणा करावा.

६ पत्र—ह्म. कर आडवा पत्राकार करावा.

७ याचन—ह्म. कांहीं मागते वेळीं कर पुढें पसरतात तसा पसरावा.

८ षट्क—ह्म. इतर बोटे मिटून कनिष्ठिका उभी करून दाखवावी.

या मुद्रांत ज्या मुद्रेच्या नामास जें प्रथम अक्षर आहे ती मुद्रा त्या अक्षरापासून त्यासहित पांच अक्षरांस सुचविते, तें असें.

आदर्शमुद्रेनें—अ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, कमलमुद्रेनें...क, ख, ग, घ, ङ. चक्रमुद्रेनें...च, छ, ज, झ, ञ. टंकारमुद्रेनें...ट, ठ, ड, ढ, ण. तलहस्तकानें—त, थ, द, ध, न, पत्रमुद्रेनें...प, फ, ब, भ, म. याचनमुद्रेनें...य. र. ल. व, श. षट्कमुद्रेनें...ष, स, ह, ळ, क्ष, ज्ञ. याप्रमाणें हे वर्ण जाणावे.

या मुद्रांनी अक्षराचे वर्ग सूचित झाले. यांतील जें अक्षर बोलावयाचें तें जाणण्याची रीति

### श्लोक.

मुद्रादि वर्णादारभ्य कनिष्ठादिषु निर्दिशेत् ॥
अङ्गुष्ठाग्रेण तद्वर्णं तर्जन्या ज्ञाक्षरं तले ॥ १ ॥

ज्या ज्या वर्गातील अक्षर बोलावयाचें असेल त्या त्या वर्गाची मुद्रा दाखविल्यानंतर त्या वर्गाची चार अक्षरें आंगठ्यांच्या अग्रानें, कनिष्ठिका, अनामिका, मध्यमा, आणि तर्जनी यांच्या मुळीं अनुक्रमें करून दाखवावी. पांचवें तर्जनीच्या अग्रानें अङ्गुष्ठाच्या मुळीं दाखवावें.

अक्षरास काना, मात्रा, उकार, अनुस्वार, आणि विसर्ग देण्याची रीति व जोडाक्षरांची खूण

श्लोक ३.

तत्स्वराणांच चिन्हानि यथा लिप्यङ्गुलिष्वथ ॥
अङ्गुष्ठमध्यमाशब्दं संयोगाद्यंतयोश्चरेत् ॥३॥

काना, मात्रा इत्यादिक, अङ्गुष्ठाच्या अग्रानें, जें अक्षर असेल त्याच्या बोटावर लिपीप्रमाणें काढावीं. आंगठ्यावरील अक्षरांची तर्जनीच्या अग्रानें काढावीं. जोडाक्षर आलें असतां त्याच्या प्रारंभीं अङ्गुष्ठ आणि मध्यमा यांनीं चिटकी वाजवून त्या दोघांचीहि मुद्रादिक दाखवून पुनः शेवटीं चिटकी वाजवावी.

उदाहरण-०तें पत्र आण.

या उदाहरणीं प्रथमाक्षरीं, तलहस्तक मुद्रा दाखवून, कनिष्ठिकेच्या मुळीं अङ्गुष्ठाग्रानें स्पर्श करून, तिजवरच मात्रा आणि शून्य हीं चिन्हें करावीं. द्वितियाक्षरीं पत्रमुद्रा दाखवून कनिष्ठिकेच्या मुळीं अङ्गुष्ठाग्रानें स्पर्श करावा.

तृतीयाक्षरीं चिटकी वाजवून तलहस्तक मुद्रा दाखवून कनिष्ठिकेच्या मुळीं अंगुष्ठाग्रानें स्पर्श करावा. अनंतर याचनमुद्रा दाखवून, अनामिकेच्या मुळीं स्पर्श करून पुनः चिटकी वाजवावी. चतुर्थाक्षरीं आदर्शमुद्रा दाखवून कनिष्ठिकेच्या मुळीं अंगुष्ठानें स्पर्श करून तिजवर त्यानेंच काना द्यावा. पंचमाक्षरीं, टंकारमुद्रा करून तर्जनीच्या अग्रानें अंगुष्ठाच्या मुळीं स्पर्श करावा.

या एका प्रकारें करून, कर ईश्वराचें कौशल्य आणि चांगुलपणा, हीं दर्शवितो.

बहिरे व मुकेहि या प्रकारें कर, व बोटें, यांच्या खुणानी व्यापार करतात. हें साधन जर नसतें, तर ते कसें करते बरें. ते खुणा करते वेळीं हाताचीं अस्थि, व संधि, किती त्वरेनें हालवितात, तें पहाण्याचा मोठा चमत्कार आहे.

---

## १३ लोखंड ( पृष्ठ २२२ विद्यो. ग्रं. )

सर्व धातूंमध्यें लोखंड मनुष्याचे फार उपयोगी पडतें. याजकरितां धातूंची किंमत जिच्यातिच्या उपयोगावरून च ठरवावी तर लोखंडाची किंमत सर्व धातूंहून निश्चयेंकरून अधिक होईल. लोखंडाचा उपयोग किती कामांत पडतो, ह्याची गणना करवत नाहीं. परंतु एथें कांहीं सुचवितों कीं, नांगर, खोरीं, कुदळ्या पाहारा, कोयत्या, इत्यादि कृषिकर्माचा सरंजाम; तशीं च शिल्पोपयोगी कुऱ्हाडी करवत, रोखण्या, टांक्या, हातोडे इत्यादि हत्यारें, आणि उच्चालक यंत्रादिकरून वाफेच्यायंत्रापर्यंत सर्व यंत्रें, तसेंच सुऱ्या, वस्तरे, नराण्या इत्यादि धारायुक्त शस्त्रें, आणि स्वयंपाकाच्या उपयोगीं चुली, भटया, कलथें, चिमटे, कढया, तवे, इत्यादि पदार्थ, तसीच गृहरक्षणार्थ कुलपें कड्या, कोयंडे, अडी, कठडे, मेहराबी आदिकरून, आणि युद्धोपयोगीं तोफा, बंदुका, गरनळा, गरनळाचे गोळे, गोळ्या भाले, बायनेट, तरवारी, इत्यादि सर्व पदार्थ लोखंडाचेच करतात.

लोखंड सर्व धातूंत कठीण आणि लवविलें असतां परतून पूर्वस्थितीवर येतें. हा सर्व धातूपेक्षा लोखंडांत उत्कृष्ट गुण आहे. तें केवळ हलक्या धातूंतील एक धातू आहे. आणि किती एक प्रकारचें लोखंड मोडावयास फार मेहनत घेतें.

जें लोखंड उपयोगास पडतें त्याचे ३ भेद आहेत. पहिला ओतींव, दुसरा घडींव आणि तिसरा तिरवें. ओतींव लोखंडाचा असा प्रकार आहे कीं, कच्चा लोखंडाचा रस करून साचांत ओतितात, त्यासच ओतींव लोखंड असें म्हणतात. त्यांचीच पाणी तापवायाचीं लहान मोठीं भांडी, कढया, तोफा, तोफांचे गोळे, चुली आणि ज्या पदार्थास वळवावयाचें अगत्य नाहीं, असे पुष्कळ पदार्थ करितात कारण ओतींव लोखंड विळविलें असतां मोडतें.

घडींव लोखंडाचा प्रकार असा आहे कीं, केवळ अग्नीसारिखे लाल तापवून मोठ्या घणानें ठोकून लवायाजोगें मृदु करितात. अशा लोखंडाच्या दाराच्या कड्या, अडी, नाल, इत्यादिक अत्यंत बळवंत पदार्थ पुष्कळ करितात.

तिरव्याचा प्रकार असा आहे कीं लोखंडाच्या लहान लहान कांबी, लाकडाची राख कोळसे, हाडांचा किंवा शिंगांचा चुरा या यासहवर्तमान अग्नींत तापविल्यानें लोखंडाचे अवयव दृढ होतात, आणखी तें लोखंड लवविलें असतांहि

परतून पूर्वस्थितीवर लौकर येतें. यासच तिखें असें म्हणतात. तिखें अत्यंत तापवून तत्क्षणींच पाण्यांत निववितें असतां जसा ताव लागला असेल त्याप्रमाणें चाकूच्या पात्यासारिखें टणक होतें, (तुम्हांस माहित आहे कीं चाकूचें पातें लववितें असतां मोडतें) किंवा घड्याळाचे कमानीसारिखा त्या तिख्यावर स्थितिस्थापक संस्कार उत्पन्न होतो. आपलीं सर्व कापायाचीं शस्त्रें तिख्याचीं करितात.

लोखंडाच्या योगानें प्रकृति दृढ होते. असें वैद्यकांचे मत आहे, म्हणून कदाचित् लोहाचे रसायण देतात, आणि कितीएक उदकांत लोखंड आहे; म्हणून तीं उदकें औषधार्थ प्यायाजोगीं आहेत असा त्यांचा गुण सांगतात. त्या उदकांस लोहमय उदकें म्हणतात. त्यांचा स्वाद शाईसारिखा लागतो.

आमच्या उत्पन्नकर्त्यानें आपलें ज्ञान आणि औदार्य यांहीं करून सर्व धातूंमध्यें लोखंडाचा उपयोग अधिक आहे, ह्मणून तें सर्व धातूंपेक्षा अधिक असावें, असें नेमिलें आहे. त्याप्रमाणें लोखंड सापडत नाहीं असा बहुतकरून एकही देश नाहीं.

---

## १४ या देशांतील लोकांचा लग्न करण्याचा वृत्तांतः पृ. ११८

पूर्वीं बहुत स्त्रिया विद्याभ्यास करीत असत अशीं प्राचीन इतिहासांत वर्णनें आहेत, यास्तव विद्येपासून सदाचरणाची बुद्धि होईल किंवा दुराचरणाची होईल याचा सूज्ञ पुरुषांनीं विचार करून पहावा, ह्मणजे आमचें लिहिणें सप्रमाण आहे किंवा अप्रमाण आहे, हें त्यांच्या लक्षांत येईल. सारांश सर्व जातीच्या लोकांनीं आपल्या मुलींस लहानपणीं विद्या शिकवावी, आणि घरांतील कामकाज हि शिकवावें, म्हणजे त्यास परमेश्वराचें ज्ञान होऊन त्यांच्या जन्माचें सार्थक होईल. ही गोष्ट सर्वांचे मनांत ठसावी ह्मणून आम्ही दयाळू परमेश्वराची सर्वदा प्रार्थना करीत आहों.

पांचवी चाल अशी आहे कीं, कितीएक गृहस्थ आपण जरी गरीब असले तरी आपली मुलगी मातबराचे घरीं देण्याचा प्रयत्न करितात. त्यापासून अनेक प्रकारचीं संकटें प्राप्त होतात. तीं अशी कीं लग्नाच्यासमयीं नवऱ्यामुलास हुंडा द्यावा लागतो. आणि विहिण व व्याही वगैरे सोयरे लोकांचें चित्त प्रसन्न ठेवण्याकरितां

उंची वस्त्रें आणि नानाप्रकारचे अलंकार द्यावे लागतात. याशिवाय इतर फारच खर्च होतो, तेणेंकरून मुलीच्या बापास फार कर्ज होऊन जन्मभर दुःख भोगावें लागतें; आणि मुलीसही सासू, सासरा, नवरा, हीं सर्व मिळून गरिबाची मूल म्हणून फार इजा देतात. यास्तव सर्व लोकांनीं आपले बरोबरीचा गृहस्थ पाहून आणि आपले संग्रहास द्रव्य किती आहे याचा विचार करून आपल्या मुलीचें लग्न करावें ह्मणजे याप्रकारचीं संकटें कदापि प्राप्त होणार नाहींत, आणि मुलीसही दुःख भोगावें लागतें तें लागणार नाहीं.

* * * *

ज्या ठिकाणीं लग्न करावयाचें त्या ठिकाणीं हजारों रुपये खर्चून मोठा मंडप घालितात. आणि शेकडों ताशाचे जोड, व वाजंत्र्यांचे जोड आठ पंधरा दिवसपर्यंत चाकरीस ठेवितात, आणि तीं सर्व वाद्यें जेव्हां एकदम वाजूं लागतात, तेव्हां मोठा भयंकर शब्द उत्पन्न होऊन आसपासच्या लोकांचीं अंतःकरणें त्रास पावतात, आणि मार्गानें जाणाऱ्या लोकांचे बसावयाचे घोडे, आणि गाड्याचे घोडे बुजतात, तेणेंकरून कितीएक खालीं पडतात व कितीएकांच्या गाड्या उलथून पडतात, त्या संकटापासून त्यांचा कदाचित् प्राण ही जातो. ही गोष्ट आम्ही आपल्या डोळ्यानीं प्रत्यक्ष पाहिली आहे. ही अनर्थाची गोष्ट मुंबई शहरांतील रस्त्यांत न घडावी म्हणून सांप्रतच्या दयाळू सरकारनें पोलिसच्या शिपायांकडून बंदोबस्त केला आहे, तरी लोक युक्तिप्रयुक्तीनें आपलें काम सिद्धास नेतात, असो.

लग्नाच्या समारंभास कळवंतिणीचा नाच तर अवश्य करावा लागतो, आणि लग्नाच्या समाप्तीस वरघोडा काढितात, हा समारंभही अगत्य झाला पाहिजे. जेव्हां वरघोडा निघतो, त्या वेळेस ते लोक किती निष्कारण खर्च करितात तो आमच्यानें लिहवत नाहीं. परंतु ज्यासमयीं वरघोडा रस्त्यानें जाऊं लागतो त्यासमयीं मुलाचे आणि मुलीचे आईबापांस असा आनंद होतो कीं आज आम्ही कृतकृत्य झालों; सांप्रतकाळीं आह्मासारिखा कोणी च समर्थ नसेल. अशा अभिमानानें एकमेकांच्या चढास लागून फारच खर्च करितात; त्यापासून कितीएकांचीं दिवाळीं निघतात. यास्तव सर्वांनीं विचार करून ही व्यर्थ खर्च करण्याची चाल टाकावी म्हणजे त्यांचें कल्याण होईल, आणि सूज्ञ पुरुषांचे मनास ही गोष्ट पाहून फारच दुःख होतें तें होणार नाहीं, आणि लोकही निंदा करणार नाहींत, आणि असा निष्कारण खर्च करावा त्यापेक्षां जर तें द्रव्य शिलकेस राहिलें तर त्यांच्याच

संसाराचे कामास किंवा त्यांच्या पुत्रांस उपयोगीं पडेल. याजकरितां सर्वांनीं विचार करून या प्रकारचा फुकट खर्च करूं नये, ह्मणजे त्यांस लग्नासंबंधीं संकटें कदापि प्राप्त होणार नाहींत.

सातवी चाल अशी आहे कीं किती एक मुलांच्या आईबापानीं लहानपणीं लग्नें केलीं नसल्यास ते मुलगे मोठे झाले म्हणजे लग्नाकरितां फार घाबरे होतात, आणि आपली योग्यता काय आणि आपली प्राप्ती किती आणि खर्च काय आणि संग्रहीं द्रव्य किती आहे याचा विचार न करितां सावकाराकडून कर्ज घेऊन लग्नें करितात. तेणेंकरून मोठ्या संकटांत पडतात. कदाचित् त्या संकटांपासून कितीएकांचा प्राणही जातो.

याविषयीं उदाहरण. रत्नागिरी जिल्ह्यांत एक गृहस्थ राहत होता. त्याला चाकरी नव्हती, ह्मणून तो एके साहेबाचे फार आर्जव करीत असे, त्याजवरून त्या साहेबास दया येऊन त्या गृहस्थास सोलापूरास शहरांतील कोतवालीची जागा देवविली. नंतर तो गृहस्थ तेथील कामकाज कितीएक दिवस चालवीत होता, परंतु त्याचें लहानपणीं आईबापानीं लग्न केलें नव्हतें, म्हणून त्याचा जीव फार उदास असे. कितीएक दिवसांनीं तेथील सावकार लोकांशीं मित्रत्व करून, चार हजार रुपये त्यांजकडून लग्नाकरितां कर्ज घेतलें, आणि दोन महिन्याची रजा घेऊन मोठ्या प्रतिष्ठेनें लग्न करून तो पुनः सोलापुरास आला, आणि आपलें कामकाज चालवूं लागला. कांहीं दिवसांनीं सावकारलोक रुपयांविषयीं तगादा करूं लागले, परंतु त्याचेजवळ पैका नाहीं, तेव्हां तें सांगतील त्याप्रमाणें अवश्य केलें पाहिजे, नाहीं तर ते लोक आपली अब्रू घेतील. असें समजून त्या लोकांच्या बोलण्याप्रमाणें त्यांच्या कामकाजासाठीं कितीएक मुकर्दम्यांत गैर इनसाफानें तरफदारी करून इतर लोकांचें बहुत नुकसान करूं लागला. तेव्हां ही अन्यायाची गोष्ट किती दिवस छपून राहिली. चार पांच महिन्यांनी सरकारास समजल्यावरून तो चाकरींतून दूर झाला. या रीतीनें या गृहस्थाची अब्रू गेली, म्हणून शर्मिंदा होऊन आपले घरीं गेल्यावर आई, बाप बायको, वगैरे अन्नवस्त्र मागूं लागलीं. परंतु तो कोठून देईल, जवळ पैका होता तो सर्व खर्च झाला तेव्हां घरांत रहावें तर निरंतर कलह आणि दुःख,आणि बाहेर जावें तर लोक निंदा करितात, दुसरेकडे कोठें तरी चाकरी करावी तर कोणी ठेवीना. या रीतीनें अनेक प्रकारच्या संकटांमुळें

दुःख भोगून पश्चात्ताप पावून कितीएक महिन्यानी घरांत आजारी पडला, तेणें-करून शरीर शुष्क होऊन तो मरण पावला.

## सारांश.

परमेश्वरानें मनुष्यमात्रास पशूपेक्षां ज्ञानानें श्रेष्ठ केलें आहे असें असतां, सर्व मनुष्यें अज्ञानांत शिरून दुराचरण करूं लागतात, तेणेंकरून त्यांचें अकल्याण फार होतें. पाहा पाहा, या गृहस्थानें आपली प्राप्ती पाहून थोडक्यांत खर्च करून लग्न केलें असतें तर तो या प्रकारचा संकटांत कदापि पडला नसता आपल्या सामर्थ्यापेक्षां दुसऱ्याचें कर्ज घेऊन खर्च करावा आणि थोरपणा मिरवावा यांत फळ काय?

लोक निंदा मात्र करितात आणि करणारास हजारों संकटें प्राप्त होतात. यास्तव सर्वांनीं ही कथा ऐकून सावध रहावें आणि आपली योग्यता, सामर्थ्य, पाहून पुढें आपलें आणि आपल्या पुत्राचें कसें चालेल याचा विचार करून लग्न करावें म्हणजे त्यास या प्रकारचीं संकटें कदापि प्राप्त होणार नाहींत. एका दिवसांत हजारों रुपये उडवावे आणि पुढील विचार न करावा हें केवळ मूर्खपणाचें काम आहे.

विद्योपक्रमाचा ग्रंथ--**महादेव मोरोजी व नाना मोरोजी.**

इ. स. १८४६

---

## १५ [ मद्यपानबंदीविषयीं सरकारास अर्जी. ]

रैट ऑनराबल लार्ड वैकोट फाकलंड गव्हर्नर आंड् प्रेसिडंत इन कौन्सिल यांस खालीं सही करणारे मुंबईतील रहिवासी लोक यांच्या अर्जीचीं कलमें बितपसील.

१ इंग्लिश लोकांचें राज्य माहाराष्ट्र देशांत झाल्यापूर्वी या देशांतील लोक मद्यपान फार करून करीत नसत. परंतु इंग्लिश राज्य झाल्यापासून उत्तरोत्तर फार लोक मद्यपान करूं लागले, आणि आतां तर या मद्यपानाची वृद्धि फारच होत चालली आहे. ज्या ठिकाणीं पूर्वी कलालांचीं दुकानें अगदींच नव्हतीं,

त्याठिकाणीं आतां वर्षोवर्षं अधिक अधिक होत चाललीं आहेत. आणि पुढें लाहान लाहान गांवांतहि कलालांची दुकानें होऊन बहुत लोक दारूबाज होतील असें भय वाटतें

२ मादक पदार्थ या देशांतील लोकांस कांहीं उपयोगाचा किंवा अगत्याचा नाहीं, असें सर्वांच्या अनुभवास येतें. ज्या जातींमध्यें लोक शक्तिमान बुद्धिमान, द्रव्यवान, आणि वजनदार आहेत त्यानी आजपर्यंत कधींहि मद्यपान केलेलें नाहीं.

३ तर कलालांची दुकानें आणि दारूच्या भट्टया कोणत्याहि प्रकारें लोकांस हितकारक नाहींत, परंतु सर्वत्र नाशकारक आहेत आणि त्यावरून रोग, दरिद्र, अपराध, अशा सर्व प्रकारच्या विपत्ती नेहमी होतात. आणि त्यांवरून जे अनर्थ होतात ते फारच आहेत, आणि सर्वत्र व्यापले आहेत. त्यांवरून कांहींच उपयोग होत नाहीं. आणि कुटुंबांतील सर्व माणसें पूर्वी सुखी असतात; परंतु दारूची संवय लागल्यावरून त्यांच्या सुखाचा नाश होऊन परस्परांमध्यें कज्जा, भांडण माराहाण इत्यादिक होत जातात. पूर्वी बायको लेंकरें आनंदित असतात, परंतु पुढें अन्नवस्त्र देखील मिळत नाहीं. पूर्वी जो मनुष्य कामासू आणि सदाचरणी असतो तो पुढें दरिद्री होऊन सर्वांचें अनहित करतो.

४ सरकारच्या अनुमतानें कलाल दारूचीं दुकानें घालतात, हा तर सर्व वजनदार लोकांच्या दिसण्यांत सरकारला मोठा कलंक आहे. अशा विपत्तिकारक आणि भ्रष्टकारक व्यापारावरून जो नफा मिळतो त्यांतून सरकारला भाग मिळतो, असें सर्व लोक समजतात. कलाललोकांपासून सरकार कर घेतें यावरून सर्व रयतेचें दुःख आणि विपत्ती यांविषयीं सरकार कांहीं काळजी करीत नाहीं असें लोकास दिसतें. सरकार आपणांस नफा व्हावा याच कारणानें कलालांचीं दुकानें घालण्याविषयीं मोकळीक देतें; देशाच्या कल्याणाकडे लक्ष्य देत नाहीं, केवळ लोभावर नजर देऊन जेणेंकरून रयतेचा नाश आणि खराबी होती अशा गोष्टी खुशीनें चालू देतें. तर सरकाराविषयीं असें लोकानीं समजावें हें बरें नाहीं. आणि असा समज नाहींसा व्हावा ही गोष्ट अगत्याची आहे. परंतु जोंपर्यंत सरकार दारूचीं दुकानें घालण्याविषयीं मोकळीक देऊन त्यांपासून कर घेईल तोंपर्यंत हा समज नाहींसा होणार नाहीं.

५ या भरतखंडांत इंग्लिश लोकांचें राज्य झाल्यापासून जेथें जेथें या इंग्लिश लोकांचें राज्य झालें तेथें कलालांचीं दुकानें फारच अधिक अधिक होऊन दारू पिण्याविषयीं मोकळीक झाली, आणि अडथळाहि नाहींसा झाला. आणि पहिल्यापेक्षां दारूच्या दुकानांवरील सरकारची प्राप्ति पुष्कळपट वाढली, असें आमच्या समजण्यांत आलें आहे. आणि या भरतखंडांत इंग्लिश राज्य खेरीज करून इतर राज्यांत इतके लोक दारू पीत नाहींत. तर इंग्लिश सरकाराकडे असा दोष आहे असें मनांत आणून या तुमच्या अर्जदार लोकांस विशेष खेद वाटतो. जें कांहीं हें सरकार लोकांचें हित करतें तें या गोष्टीवरून कमती होतें; परंतु आम्हांस अशी आशा आहे कीं, ही लाजीरवाणी गोष्ट अगदीं नाहींशी होईल.

६ दारूचा व्यापार नाशकारक आहे असें कलाल लोकहि कबूल करितात. परंतु याचा दोष सरकाराकडे आहे, असें तें म्हणतात. कोणी लोकांनीं त्यांचा निषेध करून असें करूं नये म्हणून सांगितलें असतां ते म्हणतात कीं, “ सरकारकडे जा. आम्हांला सरकारचा हुकूम आहे. याचें उत्पन्न जें होतें तें सरकारचें आहे, आम्ही केवळ सरकारचे चाकर आहों. ” आणि त्यांस सरकाराची परमानगी आहे म्हणून ते असला नाशकारक व्यापार करितात, आणि त्याच्या उत्पन्नाचा भाग सरकार घेतें म्हणून ते सगळा दोष सरकारच्या माथ्यावर घालतात.

७ जर हा व्यापार बंद करण्याविषयीं चांगला उपाय केला नाहीं तर गोरे लोकांमध्यें दारू पिण्यावरून जसा नाश झाला त्यापेक्षां या देशांतील लोकांमध्यें अधिक नाश होईल, असें समजण्यास चांगला आधार आहे. जसे गोरे लोक असतात तसे हिंदू लोक सदृढ नाहींत, यामुळें त्यांवर दारूचा अंमल लौकर बसतो. फार करून जसे गोरे लोक आपलें मन स्वाधीन ठेवितात तसे हिंदुलोकांस स्वाधीन ठेवतां येत नाहीं. आपल्या वासनेप्रमाणें जसें पाहिजे तसें करितात. यामुळें ते लोक दारूच्या अंमलांत लवकर निमग्न होतात. जे कोणी हिंदु दारू पितात ते दुसऱ्या लोकापेक्षां विशेषेंकरून नाशाच्या मार्गांत चालतात. म्हणून दारू पिण्याची सोय आणि मोह नाहींसे झाले पाहिजेत.

८ या देशांत मद्यपान बंद व्हावें म्हणून कलालांचीं दुकानें सरकारानें बंद केलीं पाहिजेत. फार करून सर्व लोकांस असें वाटतें कीं, कलालांचीं दुकानें बंद करणें हें सरकारचें काम आहे, आणि तीं दुकानें सरकारानें बंद करावी म्हणून

वाट पाहातात. लोकांची सुधारणूक व्हावी आणि सर्व अनर्थ नाहींसे व्हावे म्हणून ते आपण प्रयत्न करीत नाहींत, परंतु सरकारानें करावे असें त्यांस वाटतें.

९ जोंपर्यंत या व्यापाराला सरकार परवानगी देतं आणि त्यापासून कर घेतें, आणि जास्ती व्यापारावरून सरकारचा फायदा आहे तोंपर्यंत हीं दुकानें बंद करण्याविषयीं आपले प्रयत्न व्यर्थ आहेत, असें हिंदुलोक समजतात. आपलें कांहीं चालणार नाहीं असें समजून सरकाराविरुद्ध कांहीं गोष्ट करावी याविषयीं ते धजत नाहींत.

१० दारूचा व्यापार जर सरकारानें अगदीं बंद केला तर सर्व वजनदार लोकांस हा सरकारानें मोठा उपकार केला असें वाटेल. हा व्यापार बंद केला असतां ही गोष्ट धर्मविरुद्ध ाहे असें कोणाला वाटणार नाहीं, परंतु नीति आणि सदाचाराविषयीं सरकारची चांगली दक्षता आहे असें सर्वांस वाटेल. आणि दारू पिण्यावरून जे अनर्थ हो े र करतें असें वाटून सरकारची स्तुति करतील.

११ दारूच्या भट्या आणि दुकानें बंद करण्याविषयीं जर सरकार सक्त उपाय करील तर लोकांच्या सुधारणुकीविषयीं जे प्रयत्न करितात त्यांस साह्य होईल, आणि दारू विकण्याविषयीं जी निमित्तें कलाल सांगतात तीं नाहींशी होतील, आणि हा नाशकारक व्यापार कायद्याविरुद्ध आणि बेअब्रूचा आहे असें सर्व लोक समजतील. असें केलें असतां जरी सर्व प्रकारें सरकारचा उपाय साधत नाहीं तरी सर्व लोकांच्या मताला अनुसरल्यासारखें होईल. आणि सदाचरणाविषयीं सरकार काळजी बाळगतें आणि रयतेवर उपकार करून रक्षण करतें असें दिसून येईल. आणि हें सरकार रयतेस आतांपेक्षां अधिक प्रीतिपात्र आणि भरंवसा ठेवण्याजोगें होईल.

१२ कितीएक देशांत लोकांच्या भयामुळें दारूचा व्यापार बंद करण्यास सर्काराला कठीण आणि असाध्य आहे, परंतु एथें वेगळी गोष्ट आहे. पूर्वीं जसें पेशवाई सरकारानें याविषयीं बंदी केली होती तीं सर्वांस बरी वाटली. त्याप्रमाणेंच या सरकारांतूनहि व्हावी असें आम्ही इच्छितों. असें करण्याविषयीं सर्व प्रतिष्ठित हिंदु आणि मुसलमान लोक मदत करतील. म्हणून विशेषेंकरून अगत्यानें या अर्जीप्रमाणें सरकारानें करावें.

१३ जसजसें लोक अधिक मद्यपान करूं लागतात, तसतसें त्यांस हा व्यापार असावा असें वाटेल आणि बंद करण्याविषयीं सरकारची शक्ति वर्षोंवर्ष कमती होत जाईल. आणि बंद करण्याविषयीं जितका उशीर लागेल तितकें अधिक कठीण पडेल, आणि सरकार हा व्यापार बंद करील अशी आशा कमती होती.

१४ लोकांमध्यें मद्यपानाच्या वृद्धीविषयीं सरकारला खेद वाटत असेल अशी तुमच्या अर्जदारांची खात्री आहे. आणि केवळ दारूवरच्या कराकरितां लोक दरिद्री आणि दुष्ट व्हावे असें सरकारच्या मनांत नसेल अशी आमची खात्री आहे. कोठें कोठें कलालांचीं दुकानें अधिक करण्याकडून कर वाढवूं नये नाहींत परंतु त्यापेक्षां हा व्यापक अनर्थ कमी करण्याकरितां कर बुडेल तरी चिंता नाहीं, असा आपल्या कामगारास सरकारानें हुकूम दिला आहे असें आम्ही ऐकतों. तथापि जोंपर्यंत दारूचा मक्ता देण्याची रीत बंद होत नाहीं तोंपर्यंत ज्या हुकमावरून आम्हांला आनंद वाटतो तो व्यर्थ आहे.

१५ या सर्व देशामध्यें कलालांचीं दुकानें बंद झालीं असतां सर्व सूज्ञ लोकांस बरें वाटेल आणि लोकांच्या हिताकरतां बंद करण्याविषयीं सक्त उपाय केलाच पाहिजे असें आम्हास वाटतें. मुंबई, सुरत, पुणें, इत्यादिक मोठ्या शहरांमध्यें आणि छावणीमध्यें अगदीं बंद करणें अशक्य आहे असें कोणाकोणास वाटत असेल, परंतु त्या ठिकाणीं फार कमी करावी हें साध्य आणि अगत्याचें आहे याविषयीं कोणाला संशय वाटत नसेल.

या सर्व हेतूनीं लोकांचें कल्याण पाहून आणि सरकारच्या कीर्तिविषयीं काळजी बाळगून आम्ही विनंति करतों कीं, सरकारानें आपल्या शक्तीप्रमाणें लोकांनीं दारूबाज होऊं नये म्हणून उपाय करावा. हा अनर्थ फारच मोठा झाला आहे, आणि वृद्धिंगत होत चालला आहे, तो बंद करण्याविषयीं त्वरित आणि जोरानें उपाय केला पाहिजे. सरकारानें असें केलें असतां सर्व देशांतील लोकांस आनंद वाटेल. विशेषेंकरून लोकांचें कल्याण पहाणारे आणि धर्मशील लोक फारच हर्ष पावतील. आणि जे लोक तुमच्या ताब्यांत आहेत त्यांतून लक्षावधी लोक दारूचें सेवन, लाज आणि नाश यांपासून राखले जातील. सारांश सदरहू गोष्टीविषयीं सरकार विचार करून बंदोबस्त करील आणि या अघोर व्यापारापासून लोकांचें रक्षण करील अशी तुमचे अर्जदार आशा धरितात.

सदर्हू अर्जीवर कित्येक साहेब लोकांनी व एतद्देशीय लोकांनीं आपल्या सह्या घातल्या आहेत व आणखी पुष्कळ सह्या घालतील यांत संशय नाहीं. या अर्जी-प्रमाणें पेशव्याच्या अंमलांत दारूविषयीं बंदोबस्त होता, आणि जर त्याचप्रमाणें हल्लींचें सरकार करील तर हिंदु, जैन, मुसलमान, यांतल्या अब्रुदारांस व परोपकारी साहेब लोकांसहि फार आनंद वाटेल. परंतु लोकांनीं अर्जीवर सही देऊन आपली इच्छा कशी आहे हें कळवावें; नाहीं तर सरकाराला दारूच्या सात्राविषयीं कसें समजेल? हल्लीं सुरतेंतील लोक या सदर्हू अर्जीप्रमाणें एक गुजराथी अर्जी तयार करून आपापल्या सह्या घालतात, व पुण्यांतील लोकहि तसेच अर्जी करितात असें ऐकतों.

---

( सदर अर्जीसंबंधीं ज्ञानोदयाचा संपादकीय लेख )

## मद्यपानसंबंधीं अनर्थ वृद्धिंगत होत आहे याविषयीं सरकारासीं अर्जी.

हल्लीं दारूच्या अनर्थाविषयीं सरकाराला एक अर्जी तयार केली आहे आणि तिजवर पुष्कळ लोक सह्या देतात. या अर्जींतील सर्व गोष्टी वास्तविक आहेत आणि त्याप्रमाणें सरकारनें अवश्य करावें असें समजून ती आम्ही आनंदानें छापितों. तर ही गोष्ट एतद्देशीय सर्व सूज्ञांस आवडेल, आणि त्या सर्वांनीं याविषयीं बराबर समजून हा दारूचा अनर्थ बंद करायास झटावें म्हणून ती इंग्लिश, मराठी, गुजराथी आणि मुसलमानी या चार लिपींत छापून प्रसिद्ध करितों.

इंग्लंड वगैरे देशांत दारूच्या योगानें पुष्कळांचा नाश झाला. सर्व कबुल आहेत कीं इंग्लंडांतलि अपराध, दरिद्रपण इत्यादि हालांचे तीन-चतुर्थांश दारूच्या योगानें आहेत. तेव्हां एथें तर त्यापासून किती अनर्थ होतील? कारण तेथल्यापेक्षां एथच्या लोकांला शक्ति, विद्या इत्यादि कमती आहेत. एथें मूर्ख व हलक्या जातीचे लोक पुष्कळ आहेत आणि ते दारूचें सेवन करूं लागले असतां किती भयंकर नाश होईल?

महाराष्ट्र देशांतील मुसलमान लोक व जैन लोक व चांगल्या जातीचे हिंदु या सर्वांस दारूचा निषेध आहे, आणि सर्व अब्रुदारांस या दुर्व्यसनांचा कंटाळा वाटला म्हणून येथें या अनर्थाचा प्रतिबंध चांगला होता. परंतु मुसलमान, मराठे,

इत्यादि बहुत लोक दारू पिऊं लागले आणि दारूचीं दुकानें सर्वत्र घातलीं असतां उत्तरोत्तर अधिक लोक पिणारे होऊन भयंकर नाश होईल. मोठ्या शहरांत तर हल्लींच हा अनर्थ चालू झाला आहे व तो दिवसानुदिवस वाढत आहे.

सर्कारानें सर्व चांगलीं कामें करावीं असें आमचें म्हणणें नाहीं लोकांनींच स्वतः खर्च व मेहनत करून चांगलीं कामें करावीं हें अधिक बरें आहे. परंतु सोडत, व इतर जुगार, कित्येक दुष्ट कर्में बंद करावीं हा सरकारचा धर्म आहे. तसेंच जर रामोसी, भिल्ल, गांवोगांवीं लुटीत फिरतात तर त्यांस शिक्षा करून रयतेचा बंदोबस्त करणें सरकाराला अवश्य आहे. परंतु जे मक्त्यानें सर्व गांवोगावीं दारूचीं दुकानें घालितात ते भिल्ल व रामोसी यांपेक्षां रयतेचे शत्रु आहेत. भिल्ल व रामोसी केवळ द्रव्य लुटतात. हे तर द्रव्य, अब्रू, शरीर इत्यादि सर्वस्व लुटतात आणि सर्वप्रकारें गावांचा बिघाड होतो. तर असल्या अ र्थकारकांस सरकारनें अनुकूल न होतां त्यांचें काम अवश्य बंद केलें पाहिजे, हें तर उघड आहे. असलीं दुकानें आपल्या गांवांत त्यांनीं येऊन घालावीं असी कोणाची इच्छा आहे? कदाचित हलक्या व फार भ्रष्ट लोकांस बरें वाटेल, परंतु कोणत्या हि सुज्ञास बरें वाटणार नाहीं. उलटें त्या सर्वांस फार वाईट वाटतें, आणि सरकारचें भय नसतें तर असल्यांस, लुटारू असें जाणून ते गांवांतून घालवूनच देते. परंतु त्या लोकांस सरकारची परमानगी मिळती त्यामुळें उपाय नाहीं. ते प्रथम दारू दुष्टांस थोडीथोडी विकतात आणि दिवसानुदिवस मग त्यांचा व्यापार वाढतो आणि तसें झालें म्हणजे गांवांत तंटे, मारामारी इत्यादि खुब चालतात. जे पूर्वीं सूज्ञ तेहि दारूमुळें भ्रष्ट होतात आणि जे त्यांत मिळत नाहींत त्यांस त्या छाकड्यांपासून त्रास घडतो व नुकसानहि होतें, तर असल्या रीतीनें या सर्व महाराष्ट्र देशांत हें दुर्व्यसन वाढत आहे, आणि जर ह्याची प्रतिबंदी होत नाहीं तर त्या द्वारें सर्व प्रांतोप्रांतीं अनर्थ होईल. उत्तरोत्तर लहान व मोठे दारूच्या अंमलांत सांपडून हालांत पडतील आणि असें झालें असतां मग कोणता बरें उपाय चालेल? तेव्हां सरकारचा दखील उपाय चालणार नाहीं, व सर्वांचें कल्याण पाहाणारे लोक निराश होऊन रडतील व हायहाय करतील. तर सूज्ञांनीं अवश्य आपल्या संततीच्या व इतर सर्वांच्या कल्याणाविषयीं काळजी धरून हा अनर्थ बंद करण्याकरितां सरकाराला अर्जी करावी व सर्व प्रकारें त्याची बंदी होण्यास हात लावावा.

ज्ञानोदय १ फेब्रु. १८५०



---

## १६ कप्तान कूक याचा वृत्तांत ( पृष्ठ १४९ )

रामचंद्रः—ह्या शोककारक जलाटनाच्या अखेरीस ज्या गोष्टी घडल्या, त्यांचा संक्षिप्त वृत्तांत म्यां तयार केला आहे, तो संध्याकाळीं उठण्याच्या पूर्वी वाचावयास आज्ञा असली तर मी वाचीन.

कृष्णाचार्यः—मी ही कप्तान् कूक ह्याचा स्वभाव, बुद्धि आणि वर्तणूक ह्यांविषयीं थोडेंसें बोलतों

त्याची चाल निष्कपट, साधी आणि प्रौढ अशी होती. तिजमध्यें उत्तम भर्तृत्व, पितृत्व आणि अकृत्रिम व दृढ असें मित्रत्व हे गुण होते. त्याचा स्वभाव फार परोपकारी व दयाळू होता, हें सर्व जलप्रवासांत त्यानें आपल्या लोकांबरोबर जी वर्तणूक केली तिजवरून व त्यानें शोधून काढिलेल्या सर्व देशांतील लोकांशीं तो ज्या रीतीनें चालला तिजवरून स्पष्ट ध्यानांत येतें.हाताखालच्या लोकांचें आरोग्य, सोय आणि त्यांस होईल तितका सुखोपभोग ह्यांकडेस निरंतर त्याचें लक्ष होतें व अनेक बेटें व ठिकाणें त्यानें पाहिलीं. तेथील लोकांच्या स्थितीची सुधारणूक करण्याविषयीं तो नेहमीं उत्सुक होता, त्यांच्या चोऱ्यांचे अपराध तो मोकळे मनानें क्षमा करीत होता आणि ज्याकरितां इतरांनीं शिक्षाच केली असती, तसल्या बहुत अन्यायांकडेस त्यानें अलक्ष्य केलें आणि एखादें तीक्ष्णतेचें कर्म करायाचें अगत्य पडलें असतांहि त्यानें तें मनापासून व निर्दयपणानें कधींच केलें नाहीं.

त्याचें बुद्धिवैभव फार उपयोगी जातीचें होतें, ही गोष्ट निर्विवाद आहे. त्याचें अंतःकरण फार विस्तीर्ण व सूक्ष्म होतें व त्याप्रमाणें त्याचे सर्व बेत धैर्याचे व विस्तृत होते. हे बेत ठरले म्हणजे त्यांच्या सिद्धीविषयीं त्यास कधीं संशय आला नाहीं. ज्या असंदिग्ध व व्यवस्थित विचारांच्या योगें तो जे बेत ठरवीत असे, त्याच विचारांच्या बळानें ते बेत पार पाडण्याविषयींची फार सोपी व गुणावह अशी युक्ति काढण्यास तो समर्थ होता. आपलीं कामें पार पाडण्याविषयीं ही तो तसाच विख्यात होता, कोणत्याही अवघड गोष्टीमुळें तो गोंधळांत पडला नाहीं व कोणत्याही संकटांत तो भय पावला नाहीं. त्याची बुद्धि व ज्ञान हीं गरजेच्या वेळेस सर्वदा केवळ त्याच्या स्वाधीन असत. मोठाल्या कामाविषयीं तो

शरीरबळानें हा योग्य होता. त्यास मेहेनत करायाची संवई पडून गेली होती, त्यामुळें अतिशय श्रम व कष्ट भोगण्याचें त्यास सामर्थ्य होतें. नौकागमनविद्येचें त्यास पूर्ण ज्ञान असून दुसऱ्याही विद्यंत त्याचा परिचय होता. ह्याविषयीं फार थोड्या अभ्यासामुळें ज्या गोष्टी प्रतिकूळ होत्या, त्या त्याच्या अंतःकरणाच्या उत्साहामुळें दूर झाल्या होत्या. गणिताच्या भिन्न भिन्न शाखा व विशेषें करून ज्योतिषविद्या ह्यांमध्यें त्याचा इतका चांगला अभ्यास झाला होता कीं, जलप्रवास करीत असतां शेवटीं त्या विद्येसंबंधीं जरूरीचें काम मुख्यत्वें करायास तो समर्थ होता. तसेंच साधारण विद्या व ग्रंथरचना ह्यांमध्यें तो इतका प्रवीण झाला होता कीं, प्रौढ, सुबोध व शुद्ध अशा रीतीनें लिहायाचें त्यास सामर्थ्य येऊन स्वतां मोठालीं कृत्यें करून त्यांच वणन ही लिहून ठेवणारा, अशी कीर्ति मिळविण्याजोगा तो झाला.

रामचंद्रः—दीघ प्रयत्न हा एक त्याच्या स्वभावांत विलक्षण गुण होता. त्याच्या योगें, त्यानें ज्या उदार कामांत जन्म घालविला, तीं कामें पूर्ण केलीं. त्या दीर्घ प्रयत्नाविषयीं त्याची बरोबरी क्वचित् एखाद्यानें केली असेल. पण त्याहून अधिक कधीं कोणी झाला नाहीं. ज्या कार्याकडेस त्याचें लक्ष लागलें त्यापासून कशाच्यानेंही तें विमुख झाल नाहीं व ज्या अडचणीच्या व विघ्नांच्या योगें मोठ्या समर्थ व दृढ अशा हृदयाच्या पुरुषांस ही मागें सरावें लागलें असतें, त्या अडचणी आणि विघ्नें हीं सोसूनही तो कार्य करणें निग्रहानें चालवीत असे.

यमुनाः—कप्तान कूक ह्याच्या शरीराचें वर्णन कसें केलें आहे ?

आनंदरावः—साधारण आकृतीपेक्षां त्याचें शरीर कांहींसें उंच होतें व जरी तो देखणा होता तरी बोलण्यांत व डौलांत साधाच होता. त्याचें डोकें लहान होतें व केंस पिंगट होते, ते तो मागें बांधीत असे, त्याचें मुख हृद्गतसूचक होतें; नाकाची आकृति फार उत्कृष्ट होती. त्याचे डोळे लहान उदी रंगाचे छायेचे, चंचळ व तीक्ष्ण असे होत व भिंवया उंच होत्या. त्यायोगानें त्याचा चेहरा अगदीं करडा दिसत होता.

रखमाबाईः—कप्तान कूक ह्यानें जीं कामें बजाविलीं, त्यांच्या योगानें प्राचीन आणि नवीन अशा सर्व नौकागमनकर्त्यांपेक्षां ह्याचा नांवलौकिक फार झाला.

कृष्णाचार्यः—होय बाई, त्याच्या देशांतच केवळ त्याच्या नांवास पराकाष्ठेचा मान देतात असें नाहीं, तर इतर सर्व देशांत ही देतात व कितीएक परदेशीय लोकांनीं अनेक प्रकारचे आदरसन्मान त्याच्या स्मरणार्थ केले आहेत.

यमुनाः—पतित्व आणि पितृत्व हे धर्म त्याच्यांत उत्कृष्ट होते, असें कृष्णाचार्य बोलिले; तेव्हां त्याच्या कुटुंबांत कोण कोण माणसें होतीं बरें ! तो मरण पावल्यावर त्यांस कांहीं नेमणूक करून दिली असेल असें मला वाटतें.

इ. स. १८५३ ( द. प्रै. क. पु. ) गणेशशास्त्री लेले--पृ. १४९-१५२.

---

## १७ देशव्यवहारव्यवस्था.

### प्रस्तावना.

गोपाळ या नामें करून कोणी एक स्वदेशहिताची इच्छा धरून गुरूस नम्रतेनें पुसतो. महाराज, सांप्रत कित्येक देश संपत्तिमान् होऊन नांदत आहेत, तसा हा देश भरतखंड आपली जन्मभूमी सुखानें नांदण्याविषयीं काय उपाय करावा. त्याजवरून गुरू बोलतात, देश सुखानें नांदूं लागणें यास संपत्ति कारण होय. ह्मणून संपत्तिविषयक जें शास्त्र, ज्यास देशव्यवहारव्यवस्था म्हणतात, तें पढावें ह्मणजे देश संपत्तिमान् होण्याचें साधन काय तें समजूं लागेल. अरे, ईश्वरानें हि सृष्टि केली आहे. एथें मनुष्यासारिखा बुध्यादिकेंकरून थोर प्राणी दुसरा कोणी नाहीं. याजवर उदार प्रभूनें अशी कृपा केली आहे कीं, यानें चांगला झटून उद्योग करीत जावा ह्मणजे फलप्राप्तीविषयीं संशय नाहीं. जसा उद्योग व्हावयाचा तसा झाला असतां दरिद्राचें राज्य कोठें राहील ? गोपाळ बोलतो. दरिद्र ह्मटलें असतां ती अमूर्त वस्तु असें असून जर दरिद्र राज्य करीत असलें तर मग ऐश्वर्यानें कां राज्य करूं नये. बरें हीं जर राज्यें करीत असलीं तर कोठें करीत असतील, तर यांचे प्रधानादिक कोण कोण इतकें थोडक्यांत च सांगावें.

गुरू सांगतात, तुझ्या प्रश्नाचें उत्तर सांगणें हें जसें काय देशव्यवहारव्यवस्थाशास्त्राचें सामान्यतः स्वरूप कथन करणें असें आहे. अरे, दरिद्र व ऐश्वर्य यांच्या लढाया, जय, पराजय- इत्यादि कोणा एका गृहस्थाच्याच घरीं होत आहेत असें नाहीं, तर हीं खटलीं गांवोंगांवीं, देशोदेशीं चाललीं आहेत. पूर्वी आपल्या भरत-

खंडांत ऐश्वर्याचें राज्य चाललें होतें, त्याकाळीं या देशाची चढती कळा होती-अलीकडे दरिद्र नांदूं लागल्यामुळें याची उतरती कळा पाहून तुझ्यासारिखे स्वदेश-हितेच्छु फार खिन्न होतात, असो. या एकएका राजाचे पदरीं पांच पांच प्रधान, एकएका प्रधानाचे तंत्रानें वागणारे पांच पांच सरदार, आणि प्रधान आणि सरदार यांच्या कृतीनें झालेले जे अनेक चित्रविचित्र आकार ते शिपाई समजावे. ऐश्वर्याचे प्रधान सांगतों.—

१ सुदेश, २ ज्ञान, ३ व्यवस्था, ४ सत्य, ५ व्यापार, १ सुदेशाखालीं. १ चांगलीं बंदरें इत्यादि, २ सुपीक भूमि, ३ धातु इत्यादि, ४ उत्तम वृक्षादि, ५ उपयोगी पश्वादि, २ ज्ञानाखालीं. १ शिल्प, २ व्यवहारोपयोगी विद्या, ३ भूगोलखगोल विद्या, ४ सिद्धपदार्थविज्ञान, ५ नौकागमनविद्या, ३ व्यवस्था-रूपप्रधानाखालीं राहणारे. १ मालाचें रक्षण, २ प्रजापालन. ३ नीति. ४ उद्योग ५ विद्याभ्यासंग. ० सत्याखालीं. १ प्रामाणिकपणा. २ ईश्वरभीति. ३ भूतदया. ४ उत्तम आचरण. ५ मितव्यय. ५ व्यापाराखालीं, १ स्वदेशपरदेशज्ञान, २ अनेकभाषाज्ञान. ३ लोकव्यवहारज्ञान. ४ उलींढालीं करण्याचा स्वभाव. ५ लक्षपूर्वक अवलोकन असे. २५ सरदार समजावे. आतां दरिद्राचे प्रधानादिक ऐक. १ कुदेश. २ अज्ञान. ३ अव्यवस्था. ४ असत्य. ५ अव्यापार. १ कुदेशा. खालीं १ गैरसोयीचीं बंदरें इत्यादि. २ खरतड जमीन ३ मृत्तिका पाषाण, ४ निरोपयोगी झाडें, ५ उपयोगी पश्वादिकांचा अभाव. २ अज्ञानाखालीं. १ शिल्पादिकांची अवगणना. २ शब्दपांडित्य. ३ नाच तमाशाची भरभर. ४ भविष्य सांगणारीं फलज्योतिषादिक. ५ कल्पित विधिनिषेध. ३ अव्यवस्था. १ परद्रव्यहरण. २ प्रजापीडन. ३ अनीति. ४ आळस. ५ ख्यालीखुशालीची हौस. ४ असत्याखालीं, १ वंचना, २ पिशाचभक्ति. ३ द्रोह. ४ कुकर्म. ५ उथळे-पणा ५ अव्यापाराखालीं, १ परदेशद्वेष, २ परगुणनिंदा. ३ कपट. ४ कुयुक्ति-व्यवहार. ५ दुर्व्यसनप्रीति.. असे २५ सरदार असतात. सैन्याविषयीं तर पूर्वीच सांगितलें आहे. हे राजे आपापली फौज घेऊन एकजण सुधारणूक आणि संपत्ति म्हणून ज्या दोघी बहिणी असून राजकन्या त्यांचा बचाव करितो, आणि एक-जण त्या कन्यांचा मोड करूं पहातो.

गोपाळ—एका राजाच्या समयीं लोकांत एकी, स्नेहभाव, स्वदेशाभिमान, कला, विद्या, व्यापार, अशीं प्रवृत्त होत असतील, आणि एकाच्यासमयीं सद्-

गुणांचा ऱ्हास होऊन विद्यादिकांची अनास्था, विषयभोग, असत्य, ज्ञातिवैषम्य, परस्परद्रोह हीं सर्वत्र प्रगट होत असतील. बरें, त्या दोन्हीं राजांचें समान बल असतां, तशांत या भरतखंडासारिखा देश जेथें भूम्यादिक, नदीसमुद्रादिक हीं कृषिशिल्पव्यापारादिकांस केवळ अनुकूल, व सांप्रतकाळींचे राज्यकर्त्ते तर सुधारणुकीचे मोठे साह्यकर्त्ते असें असतां दरिद्रास राज्य करायास कसें साधलें.

गुरू—ज्ञान, व्यवस्था, सत्य असे जे ऐश्वर्याचे प्रधान त्यांनीं एकनिष्ठेनें आपल्या स्वामीची सेवा करणें सोडून दिलें, अशा संधीस अज्ञानादि जे दरिद्राचे प्रधान त्यांचें साधलें; अर्थात ऐश्वर्याचा पराभव झाल्यासारिखें झालें. असो. पण जरी ऐश्वर्य पराजित राजासारिखें दोन दिवस लपून राहिलें होतें, तरी त्यानें आतां स्वराज्य घेण्याविषयीं कंबर बांधिली आहे. आणि जे जे प्रधान व जे जे शिल्पादि सरदार फितले होते तेही अनुकूल होऊं लागले आहेत, याच संधीस देशव्यवहारव्यवस्थासूचक असा त्वां प्रश्न केला. त्यास कृषि, शिल्प, व्यापार इत्यादिकांचा आश्रय करून देशव्यवहारव्यवस्थाशास्त्रांतलि युक्ति घेऊन दरिद्राचा उच्छेद करावा, म्हणजे ऐश्वर्य संपत्तिसहित या देशीं चिरकाळ नांदूं लागेल.

देशव्यवहारव्यवस्था—हरि केशवजी—१८५४

---

## १८ [महाराष्ट्रभाषा.]

इसवी सन १८१८ त हा महाराष्ट्र देश शहाण्या इंग्लिशसरकारच्या हातीं आल्यावर पुढें सात आठ वर्षांनीं त्यांणीं आपलें लक्ष इतर सहस्रावधि राजकीय विषयांत निमग्न असतां, आजपावेतों कोणत्याही सरकारनें ज्या कडेस विशेषेंकरून लक्ष दिलें नाहीं त्या देशभाषेकडेस, व एतद्देशीय लोकांत सद्विद्येचा प्रसार व्हावा या विचाराकडेस लाविलें; हें या सरकारचें उदार कृत्य परम स्तुत्यर्ह होय. या उद्देशानें सन १८२६ सांत "मुंबईची हैंद शाळा पुस्तक मंडळी" या नांवानें एक सभा स्थापित झाली. पुढें या सभेच्या कर्तृत्वाची बरीच घडामोड होऊन तिचें "मुंबईची शिक्षा मंडळी" या नांवानें रूपांतर झालें. पुढें हीं मंडळी मोडून, इचें काम सांप्रत, तत्स्थानापन्न सरकारनें स्थापित केलेली जी "बोर्ड आफ् एज्युकेशन" या नांवाची सभा, ती करीत आहे. पहिली सभा

स्थापून आज अठ्ठावीस वर्षें झालीं, इतक्या काळाच्या अवधींत व्हावे तितके जरी ग्रंथ झाले नाहींत, तरी या महाराष्ट्र भाषेंत कांहीं कांहीं उपयोगी विषयांवर बरेच ग्रंथ झाले आहेत. या देशांत पूर्वीपासून पद्यात्मक ग्रंथ लिहिण्याची चाल होती. सरकारी कामकाजाशिवाय गद्यात्मक लेख लिहिण्याची चाल अगदीं नव्हती. मराठ्यांच्या अमलांत मात्र कोणीं कोणीं बखरा लिहून ही चाल नुकतीच पाडली होती; परंतु तिचा प्रसार फार च थोडा तेव्हां ती होती नव्हती सारखीच म्हटल्यास चिंता नाहीं. महाराष्ट्र भाषेंत शुद्ध रीतीनें वाक्ययोजना करून रसभरीत असे पहिले ग्रंथ सदाशिव काशिनाथ छत्रे यांणी रचिले; म्हणोन यांस गद्यात्मक ग्रंथांचे जनक म्हटल्यास हि साजेल. याच काळीं कित्येक पंडितानीं मिळून एक महाराष्ट्र कोश केला हें एक मोठें उपयोगी काम झालें. यानंतर हरि केशवजी व बाळ गंगाधरशास्त्री याणीं हि सरकारी शाळांकरितां चार पांच ग्रंथ चांगले तयार केले, व यांशिवायहि लहान लहान असे पुष्कळ ग्रंथ तयार झाले आहेत व होताहेत. सन १८३६ त मीं आपलें महाराष्ट्र व्याकरण प्रसिद्ध केलें, त्याचा उद्देश व तें कोणत्या स्थितींत असतां रचिलें, याविषयीं कांहींशी सूचना त्याच व्याकरणाच्या प्रस्तावनेंत केली आहे, त्याची पुनरुक्ति येथें नको. अलिकडेस दर्पण व तदनंतर प्रभाकर हीं वर्तमानपत्रें निघाल्यापासून मोठा लाभ हा झाला कीं, त्याच्या द्वारें लोकांस ज्ञान होऊन एथील लोकांत मराठींत गद्यरूपानें लिहिण्याचा प्रचार चांगला वाढत चालला आहे. तेव्हां अशासमयीं व्याकरणद्वारानें भाषेचें नियमन करणें किती अवश्यक आहे हें सूज्ञ पुरुष जाणतच असतील. हाच हेतु मनांत धरून मीं ही दुसरी आवृत्ति सिद्ध केली. इचा मुख्य उद्देस हाच कीं, जितकें साधेल तितकें करून, आजपावेतों जिला नियमांत आणण्याविषयीं कोणीं प्रयत्नच केला नाहीं म्हणोन अत्यंत विस्कळित झालेली व व्याकरणरूप फणीनें जिला कोणीं विंचरलेंच नाहीं म्हणोन जींत अनेक ग्रंथि जमून फारच गुंतलेली, अशी जी ही मराठी भाषा, तिला कांहीं तरी नियमांत आणावी, आणि दीर्घकाळग्रथित जी तिची गुंत ती हातीं घेऊन तिचे पदर कांहीं सोडवून कांहीं तरी उकलण्याच्या धोरणांत आणून बसवावी. आतां हें कार्य मीं कसें व कोठपर्यंत सिद्धीस नेलें याचा विचार करणें सुज्ञाकडेस आहे.

ही महाराष्ट्र भाषा आजपावेतों नियमांत नव्हती, म्हणोन इचे प्रकारहि फार आढळतात. दहाबारा कोशांवर भाषा बदलत्ये, म्हणून जी लोकांची म्हण

आहे ती अक्षरशः खरी आहे, इतकेंच नाहीं परंतु जे भाषाभिज्ञ आहेत त्यांच्या ऐकण्यांत शब्दवैचित्र्यावरून, स्वरभेदावरून व जातिपरत्वेंहि निरनिराळे प्रकार येतात. कोंकणांतच या भाषेचे चार पांच प्रकार आढळतात, दमणपासून मुंबई-पर्यंत एक प्रकार. यांत कांहीं गुजराथी शब्दांची मिसळ आहे. यांत वर्तमानकाळीं एकवचनी, तृतीय पुरुषांचीं रूपें पुल्लिंगी स्त्रीलिंगाप्रमाणें, आणि प्रथम पुरुषाची स्त्रीलिंगीं पुल्लिंगीप्रमाणें होतात. मुंबईच्या दक्षिणेस अष्टागर प्रांतांच्या भाषेचा प्रकार निराळा; पुढें रत्नागिरी प्रांताची शुद्ध कोंकणी भाषा यापेक्षां विशेष निराळी. राजापुर प्रांताच्या भाषेचा प्रकार निराळा; तेथून मालवणी भाषा निराळी, ईत गोमंतकी शब्द व क्रियापदांचीं कांहीं कांहीं रूपें हि निराळ्या प्रकारचीं आढळतात. पुढें शुद्ध गोमंतकी भाषा, ही मराठी भाषेहून निराळी भाषा म्हटल्यासहि चिंता नाहीं. देशस्थ भाषेंतहि याचप्रमाणें प्रकार आढळतात. ज्या ज्या देशांच्या सीमेवर महाराष्ट्र देशाची सीमा मिळाली आहे, त्या त्या प्रांतीं त्या त्या भाषेचें शब्द यांत मिसळून स्वरभेदही निराळा होतो. कर्नाटक देशाच्या सीमेजवळच्या प्रांतीं म्हणजे करवीरापासून सोलापुरापर्यंत जो प्रदेश त्यांत वेगळ्या प्रकारची भाषा आढळत्ये. वऱ्हाड प्रांताच्या थेट देशस्थी भाषेचा प्रकार निराळा, बऱ्हाणपुरापासून नंदुरबारपर्यंत खानदेशाच्या समीप भागाच्या भाषेचा प्रकार निराळा. पुढ खानदेशाची भाषा गोमंतकी भाषेप्रमाणें मराठी भाषेहून निराळी म्हटल्यास चिंता नाहीं. ‘ साहेबा तूं खें वेता ’ हें जितकें शुद्ध महाराष्ट्र भाषेपासून निराळें, तितकेंच ‘ मानाभाऊ तूं कठ जास ’ हेंहि निराळें होय. आतां हें सर्व प्रकार वजा घालून महाराष्ट्र भाषेचे मुख्य दोन प्रकार मानिले आहेत—देशस्थ भाषा आणि कोंकणस्थ भाषा, त्यांत या व्याकरणांत, महाराष्ट्र देशाचा मध्यभाग जो पुणें प्रांत, त्यांत, जी भाषा राजकीय आणि विद्वान् लोक बोलतात, तिचं अनुकरण केलें आहे. त्यांत माझा वडिलांचा जन्म कोंकणांतला, म्हणून यांत कदाचित् कोंकणी प्रकारचें यत्किंचित् आधिक्य असलें तरी मला क्षमा मागाव-यास कांहीं अवकाश आहे.

महाराष्ट्र भाषेचें व्याकरण— प्रस्तावना. पृ. ९।१२

—दादोबा पांडुरंग—

आवृत्ति तिसरी ( १८५७ )

## १९ [ बाळपणची मौज ]

त्या काळीं आमच्या लोकांच्या रीतीप्रमाणें मुलांच्या अंगास हळद लाविली म्हणजे त्यांस कांहीं पिशाच्चबाधा होऊं नये म्हणून त्यांच्या हातांत एक लहानसा चाकू देत असतात तो त्यांनीं हळद अंगावर आहे तोंपर्यंत निरंतर आपल्याजवळ बाळगावा. हा पहिला च चाकू माझ्या हातीं आला, त्या काळीं मला स्मरण आहे कीं, त्यापासून मला जो आनंद झाला तसा आनंद आतां कोणी राजानें एक गांव बक्षीस केला असतांही होणार नाहीं. तो चाकू हातांत येतां च किती उडलों, नाचलों आणि घडीघडीं बाबांस व आईस विचारावें कीं हा माझा चाकू हो, मी आतां परत देणार नाहीं. पुढें आजीनें एक मला लहानशी पेटी दिली, त्या पेटी-साठीं मी तिची पूर्वी किती काकुळत केली. तो विचार आतां मनांत आणिला म्हणजे मोठा चमत्कार वाटतो. दिवसांतून दहावीसदां तिच्या पायां पडावें, दीन-वाणें तोंड करावें, मागायास धैर्य तर होऊं नये, मग हळूंच तिच्या तोंडाकडे पाहून म्हणावें, बाई, मला तुझी तेवढी पेटी नाहीं देत आणि मग लाजून लागलें च पळावें. काय बाळपणाची मौज. लहानपणीं असें वाटतें कीं, एखादा पदार्थ जसा आपणांस आवडतो, तसाच आपल्या आईबापांस आवडत असेल. तेव्हां ते आप-णांस कसा देतील, असें वाटून एखादा क्षुल्लक, अत्यंत क्षुल्लक पदार्थ ही मागायास मोठा संकोच वाटतो. गरीब बापडीं मुलें. आईबापांहीं व सर्वांहीं त्यांचे असले निर्दोष लळे पुरवीत असावें यांत मोठा आनंद आहे. शेवटीं आपल्या पेटींत ठेवा-वयास कांहीं नसलें तर चांगले वाटोळे धोंडे आणून ते त्यांत भरावे आणि मग आपल्या भावंडास ती आपली संपत्ति वारंवार दाखवीत असावी. मग त्यांहीं आपला मत्सर करून रडावें व त्यांत एखादा दांडगा व बलिष्ठ असला म्हणजे त्यानें आपणांस मारून तो पदार्थ आपणापासून घ्यावा, मग एक मोठा कलह होऊन ती फिर्याद घरांत बाईजवळ जावी. मग तिला राग आला म्हणजे तिनें तें कलहाचें मूळच काढून घ्यावें, मग सर्वांहीं एवढीशीं तोंडें करून उगीच बसावें.**

तसेंच लहानपणीं बाहेर आईबापांबरोबर फिरावयास जाण्याची ही फार आवड असती. घरांत कोंडून राहणें मुलांस अगदीं आवडत नाहीं व त्यांच्या शरी-रास तें हितकारक नव्हे. त्यांत आणखी रस्त्यांतून आईचा अथवा बापाचा हात

धरून त्यांजबराबर चालण्याची त्यांस अधिक हौस असती. तितक्या बाल्य दशेंत ही थोडासा डौल दाखविण्याचा अंकुर मनांत असतो.

दादोबा--आत्मचरित्र. (अप्रसिद्ध भाग)

---

## २० [ दोन आठवणी. ]

( मी ) नाहीं म्हटलें तरी त्याणें ( आर्बथनाट) न ऐकतां ते नित्य सकाळीं आपला तट्ट मजकडे बसावयास पाठवीत, असा क्रम कांहीं महिनेपर्यंत चालला. तेव्हां त्यांचें माझें अनायासें फार संघटन पडलें. ते मला वारंवार विचारीत कीं, तुम्ही इतकें इंग्लिश कोठें शिकलेत व इतकें पंतोजीपणाचें काम कां करतां—म्यां म्हटलें हीं सर्व इंग्लिश सरकारची कृपा. मला सरकारी शाळेंत इंग्लिश मास्तरांनीं पढवलें आणि सरकारानें मला काम सांगितलें त्यावरून ते म्हणाले हें अधिकाराचें काम नाहीं. मी तुम्हांस मामलतेचें काम सांगितलें तर कराल ? म्यां मोठ्या खुषीनें म्हटलें होय; परंतु मामलतदारांस आरंभीं शंभर रुपयांपेक्षां अधिक दरमहा मिळत नाहीं. ते म्हणाले असें तर आहे. मग म्यां म्हटलें मला या जागेवर १५० रुपये दरमहा मिळतो. ते म्हणाले इतका दरमहा तुम्हांस पहिल्यानें मिळणार नाहीं मग ते उगीच राहिले. परंतु मी त्यांस नम्रतेनें म्हटलें तूर्त नाहीं तर नाहीं. परंतु केव्हां तरी माझ्या दैवानें आपण मोठ्या हुद्यातर गेलां तर मला विसरूं नका. ते म्हणाले मी तुला विसरणार नाहीं. तें मला नित्य बसावयास तट्ट पाठवूं लागले, तेव्हा गांवांत मोठें आश्चर्य वाटलें कीं, या नवे कलेक्टराची व माझी ओळख नसतां त्यानें मजवर इतकी मेहेरबानी केली. (हा कलेक्टर कोणी आर्बथनाट नामें होता.)

सन १८४३ सांत मी एक वर्षापासून नर्भयरामशास्त्री यांजपाशीं लघुकौमुदी पढों लागलों. सकाळीं ती पढावी आणि लागलेच त्यांत पाणिनीची अष्टाध्यायींतलीं सूत्रें येतात, तीं अक्षरशः व पदशः समजून घेऊन त्यांचें महाराष्ट्र भाषांतर करावें. असा क्रम चालला असता सन १८४३ सांत त्यांतील सारें सुबन्त प्रकरण आपल्या हातानें सुंदर लिहून ठेविलें. तें पुढें बोर्ड ऑफ एजुकेशन ( Board of Education ) या मंडळींकडेस आश्रयाकरितां पाठविलें. त्यांहीं तें त्या वेळचे मोठे प्रख्यात विद्वान् बाळ गंगाधरशास्त्री यांजकडेस अभिप्रायाकरितां पाठविलें.

त्याहीं तें साद्यंत लक्ष लावून तपासिलें परंतु त्यांतलीं पाणिनीची अष्टाध्यायींतलीं सूत्रें हीं वेदोक्त आहेत, तीं तूर्त छापून अशीं ओवळीं केलीं असतां आवडणार नाहींत असा आपला अभिप्राय दर्शविला. यावरून तो ग्रंथ पुढें न चालवितां मी तसाच बांधून ठेविला.

**दादोबा पांडुरंग**—आत्मचरित्र ( अप्रसिद्ध ).

---

## २१ [ धाकजीची आंखूड समजूत. ]

मी या शाळेंत ( सोसायटीची शाळा ) गेल्यावर सुमारें एक दीड वर्षांत आमच्या सर्व गुरुजींस व पंतोजींस असा एकाएकीं हुकूम आला कीं या सोसायटीच्या शाळांत जितकीं कुळवाड्याचीं मुलें असतील, त्या सर्वांस काढून टाकावें व पुढें या जातीचीं मुलें घेऊं नयेत. तेव्हां या जातीचीं दहा वीस अधिक मुलें आमच्या शाळेंत होतीं. त्यांत कित्येक वरच्या वर्गांत चढलेलीं व त्यांचा अभ्यास चांगला झाला होता, त्यांस एकदम रजा मिळाली. पुढें थोडक्याच दिवसांनीं माझे ऐकण्यांत असें आलें कीं असा परस्परांचा नियम ठरविण्यास मुख्य कारण धाकजी दादाजी परभू हे होते. हे गृहस्थ त्या काळच्या सोसायटीचे एक सभासद होते, यांनीं जगन्नाथ शंकरशेट व दुसरे हिंदु सभासद मोठ्या आग्रहानें आपल्या पक्षाचे करून हा नियम त्यांजकडून करविला आणि इतर पारशी व युरोपियन सभासदांस असें भय दाखविलें कीं जर तुम्ही असा निमय न ठरवाल तर मी सभासदाचें काम पहणार नाहीं व परभु लोकांची मुलें येथें येण्यास मना करीन. धाकजी दादाजी हे त्या वेळेस वयातीत व मोठे प्रतिष्ठित गृहस्थ होते. यांचें म्हणणें असें पडलें कीं, जर हे हलक्या जातीचे लोक शिकून पुढें हुषार झाले, तर उंच जातीच्या लोकांस इंग्रजींत रोजगार मिळणार नाहीं व त्यांची आपली बरोबरी होत जाईल. हें त्यांचें म्हणणें त्या काळच्या बहुतेक लोकांस मोठें शहाणपणाचें व दूरदर्शिपणाचें असें वाटलें व त्यांची हिंदु लोकांत बरीच वाहवा झाली, त्यांत त्यांच्या जातींत तर फारच झाली. त्यांच्या त्या काळच्या आंखूड समजुतीप्रमाणें त्यांना मोठा दोष द्यावा असें मला वाटत नाहीं. अद्यापि आतां इतके शिक्षित लोक झाले आहेत व सुधारलेपणाचा मोठा अभिमान बाळगतात,

त्यांच्याहि मनांतून ही ग्रंथी सुटत नाहीं. किंबहुना तेव्हांपेक्षां आतां जातिद्वेष आंतून अधिक वाढल्यासारखा दिसतो मग वृद्ध धाकजींकडे या नियमाचा मोठा दोष लावावा हें मला प्रशस्त दिसत नाहीं. पुढें धाकजींच्या वृद्धपणामुळें या सभासद्पणाचें काम सोडलें आणि हा नियम फार दिवस टिकला नाहीं.

दादोबा पांडुरंग—आत्मचरित्र. (अप्रसिद्ध)

---

## २२ ( कबीर वड. )

सन १८४४ च्या शिमग्याच्या सुमारास मला श्रीमंत बाळकृष्ण ऊर्फ भाऊसाहेबशास्त्री पटवर्धन ( गंगाधरशास्त्र्यांचे द्वितीय पुत्र ) यांजकडून पत्र आलें कीं, तुम्ही ग्रीनसाहेब मास्तर ( हेच गृहस्थ पुणें पाठशाळेवर १८५१ सालीं आले असावे.) यांस बराबर घेऊन बडोद्यास होळी पहाण्यास यावें. त्यावरून आम्हीं उभयतां भडोचच्या मार्गानें बडोद्यास गेलों. आमचा भडोचेंत मुक्काम असतां येथें जवळपास चार पांच कोशांवर जगप्रसिद्ध एक कबीरवड म्हणोन वडाचें झाड आहे, तें पाहण्यास मी व मिस्टर ग्रीन आम्हीं दोघे निघालों तों तिसऱ्या प्रहरीं तेथें पोहोंचलों आणि पहिल्यानें तें झाड पाहिलें. तों आम्हांस असें दिसून आलें कीं, खरीच या झाडाची कीर्ति आहे ती। मूळच्या एका झाडाची आतां तीस, चाळीस मोठमोठीं ( झाडें ) मूळ झाडाच्या पारिंब्या लोंबून ( झालीं आहेत ) त्यापासून अशी त्या झाडाची संतति हल्लीं वाढली आहे. त्याचा विस्तार आम्हीं पाहिला. तो इतका मोठा होता कीं, त्याच्या छायेखालीं कांहीं नाहीं तरी दहा हजार माणसें वागतील. आम्हांस तेथें फिरतां फिरतां अगदीं सांजवलें. आम्हां दोघांसही फार क्षुधा लागली. आमच्यापाशीं कांहीं खावयास नव्हतें. आमची अशी अटकळ होती कीं, कबीरवड पाहून संध्याकाळीं भडोचेस जेवावयास येऊं. परंतु तसें झालें नाहीं तेव्हां त्या झाडाजवळ गांव होता तेथें एका गुजराथी ब्राह्मणाच्या घरीं रात्रीस जेवावयास व बिऱ्हाडास राहिलों. गुजराथी ब्राह्मणाचें कुटुंब चांगलें होतें. त्यांणीं मजकरितां व मास्तर ग्रीन यांजकरितां उनऊन स्वैंपाक करविला, ग्रीनसाहेब मोठ्या हौसेनें त्याचा तो डाळभात व घुग्र्या जेवले. त्यांस भुईवर बसून जेवतां येईना, तेहां जवळच त्या ब्राह्मणाच्या गवऱ्यांचा ढीग रचला होता,

त्याचें ग्रीनसाहेबांनीं मेज करून त्यावर पत्रावळ मांडून वडाच्या पानाचे चिमचे केले. मोठ्या प्रीतीनें जेवले. मी त्यांस जेवूं घालून त्यांचें जेवण आटोपल्यावर मी ब्राह्मणाचे घरांत हिंदू चालीप्रमाणें पाटावर बसून पत्रावळ पुढें ठेवून जेवलों. सुंदर लोणकडें तूप, डाळभात, पोळ्या, शाकभाज्या व कढी होती, ती मेस्तर ग्रीन यांनीं पोट भरून खाल्ली. म्हणाले असें सुंदर रुचकर जेवण मीं कधींच जेवलों नाहीं. आमचे इंग्लिश लोक या देशांत असून त्यांस ह्या हिंदूंच्या जेवणाची रुचि कांहींच ठाऊक नाहीं. किती साधें व निरोगी जेवण त्या रात्रीं मला वाटलें. आम्ही तेथेंच निजलों.' त्या ब्राह्मणास चांगली पोटभर दक्षणा देऊन पहांटेस भडोचेस जाण्यास निघालों.

दादोबा पांडुरंग--आत्मचरित्र. (अ[illegible]

---

## २३ सत्यनिरूपण.

अरेरे! ह्याप्रमाणें शपथ वाहून जो मनुष्य लोभांध होऊन खोटी साक्ष देतो, त्याच्या मूर्खपणास पार नाहीं, असें समजावें. आपण बोलतों काय, आणि करतों काय! याचें ज्याला भान नाहीं, तो मनुष्य केवळ पशु असें समजावें. अरे खोटी साक्ष देणाऱ्या! पाहा, तूं किती अनर्थ करतोस तो. जर तुझी साक्ष एखाद्या खुनाच्या मुकद्दम्यांत असली आणि खून करणारा तुझा आप्त किंवा तुझी मूठ भरणारा असला, तर तुझ्या साक्षीवरून कदाचित् एखादा गरीब या जगांतून उठला जाईल; आणि त्याचीं बायकोमुलें भिकेस लागतील. मग तीं जसजसीं दुःख पावतील तसतसीं तुला तळतळाट देतील. जो दुष्ट मनुष्य खोटी साक्ष देऊन निरपराध्यास फाशांत पाडितो, तो केवळ अघोरपातकी. एखाद्या अपराध्यास शासन न होतां तो सुटला तर समयविशेषीं चालेल; परंतु निरपराध्यास विनाकारण दंड करविणें, हें रोमांच उभे रहावयाजोगें दुष्ट कर्म आहे. प्रसंगीं लुटारू मनुष्याची गांठ पडली, तर पत्करेल; परंतु असल्या दुष्टाचें तोंड पाहूं नये; कारण लुटारू मनुष्य द्रव्यहरण करण्याच्या लोभानें मनांत आवेश आणून दुसऱ्याचा नाश करतो; पण खोटी साक्ष देणारा हांसत खेळत चौघांमध्यें

न कळतां दुसऱ्याचा गळा कापितो. कित्येक असेही आहेत कीं, एक दोन आण्यांच्या लोभामुळें देखील खोटी साक्ष देण्यास कबूल करितात.

**गोविंद नारायण मांडगांवकर**–पृ. ६३।६४

तिसरी आवृत्ति (१८७७) (१८५१।५२चे विलोबी बक्षीसाचा निबंध.)

---

## २४ राजनीति.

१ कोणीही राज्यानें राज्यकारभार चालविण्याच्या कामांत अविच्यारी असे जे अनेक मतांचे मताभिमानी, व द्वेष्टे, त्यांना घेऊं नये. कारण ते मनुष्य मताभिमानानें मनुष्यमात्रांत वैर उत्पन्न करितात. यास्तव कोणीही राजा असो, त्यानें मनुष्यमात्रांतून वैर दूर होईल अशा तजविजीनें राज्यकारभार चालवावा, व राज्यकारभार चालविणारे कामगार वंशपरंपरा नेमूं नयेत; परंतु ज्या मनुष्यांनी एकाकी प्रवास केला आहे, व ज्यांना गरीब, व श्रीमंत, व नीच, इत्यादि सर्व मनुष्यांचीं कर्में माहीत आहेत, व सुखदुःखें माहीत आहेत व ज्यांनीं परोपकार करण्याचे कामांत घ्यावे तसे श्रम घेतले आहेत, व ज्यांच्यांत पराक्रम. व धैर्य, व चातुर्य, व विद्या असून दया आहे, व ज्यांना सर्व मतें माहीत आहेत, व जे द्रव्यलोभी नाहींत, व जे न्यायाचे कामांत पक्षपात धरणार नाहींत, अशा अशा लक्षणांचे कामदार राज्यकारभार चालविणारे नेमावे. व अशा लक्षणांचे मनुष्य कोणत्याही जातीचे म्हणजे जमातीचे असले तरीही, त्यांना राजानें पक्षपात न धरिता कामदार नेमावे, व जगांत शांति राहील असे कायदे म्हणजे नियम करीत जावे. व राजानेंही असें समजावें कीं मीही एक कामदार आहें, यास्तव मला ही सर्व प्रजेंतील मनुष्यांपेक्षां उत्तम रितीनें सर्व कारभारांत बिनचूक वागलें पाहिजे, व पक्षपात अगदींच टाकला पाहिजे, व धर्माच्या गोष्टी ऐकून मनोमय ठेविल्या पाहिजेत; परंतु मुखानें उच्चारण करणें अगदीं उपयोगीं नाहीं, असें पक्कें समजून वागलें पाहिजे. ही राजनीति आहे.

२ राजानें सर्व मनुष्यांस मजूरी व अन्नवस्त्र मिळावें, अ ासाठीं देशोदेशीं जगाला सुखोपयोगी असे नवीन नवीन कारखाने काढावे, व जुने कारखाने सुधारावे, व मंडळ्या नेमून त्या कारखान्यांचा बंदोबस्त राखीत जावा. व हरएक

मजूराला किंवा कामगाराला दररोज, किंवा दर महिन्याचे महिन्यास, ठरविलेला मजुरीचा पैका देत जावा. व मजूराचा पैका जास्ती दिवस ठेऊं नये, कारण तहान लागल्यावर जसें आपणांस होतें, त्याहून मजूराचा पैका जास्ती दिवस ठेविल्यास मजूरास अधिक दुःख होतें. यास्तव मजूराचा व कामगाराचा पगार वर लिहिलेल्या मुदती बरोबर द्यावा. व कोणी ही मजूराचा मजुरीचा पैका अपहार करणार नाहीं असा पक्का बंदोबस्त ठेवावा. याप्रमाणें कीं रोगानें आपल्या शरीराचा नाश करूं नये म्हणून जसें आपण शरीरास जपतों, त्याहून मजूराचा पैका कोणीं बुडवूं नये म्हणून अधिक जपत जावें.

३ वृद्धाने लहान मुलीबरोबर लग्न केलें असता, ती मुलगी परत घेऊन, तिचें लग्न तिच्या वयाच्या व गुणाच्या नियमानें जो तिच्या शरीरधर्माप्रमाणें व चार वर्णाप्रमाणें पुरुष असेल, त्याजबरोबर लावून द्यावें आणि ज्या वृद्धानें असें काम केलें असेल त्याला त्याच्या गुन्ह्याप्रमाणें शासन करावें, व हरएक जमातीचा म्हणजे जातीचा पुरुष आहे, आणि हरएक जातीची विधवा स्त्री त्याजबरोबर लागू झाली आहे असें अढळलें तर, त्या स्त्रीचा आणि त्या पुरुषाचा विवाह करावा; परंतु वर्णव्यवस्था करावी, आणि त्या उभयतांनी विवाहित स्त्रीपुरुषांच्या नियमाप्रमाणें वागावें, आणि परस्परांवर प्रीति ठेवून संतती होईल, त्या संततीचें संरक्षण बिनधास्तपणें करावें.

४ देवळांत किंवा तीर्थ क्षेत्रांत पूजारी किंवा कारभारी इत्यादि वतनदार ठेऊं नये, कारण तसें केल्यांत द्रव्यलोभानें भक्तीचा नाश होतो. ***

५ ***चौघडे व नगारे व ढोल व झालरी व तासे इत्यादि रणवाद्यें गावांत कोणास वाजवूं देऊं नये, परंतु मंगलवाद्यें वाजविल्यास चिंता नाहीं.

६ हरएक खेळ खेळतांना जर कोणी मनुष्य हाणाहणा, मारामारा, असा शब्दोच्चार करील, किंवा बोंबलेल, किंवा थट्टेनें स्त्रियाच्या किंवा पुरुषाच्या सुखदुःखाच्या विवळण्याप्रमाणें स्वर काढील, किंवा विनाकारण मोठ्यानें गोंगाट करील तर त्या तसल्याला धरून शासन करावें, आणि तसें कोणीही करूं नये असा बंदोबस्त ठेवावा.***

७ श्रीमंत लोकांचीं, अथवा भिकाऱ्यांचीं, इत्यादि पोरें गाईंना किंवा गाईंच्या वासरांना, किंवा बोकड शेळ्यांना, किंवा कुत्र्यांच्या पिलांना, अथवा

हरएक घरच्या अथवा लोकांच्या, अथवा बिनवारशी प्राण्यांना त्रास देतात, यास्तव तसल्या कर्माच्या पेरांना शरीरदंड सरकारांतून करावा. मग तीं पोरें नीच अथवा उंच पक्षीच्या मनुष्यांचीं असलीं तरी चिंता नाहीं. कारण त्यांना शिक्षा असावीच असावी.

८ हरएक तान्हेल्या प्राण्याला पाणी पिण्याविषयीं हरएक ठिकाणीं जो कोणी अडथळा करील, त्याला अवश्य शासन करावें.

९ धर्मशाळा, अथवा वेदोक्तधर्माचीं देवळें यांतून वेदोक्तधर्माप्रमाणें वर्तणाऱ्या साधूसंताला, अथवा देवळाखेरीज धर्मशाळेंत श्रमून आलेल्या हरएक मुशाफराला उतरण्यासाठीं काढलेल्या जाग्यांत उतरण्याविषयीं जो कोणी विनाकारण अडथळा करील त्याला शासन करावेंच करावें.

१० जे कोणी मारामारी पहात उभे राहतील, परंतु सामर्थ्य असून मारामारी सोडवणार नाहींत, तसल्या मनुष्यांना शासन करावें. संकटसमयीं शेजाऱ्यानें हांक मारिली असतां, अथवा शेजाऱ्यावर संकट पडलें आहे असें ठाऊक असतां, सामर्थ्य असून जे कोणी त्याच्या सोडवणुकीकरतां मदत करणार नाहींत, त्याना राजानें अवश्य शासन करावें.

११ ***

१२ कर्ज घेण्यादेण्याच्या बाबींची राजानें फिर्याद घेऊं नये एकमेकांची साक ठेवून एकमेकांनीं देणें घेणें करावें परंतु एकमेकांच्या हातचा लेख एकमेकांस द्यावा, आणि चार चौघांनीं जो नाठळ झाला असेल, त्याच्याबरोबर व्यापार करूं नये असा न्याय करावा, व पतीनें चालेल त्यांजबरोबर देण्याघेण्याचा व्यवहार करावा.

१३ कोणीहि मनुष्य कोणत्याही मनुष्याला ठार मारील, तर राजानें त्या घातक्याला ( मारणाऱ्याला ) उघड जाग्यावर सर्वांस तो दिसेल अशा बंदींत ठेवून नुस्तें पाणी पिण्यास द्यावें, व अल्पस्वल्प वस्त्र द्यावें याशिवाय अन्न द्यावें, वस्त्रादिक त्याला कांहींच देऊं नये. याप्रमाणें त्या गळेकापू मनुष्यास मृत्यूची शिक्षा द्यावी आणि मेल्यावर त्याचे प्रेत पशुपक्ष्यादिक खातील तसें तुकडे करून टाकावें.

१४ दरोडा घालणारे, किंवा वाटा मारणारे जे लुटारू दुष्ट, त्यांस पायांत बिड्या घालून देश निकालाची शिक्षा द्यावी. आणि त्या ठिकाणीं त्यांना स्त्रियेचें

दर्शन होऊं नये, म्हणून तें ठिकाण स्त्रीविरहित असावें. आणि अशा त्या शासन पावलेल्या माणसांपासून अनेक धंदे करवून, त्यांच्या पोटास अन्न व शरीरास वस्त्र देऊन, बिड्या घालून मरणापर्यंत त्या ठिकाणीं त्यांना ठेवावें व याप्रमाणेंच या कर्माच्या स्त्रियांना हि पुरुषाची संगतरूपी भेट होऊं नये. अशा ठिकाणीं बिड्या घालून अन्नवस्त्र देऊन ठेवाव्या, आणि कामधंदे करवावे.

१५ उचल्येगिरी किंवा हलकी चोरी करतांना जो पांच वेळ फटके व खोडाबिड्या यांची शिक्षा पावला, त्याला, सहाव्यानेही तोच अपराध करील, तर दरोडा घालणारांस किंवा वाट मारणारांस जी शिक्षा तीच त्याला द्यावी.

१६ कपटानेंच जर कोणी कोणाकडून द्रव्य घेऊन पुन्हा त्याचें त्याला परत देणार नाहीं, तर राजाने परत देववावें. आणि व्यापाराकरितां, कोणी कोणा- कडून अल्प द्रव्य घेतलें, तर त्याणीं परस्पर द्यावें घ्यावें, परंतु राजानें मदत करून घरदार इत्यादि विकून देववूं नये व घेववूं नये.

१७ ज्या प्रवाशाची चौकशी पाठीमागाहून पोंचल्या न पोंचल्याची कर- णारा वारसदार कोणी नाहीं, अथवा असला तरी पुरा वांकबगार नाहीं, त्या प्रवा- शाची राजानें खबरदारी ठेवावी कारण राजा हा मुख्यत्वेंकरून मनुष्यप्राण्याच्या व सुखाच्या संरक्षणार्थच आहे. परंतु हल्लींचे राजेलोक असा बंदोबस्त ठेवीत नाहींत, हेंच राजेलोकांनीं मनुष्य मारणाऱ्या लोकांस उत्तेजन दिल्यासारखें आहे. कारण मनुष्याच्या प्राणाची चौकशी ज्या राज्यांत नाहीं, आणि इतर सर्व सुधारणा आहे, तर तसल्या राज्याला राजा म्हणावें काय? नाहीं, राजा म्हणण्यापेक्षां चोर व घातकी म्हणणें ठीक आहे. व तसल्या राज्याचे मोठमोठालीं वेतनें खाणारे लोक हा विचार करीत नाहींत, तस्मात् ते शतमूर्ख आहेत. यास्तव असें नसावें; प्रज्येच्या प्राणाचें रक्षण करावें.

१८ पहा, राज्याने प्रत्येक मनुष्याचा जन्मदिवस, व त्याचें नांव जन्मल्या ठिकाणाचें नांव, व त्याच्या कुळाचें नांव, व जातीचें नांव, व त्याचा धंदा व हुद्दा इत्यादिकांचीं नांवें, व नांवनिशीवार खातीं गांवोगांवीं वहीवर घालून ठेवावीं, आणि प्रत्येक मनुष्य कोणत्या कारणाने, व कोणत्या गांवीं, व काय हेतूस्तव, व कधीं गेला, हा तपशील लिहित जावा. आणि तो मरेल तोंपर्यंत त्याच्या आयुष्याच्या

मोजदादीचा व जाण्यायेण्याचा तपशीलवार हिशेब राखावा, व तो कोणत्या गांवीं, व कधीं, काय कारणानें मेला हें त्याच्या जन्मलेल्या ठिकाणाच्या हिशेबवहीवर त्याचे खात्याला लिहावें. व मनुष्यें मनुष्यांच्या हातून, अथवा जलचर, भूचर इत्यादि प्राण्यांच्या हातून, अथवा मादक पदार्थ भक्षण केल्यानें रोगग्रस्त होऊन, अथवा एखाद्या देशावर दुष्काळ पडल्यामुळें अन्नपाणी न मिळून, अथवा नद्यांना पूळ, व रस्ते, व राहण्याच्या जागा इत्याहि बरोबर नसल्या कारणावरून, व रोग्यांना औषधें देणारें नसल्यावरून, व मूर्खपणानें त्रासानें आत्महत्या करून घेऊन, अथवा ढोंगी लोकांच्या फसवण्यानें, म्हणजे मादक पदार्थ युक्तीनें खावयास देऊन ढोंगी लोक मनष्याला प्रथम बेशुद्ध करितात; आणि याला भुतानें झडपले असें ढोंग करून रुपये मिळवून, नंतर पाणी जणु मंत्रूनच प्यावयास देतात, अशा त्यांत मादक पदार्थाचा उतारा देतात, अथवा अंगारा लावून एक दोन प्रहरांनी गुण पडेल असें सांगतात, आणि तो मादक पदार्थाच्या जहरापासून मुक्त झाल्यावर, कुटुंबी अज्ञान मनुष्यांना वाटतें कीं, या मंत्री मनुष्यानें आमचें मनुष्य बरें केलें, परंतु तें सर्व त्या मंत्री म्हणून घेणाऱ्या ढोंगी माणसाचें कपट असतें, यास्तव तसल्या ढोंगी मनुष्याच्या फसवण्यावरून.* * * इत्यादि * * * कारणांवरून मनुष्यांच्या प्राणाचा नाश होऊं नये * * * असा बंदोबस्त राज्यानें राखा. हेंच जगाला राजा असण्याचें पहिलें मुख्य कारण आहे. हें काम राजा ह्मणवीत असून हि जो चालवीत नाहीं तो राजा नंव्हे, पण राक्षस आहे. व त्याचे मंत्री हि राक्षस आहेत......

१९ शेतकीच्या वगैरे जमिनीवर, किंवा खुराकी सामानावर किंवा लांकडांवर, किंवा गवतावर, पानांवर, किंवा प्यावयाचे पाण्यावर इत्यादिकांवर राज्याचा कर मुळींच नसावा; कारण ते पदार्थ ईश्वरी देणगीचे आहेत; परंतु मनुष्यमात्राचे रक्षणार्थ प्रत्येक मनुष्यापासून दरवर्षास एक रुपया कर राज्यानें घ्यावा व जन्म झाल्यापासून अका वर्षें पूर्ण होतील तोंपर्यंत दर मुलाचा दरसाल चार आणे कर...बाराव्ये वर्षाचे आरंभापासून एकुणिसावे वर्षाचे अंतापर्यंत... अर्धा रुपया...नंतर......एक रुपया कर राज्यानें घ्यावा. आणि राज्यानें अन्य बंदोबस्ताकरितां पाण्यांतील व जमिनीवरील अनेक व्यापारधंद्यावर कर बसवून खर्चाचें मान पुरें करावें. ही राजनीति आहे.

२० हिंदुस्थान देशांतील राजकीय लेखन किंवा व्यावहारिक लेखन, बालबोध जी देवनगरी पूर्ण लिपी तिच्यांत असावें अथवा......मोडीलिपी तिच्यांत असावें आणि युधिष्ठिर, शालिवाहन विक्रम हे शक व चैत्र, वैशाख इत्यादि महिने......याप्रमाणें पुस्तकांत लावीत जावे. अन्य देशांतील अपूर्ण लिपींचा अभ्यास करण्याचे व म्लेंछाच्या गोष्टी शिकविण्याचे बालकांस श्रम देऊं नये.

२१ * * * *

२२ ज्या काळांत नीतिमान व दयाळू व अल्पसंतोषी अशा स्त्रिया असतील त्या काळांत मात्र एक पती मेला असतां दुसरा पती याप्रमाणें सर्व आयुष्याच्या काळांत विवाह करण्याची मोकळीक द्यावी, आणि ज्या काळांत एक पती प्रिय नाहीं म्हणून...दुसरा पती करावा अशी स्त्रियांची चाल दिसेल त्या काळांत विद्धयोनी झाल्यावर...दुसरा पती करू नये असा नियम चालवावा.... आणि तसल्या काळांत स्वयंवरांत स्वपरेच्छेनें पती वरावा असा नियम चालवावा. याप्रमाणें **विवाहाचे नियम कालपरत्वें चालवावे,** कीं जेणेंकरून मनुष्यांचें प्राणरक्षण व्हावे आणि सुख ही बुडूं नये, व धर्म ही बुडूं नये....

२३ न्यायाधिशानें अन्यायी ब्राह्मण आणि अन्यायी माहार या दोघांस सारख्या मानाने उभे करून, अथवा बसवून न्याय करावा; परंतु **माहार दरवाज्या बाहेर आणि ब्राह्मण आंत असा पक्षपात करूं नये.** मग तो न्यायाधीश ब्राह्मण क्षत्रियादिक कोणी हि असो, अथवा माहार मांग असो. सर्व न्यायाधिशानी ह्या नियमाने चालावें, आणि पक्षपात सोडून न्याय करावा, तरच प्रजा कैदी होईल, नाहीं तर प्रजा स्वतंत्रता पाहील.

२४ राजाच्या पोटीं उत्पन्न झाला तो च राजा आहे असें नाहीं. जो लहान हुद्यापासून मोठ्या हुद्यापर्यंत कामे करून योग्यतेस चढला **तो च राजा असावा, मग तो प्रजेतील कोणी का मनुष्य असना.**

२५ युद्ध करणारी सेना अथवा लेखनकामादिक अनेक कामे करणारी सेना, इत्यादि सैन्य राजाने बाळगावें. त्यांतील मनुष्यें अमुकच वर्णाचीं अथवा अमुकच वर्णांपैकीं अमुकच जमातीचीं म्हणजे जातीचीं असावीं असें नाहीं. मनुष्यमात्रांस त्यांच्या अकलेची, व बलाची व शौर्याची परिक्षा घेऊन ठेवावें,

त्यांत वर्णभेद किंवा वर्णभेदांतील ज्यातिभेद इत्यादि अटकाव नसावा, **तरच सर्व जातींच्या प्रज्येला आमचें राज्य असा अभिमान** राहतो, आणि शत्रूंचें अगदीं चालत नाहीं व मनुष्य मात्रांचे अन्याय दृष्टोत्पत्तीस येतात यामुळें नीतीने शासन होतें.

२६ राजकीय नियमांतील चाकर मनुष्यें म्हणजे शिपायापासून राज्या-पर्यंत व दासीपासून राणीपर्यंत व वल्ही मारणारांपासून नांव चालविणारांपर्यंत व घोडा धुणाऱ्यांपासून कचरा झाडणाऱ्यापर्यंत इत्यादि राजकीय नियमांतील चाकर मनुष्यांतून त्याला म्हणजे **लेखन वाचन ज्ञान नाहीं असें तर कोणी च नसावें.**

२७ जे ज्या देशांत राजकीय नियम चालविणारे कामदार नेमावे, ते, त्या देशाचा रिवाज व भाषा जाणणारे असून नीतिमान असावे.

२८ राजा मेला किंवा वृद्ध वैगेरे कारणानें ठरावाप्रमाणें वेतन घेऊन बसला, तर त्याच्या हाताखालचे जे मुख्य दहा कामदार त्यांतून एक राजा नेमावा. तो नेमण्याचा अधिकार प्रज्येतील लोकांचा या प्रकारचा असावा. म्हणजे एक जाहिरात छापून राज्यांतील सर्व प्रजेस विनंती ल्याहावी कीं......हे राज्या-भिषेकास योग्य आहेत. पैकीं अमुक गादीवर बसवावा अशी इच्छा असेल त्याणे त्याचे नांवाखालीं आपली सही करावी......आतां राज्याचे हाताखालचे मुख्य दाहा कामदार हे च कीं न्यायाधिश पहिला, व कराचा पैका प्रजेपासून घेऊन प्रजेस त्याची मिळकत वांटून देणारा, व राजकीय माणसांचें वेतन देणारा, व द्रव्यसंग्रह ठेवणारा असा दुसरा, व सेनापती योद्धा तिसरा, व समुद्रांतील रक्षणकर्ता चवथा, व प्रजेच्या निर्वाहाची सामोग्री पूर्ण असावी म्हणून व्यापारास उत्तेजन देणारा पांचवा, व प्रजेचा धर्मरक्षण करणारा साहवा व प्रजेच्या दृष्टोत्पत्तीस न येणारीं इत्यादि कपटें उघडकीस आणणारा सातवा, व अन्य राज्यांशीं संबंध ठेवणारा आठवा, व विद्यावृद्धी करणारा नववा, व प्रजेच्या शरीररक्षणाचीं साधनें करणारा दाहावा, याप्रमाणें दाहा कामदार यांनीं राज्याच्या अनुमताने आप-आपलीं कामें चालवावीं. याप्रमाणें राज्यव्यवस्था ठेवावी.

**२९ * * * ज्यादू किंवा चेटक मुळींच नाहीं, व कोणी जादू किंवा चेटक मला येतें असें म्हणेल तर त्यालाहि राजाने बांधून फटके मारावे ... ...**

३० राजानें एक एक न्यायखातें वेगळें वेगळें नेमावें ... ... क्षुल्लक कोणी इजा देतील त्यांचा एक दिवसाचे आंत न्याय करून ... ... बंदोबस्त ठेवावा.

३१ जे कोणी आपल्या मुलींना व मुलांना म्हणजे कन्यापुत्रांना लेखन-वाचन ज्ञान नीतिमानाकडून किंवा स्वतः देणार नाहींत किंवा लेखनवाचन ज्ञान देणाऱ्या वेदोक्तधर्मयुक्त नीतिमानास प्रतिबंध करतील तर तसल्या कर्मांच्या कर्त्यांस राजानें बांधून फटके मारावे ... ... ...

३२ जर कोणी कोणाकडून वेदोक्तधर्म सोडवून निर्धर्म करील तर उभयतांस राज्याने बांधून फटके मारावे आणि करणाराला देशपार करावा आणि पुनः तसें कोणी करणार नाहींत असा बंदोबस्त ठेवावा.

वेदोक्तधर्मप्रकाश—विष्णुबुवा ब्रह्मचारी.
शके १७८१ पृ. ४३६-४५०

---

## २९ [ पराक्रमी लव ]

मुलें:—हे कुमारा लवा, अश्व अश्व म्हणून यज्ञप्रकरणांत सांगितलेला प्राणि-विशेष लोकांत आहे असें ऐकत होतों, तो आज आम्हीं प्रत्यक्ष पाहिला.

लवः—यज्ञप्रकरणांत अश्व सांगितला आहे, तसा युद्धप्रकरणांतही सांगितला आहे; पण तुम्ही पाहिला तो कसा आहे सांगा.

मुलें:—ऐक कसा आहे तो सांगतों.

### श्लोक.

मोठें पुच्छ असे तया चवरिचें तो तें सदा हालवी ।
ग्रीवा दीर्घ, जटाल, चार खुरही वेगें तयां चालवी ॥
खातो बाळ तृणें फळासम सदा लेंड्यांस टाकीतसें ।
तूंतें दाखवितों उठीं लवकरी तो दूर गेला असे ॥

( असें म्हणून लवाच्याजवळ जाऊन कोणी हात, कोणी कृष्णाजिन धरून त्यास ओढतात. )

लवः—( विनयानें आणि कौतुकानें म्ह० ) अहो, गुरुजनहो, हे मला ओढून नेतात म्हणून जातों. क्षमा असावी. ( असें म्हणून त्वरेनें चालता होतो.)

कौस०:—अहो अरुंधतीबाई, मला असें वाटतें कीं, हा मुलगा माझ्या दृष्टीच्या पलीकडे गेला असतां माझा जीव राहणार नाहीं. ह्यासाठीं येथून दुसऱ्या ठिकाणीं उभें राहून हा चालला आहे याला पहावें. ह्याला उदंड आयुष्य असो.

अरुंधती आणि जनकः—हा बाळक आमचें कौतुक पुरवो.

कौसः•—पहा तो चपळ मुलगा हरणासारखा अति वेगानें पळत दूर गेला. तो कसा दृष्टीस पडतो !

( इतक्यांत कंचुकी येऊन सांगतो ), अहो वाल्मीकी ऋषि सांगतात कीं, ह्या समयीं तुम्हांस कांहीं सांगावयाचें आहे, तर तुम्हीं सर्वांनीं येऊन ऐकून घ्यावें.

जनकः—हें कांहीं तरी नाजूक प्रकरण आहे असें वाटतें. तर हे भगवती अरुंधती, हे सखी कौसल्ये, हे कंचुकी,आपण आतां चला वाल्मीकि ऋषीकडे जाऊं.)

( मग वृद्ध मंडळी निघून जाते. )

मुलें:—हे कुमारा लवा, हा चमत्कारिक प्राणी पहा. आम्हीं सांगितला तो हाच.

लवः—पाहिला आणि हा कशाचा अश्व हें हि मी समजलों. हा अश्वमेघ-संबधीं अश्व आहे.

मुलें:—हें कशावरून तुला समजलें ?

लवः—काय तुम्ही मूर्ख आहां. अरे अश्वमेधकांड तुम्हीं वाचलें नाहीं काय ? यज्ञसंबंधीं अश्वाच्या संरक्षणास कवची धन्वी खड्गी असे शंभर शंभर वीर असावे म्हणून त्यांत सांगितलें आहे तें तुम्हांला स्मरत नाहीं काय ? त्याप्रमाणें च हा अश्व आहे. तुम्हांस खोटें वाटत असेल तर तुम्ही त्यांस जाऊन विचारा.

मुलें:—( सैनिकांकडे जातात ) अहो सैनिकहो, वीरांनीं वेष्टित असा हा अश्व कोणत्या कारणास्तव फिरत आहे सांगा.

लवः—( स्पृहायुक्त होत्साता मनांत म्हणतो ) आहा, अश्वमेध म्हटला म्हणजे विश्वाचा जय इच्छिणाऱ्या क्षत्रियाच्या पराक्रमाची व उत्कर्षाची पराकाष्ठा झाली !

( पडद्यापलीकडून वीरांचा शब्द होतो. )

## आर्या.

हा हयरूप पताका अथवा ही वीर घोषणा त्याची ।
जो एक वीर सप्त ही लोकांत तया दशास्य हंत्याची ॥

लवः--( चित्तास तें भाषण लागून व्यथित झाल्यासारखा होऊन म्ह० ) अहो, हीं अक्षरें हृदयास जाळतात.

मुलें:—अरे लवा, तूं केवळ वेडा आहेस. हें काय बोलतोस ?

लवः—थांबा मुलांनो, तुम्हांला कांहीं समजत नाहीं, अहो अडून गोळ्या मारणारे वीरजनहो, तर काय ही पृथ्वी निःक्षत्रिया झाली ? म्हणून तुम्ही असें उद्धट भाषण करतां ?

( पडद्यापलीकडे शब्द होतो. )

अरे, आमच्या महाराजापुढें क्षत्रिय म्हणजे पदार्थ काय ? आणि तसे क्षत्रिय आहेत कुठें ?

लवः—मूर्ख हो, तुम्हांस धिक्कार असो. क्षत्रिय नाहींत म्हणतां काय ? पण तुम्हांस ठाऊक असूं द्या.

## श्लोक.

जरि आहेत आहेत कां आम्हां भय दावितां ।
बोलून काय तुमची पताका हरितों अतां ॥

( मुलांस म्ह० ) गड्यांनो, पाहतां काय ? ह्या अश्वाला घेरा आणि ढेकळांचा मार देऊन ह्याला तिकडे घेऊन चला. हें भिकार तट्टू ह्याला आश्रमांतील हरणांमध्यें चरूं द्या.

( एक क्रोधाविष्ट पुरुष गर्वानें पुढें येऊन म्हणतो ) अरे, तुझ्या पोरपणास धिक्कार असो. काय हें भलतेंच बोललास. हे शस्त्रधारी वीर सामान्य नव्हत. मोठे कठीण आणि निर्दय आहेत. पोरांचें देखील असलें अमर्याद भाषण ते सोसणार नाहींत. आमचा राजा चंद्रकेतु हातांत धनुष्यबाण घेऊन ऋषींचें रमणीय आश्रमस्थान पहावयास दूर गेला आहे. तो जोंपर्यंत परत आला नाहीं तोंपर्यंत तुम्ही आपला जीव घेऊन झाडींतून लवकर पळून जा. तो आला म्हणजे तुम्हांस फार कठीण जाईल.

मुलें:--कुमारा लवा, चल, आपणाला अश्व कशास पाहिजे. हे वीर शस्त्रें चमकावून तुला दटावतात आणि आश्रम ही दूर राहिला. त्यासाठीं आपण हरणासारख्या उड्या मारीत पळून जाऊं.

पद.

चल जाउं अपुल्या घरां । कुमारा चल जाउं अपुल्या घरां ॥ ध्रु० ॥
कशास आम्हां अश्व पाहिजे । म्हणसी यातें धरा ॥ कु० ॥ १ ॥
दाणापाणी आणि खरारा । कोण करिल तो बरा ॥ कु० ॥ २ ॥
गुरुजी आम्हां रागें भरतील । विचार नाहीं बरा ॥ कु० ॥ ३ ॥
आश्रमपदही दूर राहिलें । अतां करावी त्वरा ॥ कु० ॥ ४ ॥

लव:--काय म्हणतां मुलांनो, ते शस्त्रें चमकावून आम्हांस दटावतात काय ? ( धनुष्य सज्ज करीत ).

श्लोक.

ज्या ही च जिव्हा धनकोटिदाढा ।
टंकार हा घर्घर शब्द गाढा ॥
ग्रासावया उद्यत काळचक्र ।
तसें असो हें मम चापयंत्र ॥
( असें झाल्यावर सर्व निघून जातात. )

उत्तररामचरित्र

( कौसल्याजनकदर्शननामक चवथा अंक ) पृ. १०८-११२

परशुराम तात्या गोडबोले १८५९

---

## २६ छापण्याची कळा.

ठशांनीं अक्षरें छापण्याची युक्ति प्रथमतः युरोपखंडांत प्रकट झाली; पण ही युक्ति काढिली कोणी ह्याचा पक्का निश्चय होत नाहीं. ही कल्पना आमच्या शहरांत उत्पन्न झाली म्हणून ह्या खंडांतल्या पुष्कळ शहरांतल्या लोकांच्या ह्या मानाविषयीं बहुत दिवस वाद चालला आहे; परंतु हल्लीं बहुतांचें मत असें आहे कीं,

हालंद देशांत हार्लेमनामक एक गांव आहे, तेथें ही युक्ति उत्पन्न झाली. असें सांगतात कीं या गांवांत इसवी सन १४४० सांत लारेन्स कोस्तर म्हणून गांवचा एक अधिकारी होता. तो गांवाच्या शेजारीं एक रान होतें त्या रानांत एक दिवस बसला असतां त्यानें बसल्या बसल्या झाडाच्या सालीचीं आपल्या नांवाचीं प्रथमाक्षरें सुरीनें सहज मौजेनें कापिली. नंतर त्यानें ती सालींची अक्षरें कागदावर ठेविली, आणि कांहीं वेळानें पहातों तों त्यांवर दव पडून तीं खालच्या कागदावर उमटलीं, असें त्याच्या दृष्टीस पडलें. हीं सहज घडलेली गोष्ट त्याच्या मनांत ठसून ती पुनः दुसऱ्या रीतीनें आणखी करून पहावी, असें त्यास वाटलें. मग त्यानें लांकडांची कांहीं अक्षरें तयार करून तीं चिकट पाण्यांत बुडवून कागदावर दाबली तों तीं पहिल्यापेक्षां चांगली उमटली, असें त्याच्या दृष्टीस पडलें. पुनः लवकरच त्यानें शिशाचीं व जस्ताचीं अक्षरें करून आपल्या घरांत एक छापण्याचें यंत्र, ज्यास प्रेस म्हणतात, तें तयार केलें. ह्याप्रमाणें त्यानें ह्या उत्तम व परमोपयोगी कलेचा पाया घातला. ती कला काळगतीनें पुढें अधिकाधिक सुधारत जाऊन शेवटीं हल्लीच्या उत्तम दशेस येऊन पोचली. असें सांगतात कीं, त्या कोस्तरापाशीं जान फास्तस् म्हणून एक चाकर होता, त्यानें ही युक्ति चोरून मेन्तज म्हणून जर्मनी देशांत गांव आहे, तेथें नेली; व तेथच्या लोकांस ह्यानेंच ही नवीन कला काढिली असें वाटून त्यास डाक्तर (विद्वान्) व यांत्रिक अशा पदव्या प्राप्त झाल्या. ही कला उत्तरोत्तर सुधारून तिची योजना लोकांत ज्ञानाचा प्रसार करण्याकडे होऊं लागली; तेव्हांपासून मनुष्यांच्या स्थितींत मोठा भेद पडण्यास आरंभ झाला. मनुष्यास थोरपणा येण्यास मुख्य कारण ज्ञान आहे व तें ज्ञान प्राप्त होण्यास पुस्तकें आवश्यक आहेत. पुस्तकें जर नसतील तर तोंडच्या नुसत्या सांगण्यानें ज्ञान कितीसें पसरणार आहे; व आठवण धरून त्याचें काय संरक्षण व्हावयाचें आहे हें थोडासा विचार केला असतां सर्वांचें लक्षांत येईल. लिपीची कल्पना निघाल्यानें पुस्तकें लिहिण्याची रीत उत्पन्न होऊन आठवण धरण्याचे श्रम पुष्कळ कमी झाले. तथापि हातानें लिहून पुस्तकें किती तयार होणार आहेत ? लिहिण्याची मेहनत फार असल्यामुळें, तीं अर्थात महाग होईत व महाग असल्यामुळें मोठें श्रीमंत जे असत त्याजजवळ मात्र पुष्कळशीं पुस्तकें असत. त्या कारणामुळें जुन्या–काळीं पुस्तकें थोडीं असत. व गरीबगुरीबांस पोटाचा धंदा संभाळून विद्या करण्याची अगदींच सोय नसे. युरोपखंडांत आतां

इतकी विद्या पसरली आहे. पण छापण्याची कल्पना निघण्याच्या पूर्वीच्या काळांचा त्या खंडाचा इतिहास पहातां, असें समजतें कीं, त्या खंडांत ग्रीक लोक व रोमन लोक ह्यांची मोठालीं राज्यें होऊन गेलीं, त्या राज्यांत विद्या व कला बऱ्याच वाढल्या होत्या; परंतु जे लोक श्रीमान् असत त्यांस मात्र विद्या प्राप्त होई; गरीब लोक अज्ञानीच असत; व पुढेंहि तशीच स्थिति राहती; पण छापण्याच्या युक्तीनें पुस्तकें स्वस्त होऊन गरीबांस विद्या शिकण्याची सोय झाली. ह्या कल्पनेच्या योगानें पुस्तकें किती स्वस्त झाली, हें सांगितलें असतां ऐकणाऱ्यास मोठा विस्मय झाल्यावांचून राहणार नाहीं, जुन्या लेखांवरून असें समजतें कीं युरोपखंडातून पूर्वी बैबलाच्या हातानें लिहिलेल्या पुस्तकास चार हजारापासून पांच हजार रुपये पडत असत. तें बैबलाचें छापलेलें पुस्तक हल्लीं दोन रुपयांस मिळतें. पुस्तकें अशी जर महाग राहतीं, तर युरोपियन लोकांत हल्लीं कितपत विद्या वाढती, ह्याचा तर्क करितां येईल. आतां आपल्या ह्या देशांत ग्रंथाची किंमत इतकी उतरली नाहीं तरी पुष्कळच उतरली आहे, आणि इकडे खिळ्यांच्या बारीक ठशांनीं जर ग्रंथ छापतील, व पुष्कळ प्रती जर काढतील तर पुस्तकें पराकाष्ठेची स्वस्त होतील ह्यांत संशय नाहीं. तसेंच हातानें पुस्तकें लिहिण्याची चाल होती त्या वेळीं ग्रंथ फार संक्षिप्तपणें लिहीत व ह्यामुळें ते दुर्बोध होऊन त्यापासून विद्याप्रसार व्हावा तितका होत नसे. कोणी मोठाच पंडित असला तर त्याचा मात्र ग्रंथ प्रसिद्धीस येई, ह्याकरितां लहानसहान विद्वानांस एखादी चांगली गोष्ट सुचली तरी ती लिहिली जात नसे. इत्यादि बहुत गोष्टी विद्या-वृद्धीस प्रतिकूल होत्या. छापण्याची युक्ति निघाल्यामुळें युरोपखंडांत विद्या कला-कौशल्य वगैरे वाढलीं आहेत व ही कला मनुष्यांस हरएक प्रकारें उत्तमावस्थेस आणण्यास जितकी उपयोगी पडली आहे, त्याचा शतांशसुद्धां दुसरी कोणती गोष्ट पडली नसेल. छापण्याची युक्ति न निघती, तर वर्तमानपत्रें व नियमित काळीं निघणारी पुस्तकें वगैरे कधीं न होतीं, हें तर स्पष्टच आहे. हल्लीं पृथ्वीवर एका महिन्यांत जितके कागद छापले जातात तितके हातानें लिहावयाचे असते तर कोट्यावधि मनुष्ये लागती, असें म्हणावयास कांहीं चिंता नाहीं. विद्या, स्वातंत्र्य, सौजन्य, संपत्ति, इत्यादि उत्तम गोष्टी उत्तरोत्तर वाढत जाऊन मनुष्यमात्राचें सुख अधिकाधिक व्हावें ह्या उद्देशानें परमेश्वरानें ही अप्रतिम व अत्युत्तम कला ह्या लोकीं पाठविली, असें मानून त्याचे मोठे उपकार

मानिले पाहिजेत; व यदृच्छेनें घडलेल्या व क्षुल्लक दिसणाऱ्या गोष्टीपासून तो केवढाले अद्भूत व अचिंतनीय परिणाम घडून आणितो हें पाहून त्याचें अगाध चातुर्य मनांत आणिलें पाहिजे.

अनेकविद्यामूलतत्व—कृष्णशास्त्री चिपळोणकर इ. स. १८६१
पृ. १९४।१९१

—————

## २७ विराटपर्व.



### अध्याय १९ वा.

द्रौपदी भाषण करित्ये हे भीमा! हें जें मला अत्यंत दुःख जाहलें आहे तें तुला सांगत्यें, तें श्रवण करून माझी असूया करूं नको, परम दुःखित होऊन मीं तुला सांगण्यास प्रवृत्त जाहल्ये आहे. या विषमकाळीं हीन कर्म बल्लवजातीय असें तूं स्वीकृत केलेंस म्हणून तुला बल्लवजातीय असें म्हणतात, हें भाषण ऐकून कोणास शोक होणार नाहीं बरें, तुला अवलोकन करून विराटाचा गृहीं स्वयंपाक करण्यास कोणीएक बल्लव चाकरीस राहिला आहे, असें ज्या काळीं सकल लोक भाषण करितात, त्याकाळीं मला फार दुःख होतें, ज्याकाळीं विराट—राजा स्वयंपाकगृहामध्यें प्राप्त होऊन तुला विचारतो कीं बल्लवा स्वयंपाक झाला किंवा नाहीं, त्याकाळीं माझे मनांत बहूत दुःख होतें, जा काळीं तूं कुंजराशीं उत्तम युद्ध करितोस त्या काळीं विराटराजास बहूत हर्ष होतो, अंतःपुरांतील स्त्रियाही तुझें युद्ध अवलोकन करून हास्यकस्य करीत असतां माझे मनास बहूत दुःख होतें, सुदेष्णेस अवलोकन करण्याकरितां अंतःपुरांमध्यें शार्दूल महीष व सिंह यांचाशीं जा काळीं युद्ध करितोस, त्याकाळीं मला अत्यंत मोह प्राप्त होतो, तुझें युद्ध अवलोकन करून सुदेष्णा तेथून उठली असतां सुदेष्णेचा दासी तिजप्रत भाषण करितात कीं बल्लव युद्ध करीत असतां सैरंध्रीस बहूत दुःख होतें याजवरून बल्लवाचा आणि सैरंध्रीचा अत्यंत स्नेह आहे असें वाटतें. वारंवार त्याचें युद्ध पाहून इला शोक होतो याचें कारण काय? सैरंध्री रुपवान आहे व बल्लवही रुपानें

सुंदर आहे, उभयतांचेंही रूप समान दिसतें, स्त्रियांचें चित्त कसें आहे याचा अंत नाहीं. सैरंध्रीची बहुत गोडी आहे. राजगृहीं बहुतांचाहीं निवास बरोबरच आहे, त्यापेक्षां उभयतांचा स्नेहही असेल असें दासीचें भाषण श्रवण करून सुदेष्णा माझी निंदा करूं लागल्ये, ती श्रवण करून मला बहुत क्रोध येतो. तेणेंकरून तुजविषयीं फारच शंका धारण करितात, हें दासीचें कुश्चित भाषण या प्रसंगीं मला ऐकणें प्राप्त होतें, तेणेंकरून सकळ माझें शरीर दग्ध होऊन गेलें आहे, हे भीमा तूं महाबळी व महापराक्रमी असता ही तुझी अवस्था, युधिष्ठीर राजाकडे पाहावें तर त्याची तशी अवस्था, तेव्हां जिवंत राहावें अशी माझी आतां इच्छा नाहीं, अरे एक रथानें देवमनुष्यांस जिंकणारा युवा असा जो अर्जून तो आज विराटाचा गृहीं कन्यांस नृत्यशिक्षा करितो. जाणें खांडव वनामध्यें अग्नीस तृप्त केलें, तो पार्थ आज कूपामध्यें निमग्न, अग्नीसारिखा अंतःपुरांत राहिला आहे. जा पुरुषश्रेष्ठास शत्रू निरंतर भितात तो धनंजय आज वेषांतर करून राहिला आहे, जाचे बाहु धनुष्याच्या प्रत्यंचेनें कठीण जाहलेले, व परिघासारिख सुशोभित [illegible] शंखवलयांना सुशोभित केले आहेत, जाचा प्रत्यंचेचा ठणत्कार झाला असतां शत्रु कंपित होतात त्या अर्जुनाचें गीत श्रवण करून स्त्रिया याची उपासना करितात, ज्याचा मूर्धा सूर्यासारखा तेजस्वी व देदीप्यमान किरीटानें सुशोभित होता तोच धनंजय आज वेणी धारण करून आपल्या मूर्ध्यास सुशोभित करितो, हे भीमा! गांडीवधन्वा वेणी धारण करून ज्याकाळीं स्त्रीसमुदायामध्यें बसतो त्याकाळीं माझें मन अत्यंत दुःखीत होतें, जो पार्थ सकल अस्त्रांचा वेत्ता, व सर्व विद्यांचा नाशक तो आपल्या कर्णामध्यें कुंडलें धारण करून आहे, जसा महार्णव आपली मर्यादा उल्लंघन करीत नाहीं तसें अर्जुनाचें तेज पाहून युद्धामध्यें सहस्रावधि राजे त्याचें उल्लंघन करण्यास समर्थ होत नाहींत तो अर्जून आपला वेष आच्छादित करून विराटगृहीं कन्यांचा परिचारक होऊन राहिला आहे. या अर्जुनाचा रथघोषेंकरून स्थावरजंगमाशींसहवर्तमान मेदिनी कंपित होत्ये, जा काळीं हा अर्जून उत्पन्न जाहला त्या काळीं यानें कुंतीचा शोक नष्ट केला तो अर्जून मला अत्यंत शोक उत्पन्न करितो, जाचें शरीर नाना प्रकारचा अलंकारांनीं व कुंडलांनीं सुशोभित होतें तो अर्जून आज शंखवलयें धारण करून आपलें शरीर भूषित करितो. तेणेंकरून माझें मन अत्यंत व्यथेंत निमग्न झालें आहे. अरे या पृथ्वीवर जाचेसमान

वीर्यानें दुसरा कोणी नाहीं तो धनंजय कन्यांनीं वेष्टीत होऊन बसला आहे, धर्म, सत्य व शौर्य, हे ज्याचे गूण या जीवलोकीं सर्वांस संपत आहेत त्यानें स्त्रियांचा वेष धारण केला तेणेंकरून माझें मन व्यथेतें पावतें, जसा करेणु समुदायामध्यें मातंग शोभतो तसा हा अर्जून देवरूपी कन्यांनीं परिवृत्त असतां अकस्मात् जा काळीं विराटराजा तेथें प्राप्त होतो त्या काळीं मध्यदीन सूर्यासारखा मी अर्जुनास अवलोकन करून मला दिशाविभ्रम होतो, अशा दुःखकारक अवस्थेंत प्राप्त जाहला जो धनंजय तसाच दुर्द्यूत करणारा युधिष्ठिर हे उभयतां अजातशत्रु असतां ही या उभयतांस कोणी आर्य जाणत नाहींत, हें मोठें आश्चर्य होय, तुझा कनिष्ठ बंधु सहदेव गाईचें रक्षण करणारा गुराख्याचा वेष धारण करून गाईमध्यें जा काळीं प्राप्त होतो त्या काळीं मी पांडुरवर्ण होत्यें, हें भीमसेना सहदेवाचीं चरित्रें वारंवार चिंतन करून मला रात्रंदिवस निद्रा येत नाहीं, मग रती तर कोठून उत्पन्न होईल, हे महाबाहो सहदेवास इतकें दुःख प्राप्त होण्यासारिखें त्याचें दुष्टकर्म कधीं मी अवलोकन केलें नाहीं, सहदेवास पाहून मला वारंवार बहूत दुःख होतें. सहदेव सकल गाईमध्यें प्राप्त होऊन आपल्या वेषाचें आच्छादन करून विराटराजास जा काळीं गोकौशल्यानें हर्षीत करितो त्या काळीं मला ज्वर उत्पन्न होतो, कुंती सहदेवाची वारंवार प्रशंसा करून मजप्रत भाषण करिती जाहाली, कीं हा मोठा उदार व सकलश्रेष्ठ, जनांत पूजित आहे, शील व वृत्त याचें फार उत्तम, ह्रीनिषेवक, वाणी ज्याची मधुर, धार्मीक, व मला अत्यंत प्रीय आहे, हा फार सकुमार आहे यास्तव, यास रात्रौ निद्रेकरितां उत्तम निद्रासामग्री घेत जा, सकल राजांस हा मान्य असून आपले भ्रात्यांचा पूजनकरिता आहे, हे पांचाली यास तूं स्वतः भोजन घालीत जा, असें कुंती भाषण करून जा काळीं सहदेव वनांत जाऊं लागला, त्या काळीं पुत्रलोभास्तव अत्यंत रोदन करूं लागली, तो सहदेव गाईमध्यें वास करीत होत्साता रात्रीं गोचर्मावर निद्रिस्त होतो, त्यातें अवलोकन करून मीं जिवंत राहावें काय ? जो नकूळ रूपें करून अत्यंत सुंदर, अस्त्रविद्येमध्यें मोठा प्रवीण व स्त्रियांनीं संपन्न असणारा, तो आज विराटाचे गृहीं अश्व बंधन करून राहिला आहे, हा काय काळाचा विपर्यास जाहाला आहे, तो अवलोकन कर, जा काळीं नकूळ सकळ अश्वसमुदाय बरोबर घेऊन विराटाचा अग्रभागीं प्राप्त होऊन शिक्षीत केलेले सकळ अश्व विराटास मोठ्या नम्रभावेंकरून दाखवितो त्या काळीं मीं तें पाहात असतां मला सुख कसें

होईल खरें, आणि तूं तर म्हणतोस तूं मोठी सुखी आहेस हें तुला कसें समजत नाहीं, हे भीमा या प्रकारचा दुःखांनीं अत्यंत व्याप्त आहे हीं सकळ दुःखें युधिष्ठिरानिमित्त प्राप्त जाहालीं, यांत संशय नाहीं. मी तुमचा पांचाचा आश्रय केला असतां हीं दुःखें माझें शरीर शोषून टाकितात, या दुःखासारिखें दुसरें दुःख कोणचें असावें. ( द्रौपदीभीमसेनसंवाद अध्याय १९ )

विराटपर्व-मराठी बखर-थत्ते व डोंगरेशास्त्री
पृ. ६१-६६ इ. स. १८६२ ( शके १७८४ )

---

## २८ गोष्ट ६

नाना फडणवीस यांनीं पुणें मुक्कामीं काळेबावरांत लाविलेली बाग अद्यापि आहे. तींत फुलझाडें नाना प्रकारचीं लाविलेलीं होतीं. ती बाग पहाण्याकरितां इंग्रज सरकारचे पलटणीचे दोघे साहेब एक जोन्स, व दुसरा स्मिथ आले होते. त्यांबरोबर घांशीराम चहूंकडे फिरून एका सोनचाफ्याचे झाडापाशीं आला आणि त्या झाडाची तारीफ करून म्हणाला कीं, हें झाड लहानसें दिसतें खरें; परंतु हें मुद्दाम औरंगाबादेहून आणलें आहे. तें आणण्यास व लहानाचें मोठें करण्यास व त्याचे मुळास केशराचें खत घालण्यास आजवर दोन हजार रुपये खर्च होऊन चुकला आहे. त्यावर चैत्रवैशाख मासीं बार येतो व त्यांतील दहापांच मात्र फुलें चांगलीं होतात. परंतु त्यांचा सुगंध इकडून विश्रामबागेपर्यंत जातो आणि हौशी लोक तशा एका फुलास दहा रुपयेपर्यंत देऊन माळ्यापासून नेतात.

अशी तारीफ ऐकून जोन्स यानें कोतवालास खालीं लिहिलेला वृत्तांत सांगितला. तो म्हणाला:--

युरोप खंडांत हॉलंड व फ्रान्स असे देश आहेत. तेथील लोकांस फुलांचें वेड इतकें होतें कीं, एका मनुष्यानें हर्लेम नांवाचें शहरांत एक फुलझाड इसवी सन १६३६ सालांत लाविलें होतें व त्याचें नांव सुखदर्शन ठेविलें होतें. त्याचें एक फूल एका गृहस्थानें १३८०० रुपये व एक नवीन गाडी दोन घोडे सरंजामासुद्धां देऊन विकत घेतलें. दुसरे एका गृहस्थानें तसेंच फूल ३९००० एकुणचाळीस हजार रुपये देऊन घेतलें. दुसरें

एका जातीचें फूल गुललाला म्हणून आहे, तें एका मनुष्यानें पांच एकर समचौरस जमीन देऊन घेतलें. एका गृहस्थाचें सालींना उत्पन्न १८,०,००० रुपयांचें होतें. त्यानें फुलें विकत घेण्याकडे आपली ती सर्व मालमत्ता खर्चून चार महिन्यांत तो भिकेस लागला. हॉलंड देशांत फुलांचें वेड इतकें पिकलें होतें कीं, नुस्ते एका शहरांत एक वर्षांत फुलांच्या उदिमापासून तीन कोटि रुपये उत्पन्न झाले होते.

सदरींची चमत्कारिक गोष्ट ऐकून घाशीरामास मोठें आश्चर्य वाटलें व नानासाहेबांस सागण्याकरितां एका कारकूनाकडून त्यानें तिचें टिपण करविलें. मग त्या दोघां साहेबांस बंगल्यांत आणून कारंज्याजवळ खुर्च्यांवर बसविलें आणि फुलांचे हार गजरे व खाना आणण्यास आज्ञा केली. त्यावरून त्या बागेंतील मुख्य माळी संताजी म्हणून होता, त्याचे एकसारखे स्वरूपाचे दोघे मुलगे फुलांचे तुरे घेऊन खान्याचे मेजावर मांडूं लागले, त्यावरून बोलण्यास आरंभ झाला.

स्मिथः—हे दोघे मुलगे अवळेजावळे आहेत वाटतं ? यांचीं नांवें काय ?

घाशीरामः—होय. ह्यांचे आईस तीन वेळ जुळीं मुलें झालीं व या दोघांचीं नांवें भीम व अर्जुन ठेविलीं आहेत. आपले देशांत जुळीं मुलें होतात ?

स्मिथः—एकासमयीं दोन मुलें अशीं तर बहुत स्त्रियांस होतात; परंतु कधीं कधीं तीन सुद्धां होतात आणि एखादे समयीं चार पांचपर्यंत सुद्धां झाल्याचे लेख आहेत.

घाशीरामः—ज्या स्त्रीस दोहोंपेक्षां अधिक मुलें आपले देशांत होत असत्या स्त्रीस दोनपेक्षां अधिक मुलें पाजण्याचे अवयव असतील नाहीं बरें ?

जोन्सः—तसें नसतें.

घाशीराम—तसें नसतें तर मग दोहोंपेक्षां जास्ती मुलांस एकदांच पाजण्याचें कसें होत असेल ?

जोन्सः—असे प्रसंगीं दुसऱ्या बायका त्या मुलांस पाजण्याकरितां नौकर ठेवितात.

घाशीरामः—हा भीम व अर्जुन जेव्हां एकसारखीं पागोटीं घालतात तेव्हां मला सुद्धां त्यांस ओळखण्याची भ्रांति पडते.

स्मिथः—त्यांत आश्चर्य नाहीं; परंतु भीम अमळसा ठेंगणा आहे व अर्जुन शरीरानें पातळ आहे. अवळेजावळे मुलांत कांहींच भेद नाहीं, अशाही गोष्टी आमचे ग्रंथांत अनेक लिहिलेल्या आहेत. आमच्या देशाची राजधानी लंडन शहर येथें मागें दोन जुळे मुलगे बारा वर्षांचे वयाचे आढळत असत. त्यांचे शरिराचे बांधे, तोंडवळे, नाकें, डोळे वगैरे अगदीं एकसारखीं असत. त्यांचा विद्याभ्यास ही सारखाच झाला होता. फार तर काय ? त्यांची बुद्धि, आचार विचार हीं देखील एकमेकांसारखीं च होतीं. आणखी दुसरे ठिकाणीं दोन जुळे मुलगे निकोलस आणि क्लॉडी या नांवाचे होते. ते लहान असतांना त्यांचा भेद समजण्यासाठीं त्यांचे आईबापांचे सेवकांनीं त्यांचे हातांत निरनिराळे रंगाच्या मनगट्या घातल्या होत्या. ते वयानें जसजसे मोठे होत गेले, तसतशीं त्यांचीं शरिरें मोठीं झालीं तथापि त्याचे बांध्याचा व तोंडवळ्याचा सारखेपणा तसाच राहिला. त्यांची चालण्याची बोलण्याची व उभें राहण्याची ढब एकसारखी होती. त्यांचे स्वभाव व आवाज ही समान होते. त्यामुळें जे समयीं ते सारखे पोषाग करीत, तेव्हां निकोलस कोणता व क्लॉडी कोणता हे त्यांचे आईबापांस सुद्धां ओळखूं येत नव्हतें. ते उभयतां बुद्-बळ खेळण्यास चांगले शिकले होते. त्यांत क्लॉडी हा सर्वोत्कृष्ट खेळणारा होता. कोठे निकोलस तो खेळ खेळण्यास बसला असतां डाव आपल्या आंगावर येतो, असें त्याला वाटलें म्हणजे कांहीं तरी निमित्त करून तो उठून जाई आणि आपला पोषाख भावास देऊन त्याला डाव संपविण्यास पाठवी. तेव्हां तो खेळ त्याचें ठिकाणीं येऊन भावाचा डाव पुढें चालवून जिंकि, तरी हा दुसरा भाऊ आहे, असें तेथें जमलेले मंडळींपैकीं कोणासही समजत नसे. पुढें निकोलस यानें एका श्रीमंताचे कन्येशीं विवाह करण्याचें बोलणें लाविलें.तें तिनें कबूल केलें. नंतर क्लॉडी तिजकडे गेला आणि त्यानें ही तसेंच बोलणें लाविलें. ते समयीं प्रथमचे भेटीचा मजकूर त्याचे बोलण्यांत आला नाहीं. यावरून तिनें त्याचें नांव विचारिलें. आणि त्यानें नांव सांगितल्यावर हा दुसरा भाऊ आहे असें तिला कळलें. मग तुझे वडील भावास मी वचन देऊन चुकलें, असें तिनें उत्तर केलें. तेव्हां मला क्षमा असावी, असें तिशीं बोलून तो निरोप घेऊन परत आला.

इतकें बोलणें झाल्यावर घाशीराम रुप्याची एक डबी काढून तींत लहानशी हरभऱ्याची डाळिंबी होती, ती हातांत घेऊन जोन्स याला दाखवून बोलूं लागला.

घाशीरामः—या डाळिंबीवर काय काम केलें आहे तें पहा. अंबारीसुद्धां हत्ती ही वर काढिला आहे.

जोन्स—हें काम फारच सूक्ष्म आहे. वाहवा ! चांगली कारागिरी केली आहे ! हें चित्र कोणीं काढिलें ?

घाशीरामः—कर्नाटक देशाचा एक चितारी होता. त्यानें हें चित्र काढिलें व त्याबद्दल त्याला श्रीमंतांकडून मोठें बक्षीस मिळालें.

स्मिथः—असे पदार्थ करण्यांत मोठें चातुर्य आहे खरें; परंतु तें तादृश लोकोपयोगीं नाहीं अशा गोष्टींची आमचेही देशांत प्राचीन काळा मोठी प्रशंसा असे, परंतु आतां त्याची तादृश चहा नाहीं.

जोन्सः—इटाली देशातील एका संतानें आमचे धर्मपुस्तकांतील बारा भक्तांच्या धर्ममतांचें सार व त्या बारांपैकीं संतजान म्हणून एक साधू झाला होता, त्याचे सुवार्तेचा सारांश तुमचे शिवराई इतके तुकड्यावर लिहिला होता.

घाशीराम—आमचे धर्मांत भक्त बारांपेक्षां फारच अधिक सांगितले आहेत. त्याविषयीं ग्रंथ आहे त्यास भक्तिविजय म्हणतात.

जोन्सः—आणखी आमचे विलायतेंत इलिझाबेथ महाराणी झाली होती. तिला एका कारागिरानें एक कागदाचा तुकडा अंगठीचे नखाएवढा नजर केला होता. त्याजवर आमचे धर्मांतील दहा आज्ञा व बारा भक्तांच्या धर्ममतांचा सारांश व येशू ख्रिस्ताचं प्रार्थनास्तोत्र व राणीचें नांव व सन अशीं लिहिलीं होतीं.

घाशीरामः—लहान मुलांस पिशाचाची बाधा न व्हावी म्हणून आमचे लोकांत अशी चाल आहे कीं, रामरक्षास्तोत्र एका बारीक तावावर लिहून तो ताव तांब्याचे अथवा रुप्याचे तायतींत घालून ती तायती मुलांचे गळ्यांत बांधितात.

स्मिथः--प्राचीन काळीं ग्रीक लोकांमध्यें होमर या नांवाचा एक मोठा कवि होऊन गेला. त्यानें तुमचे वाल्मीकी रामायणाप्रमाणें ग्रंथ केला आहे त्याच्या अति सूक्ष्म अक्षरानें पातळ कातड्याचे एका तुकड्यावर केलेल्या प्रती पुष्कळ लोकांपाशीं असत. ते कातड्याचे तुकडे इतके लहान असत कीं अक्रोडाचे कवटींत मावत असत.

जोन्सः—एकानें एक गाडी केली होती. तिचा आकार एका गव्हाचे दाण्याएवढा होता. त्यांत एक चालविण्यास गाडीवाला व घोडे व गाडींत एक पुरुष व स्त्री बसलेली याप्रमाण होतें.

स्मिथः—हस्तिदंताचे तुकड्याचा एक रथ केला होता. त्यास चार चाकें व चार घोडे होते. तसेंच एक जहाज डोलकांठी वगैरेसुद्धां केलें होतें. तो रथ व तें जहाज हीं इतकीं लहान होतीं का, त्यांवर माशी बसली तर तिचे पंखानें तो रथ व जहाज झांकलीं जात असत.

घाशीरामः—नाशिकांत एका तांबटानें सुईच्या नाकांतून पार जाईल इतकी लहान गणपतीची मूर्ति करून मानाजी शिंदे यांजकडे आणिली होती त्यांनीं पाहून त्या कारागिरास पांच हजार रुपये इनाम देऊन ती मूर्ति घेतली.

जोन्सः—लंडन शहरांत एका लोहारानें लोखंड, पोलाद व पितळ यांचे अकरा तुकड्यांचें एक कुलूप व किल्ली अशीं केलीं होतीं कीं, त्या दोहींचें वजन अर्ध गुंज होतें. तसें च एका सोनारानें सोन्याची सांखळी ४३ कड्यांची केली होती, तींत तें कुलूप व किल्ली गुंतवून ती सांखळी एका जिवंत पिसूचे गळ्यांत अडकावींत व ती पिसू त्या ओझ्यास घेऊन चाले. तें कुलूप, किल्ली, सांखळी व पिसू सर्व मिळून पाऊण गुंज असे.

२ चेरी म्हणून बोराएवढें फळ असतें. त्यांतील बीची एकानें टोपली केली होती. तींत चौदा जोड फाशांचे केले होते. त्या फाशांवरील टिंबें व अंक दिसत असत.

३ रोम शहरांत एकानें कातीव जिनसा दाखविण्यास आणिल्या होत्या, त्यांत सोळाशें तबकड्या होत्या. त्यांपैकीं प्रत्येकीची आकृति संपूर्ण होती. परंतु त्या तबकड्या इतक्या लहान होत्या कीं, मिऱ्याचा एक दाणा पोखरून त्याची डबी केलेली होती तींत त्या सोळाशें ही तबकड्या मात असत.

४ एकानें लोखंडीं जातीं केलीं होतीं. तीं आपल्याआप फिरत. तीं इतकीं लहान होतीं कीं, त्यांपैकीं आंगरख्याचे अस्तनींत घालून सहज नेतां येत व त्या जात्यांनीं आठ मनुष्यांस पुरे इतकें धान्य एका दिवसांत दळलें जाई.

५ साडेतीन तसू औरस चौरस कागदाचे तुकड्यावर एकानें ९३४८० अक्षरें लिहिलीं.

घाशीरामः--एका साळ्यानें अडीच मासे रेशमाची इतकी बारीक तार काढली होती कीं, ती दीड कोस लांब गेली; तशीच दुसरे एका साळ्यानें एक साडी तयार केली होती ती एका तायतींत मात असे.

जोन्सः—एक यंत्र असें केलेलें आहे कीं, त्यानें लोंकर इतकी बारीक कातली जाते कीं, अर्धशेर लोंकर १०५ रुपयांचा माल होतो आणि तिचे धागे ९५ होतात व त्यांतील एकक धागा ११२० हात लांब असतो. यावरून सर्व धाग्यांची एकंदर लांबी १५ कोस व ८०० हात होते.

२ सन १६१९ सालीं जेफरी हड्सन या नांवाचा एक मनुष्य इंग्लंड देशांत जन्मला होता. तो आठ नऊ वर्षांचे उमरेचा असतांना दीड फूट उंच होता. तो वीस वर्षांचा होईपर्यंत तितकाच उंच राहिला. नंतर वाढूं लागला तो तीन फूट उंच होऊन राहिला. तो ६३ वर्षांचा होऊन मरण पावला.

आतां आमचा खाना झाला. थोडका चहा आणावा म्हणजे पुरे.

घाशीरामः—इतक्यात जेवण झालें काय? अद्यापि पक्वान्नें यावयाचीं आहेत. आमचे शहरांतील एक तैलंग ब्राह्मण आला, तर मेजावरील सर्व पदार्थ नाहींसे करून आणखी सुद्धां मागितल्यावांचून राहणार नाहीं.

स्मिथः—एक तैलंगी ब्राह्मण एका बैठकीस किती लाडू खाईल?

घाशीरामः—एका बैठकीस सव्वाशें लाडू खाणारे आहेत.

जोन्सः—सिरीया देशांत एक बाई होती. ती एक दिवसात तीस कोंबडीं खाई, तरी तिचें समाधान होत नसे.

आरीलियन या नांवाचा पादशाह होता. त्याचें रूबरू फागन या नांवाच्या एका मनुष्यानें एक सगळा रानडुक्कर, एक मेंढा, एक गांवठी डुकराचें पोर आणि शंभर रोडगे इतकें खाल्लें आणि तितक्यावर मद्यही तो बरें च पुष्कळ प्याला.

क्लॉडियस् आल्बिनस् या नांवाचा पादशाह होता. त्यानें एकवेळ प्रातःकाळीं न्याहारीस पांचशें अजीर, शंभर जांब, दहा खरबुजें व टोपलीभर द्राक्षें खाल्लीं.

स्मिथः—मॅक्सिमियान या नांवाचा पादशाह होता तो खाऊन खाऊन इतका पुष्ट झाला होता कीं, त्याचे बायकोचे हातांतील गोठ त्याचे बोटास मुद्यांप्रमाणें होत असत.

घाशीरामः—आमचे सासरे मोठे पुष्ट आहेत. परंतु त्यांचीं बोटें इतकीं जाड झालीं नाहींत. भीमसेनाप्रमाणें माक्सिमियान असेल असें वाटतें.

जोन्सः—वैटेलियस या नांवाचा पातशाह होता. तो एके दिवशीं आपले भावाचे घरीं मेजवानीस गेला होता. तेथें त्यानें दोन हजार मासे व सात हजार पक्षी भक्षिले.

घाशीरामः—आमचे भारतांत दुर्वास ऋषि यांस साठ खंडी अन्न भोजनास लागत असे असें लिहिलें आहे. तेव्हां त्याप्रमाणें तर तुमचे पातशाह नसतील?

ह्याप्रमाणें बोलणें ऐकून जोन्स व स्मिथ हे हंसून अन्योक्तीनें बोलले कीं, कोतवालसाहेबांनीं आम्हांस कुंठित करून हरविलें. आतां निरोप द्यावा असें बोलून ते आपापले स्थळीं गेले.

घाशीराम कोतवाल--मोरोबा कान्होबा इ. स. १८६१
गोष्ट ६ वी. पृ. २२–३१

---

## २९ सदाशिवपुरींतील वाडा.

### राजा, प्रधान व रक्षक.

राजा--प्रधानजी, आतां काय उपाय करावा तें बोला. हा काय ईश्वरी क्षोभ समजावा कीं काय?

प्रधानजी—भगवंताच्या कृपेंकरून अशीं दुश्चिन्हें आजपर्यंत आमच्या राज्यांत ठाऊक नव्हतीं.

राजा—याचा कांहीं तरी निर्णय झाला पाहिजे.

प्रधानजी —काय विनंति करूं महाराज! माझीहि अक्कल गुंग झाली आहे.

रक्षक—महाराज, या गोष्टीचा विचार कसेंहि करून झालाच पाहिजे. आज सात रात्रीं जो चमत्कार आम्हीं पाहतों तो अद्यूनपर्यंत पायांजवळ वर्णन केला नाहीं, आज्ञा असल्यास निवेदन करितों.

राजा—रक्षक, जो कांहीं चमत्कार तुमच्या दृष्टीस पडला असेल तो लवकरच समजूं द्या.

रक्षक—आज्ञा; कृष्णपक्षाच्या नवमीपासून काल अमावास्येपर्यंत आम्हीं पाहात होतों. रात्रीं जेव्हां माणसांची चाहूलसुद्धां बंद होते, शहराचे रस्ते निर्जन अरण्यापेक्षांही उजाड दिसतात, पशु रवत सोडून बसल्या ठिकाणींच पेंगा घेतात, पक्षी चारा सोडून झाडांच्या डाहळ्यांतून हेलकावत असतात, सर्व वृक्षसमुदाय यत्किंचितही डुलत नसतो, सारांश, सर्व विश्व विश्रांतिसुखानुभव घेत आहे असें दिसतें; खालीं वर, बाजूस जिकडे तिकडे अंधःकार भरलेला असतो आणि रात्रीच्या किर्र शब्दाखेरीज दुसरा ध्वनि ऐकूं येत नसतो- तेव्हां अशा मध्यरात्रींच्या भरांत, नदीतीरीं, स्मशानभूमींत, कालेश्वराच्या देवालयांत कोणी स्त्री प्रथम सातदां मृदुहास्य करून नंतर एकाएकीं तितक्याच वेळां भयंकर रोदन करित्ये

राजा—असा प्रकार आज सात दिवस तुमच्या दृष्टीस पडत असतां ती बाई कोण, येते कोठुन, हसत्ये कां, व रडत्ये कां, याचा शोध तुम्ही कसा लावला नाहीं ?

रक्षक--महाराजांनीं विनंति ऐकावी. हा प्रकार दुसरेच दिवशीं मीं प्रधान· जींच्या कानांवर घातला, त्यावरून ते सर्व मंत्री मंडळी बरोबर घेऊन मजसुद्धां त्या स्मशानभूमीकडे जाऊं लागले, याचें कसें काय फळ प्राप्त झालें तें प्रधान-जीच चरणांस विदित करतील.

प्रधानजी -- महाराज, ह्याचाच ठावठिकाण लावण्याकरितां आम्हीं निघालों. नदी गांठली. स्मशान गांठलें; देऊळ गाठलें; येथपर्यंत त्या बाईचें रुदन ऐकूं येत होतें; आणि सभामंडपांत पाऊल मात्र टाकिलें तों ती स्त्री एकदम गुप्त झाली. याप्रमाणें आम्ही रोज तिच्या शोधार्थ जातों, व त्याप्रमाणें ती रोज गुप्त होत्ये.

राजा—जें ऐकावें तें विशेष.—या गोष्टीचा आणि माझ्या स्वप्नांचा कांहीं तरी निःसंशय संबंध आहे.

प्रधानजी—महाराज, या सर्व गोष्टींचा उलगडा होण्यास मला एक मार्ग दिसतो. विनंति करण्यास आज्ञा असावी.

राजा--बोला.

प्रधानजी—जी आज्ञा; या शहरांतील शास्त्री, पंडित, वैदिक, मंत्री, ज्योतिषी यांना बोलावून आणून सभा करावी आणि या गोष्टीचा अर्थ त्यांस

पुसावा; म्हणजे कोणीना कोणी आपल्या विद्यासामर्थ्येंकरून त्याचें स्पष्टीकरण करितील.

रक्षक—महाराज, प्रधानजी यथार्थ बोलतात.

राजा—ठीक आहे तर. आज्ञापत्रें लिहून सर्व जाणते जाणते बोलावून आणा. या गोष्टीस विलंब कामाचा नाहीं.

प्रधानजी—जी आज्ञा; उठा तर रक्षक.

रक्षक—जी; आज्ञा घेतों महाराज.

राजा—बरें आहे.

( प्रधान व रक्षक निघून जातात. )

कीर्तने-जयपाळ-अर्क १ प्र. १ पृ. ३५।३७इ. स. १८६५

---

स्थळः—कैलास शिवगृहांतर.

## प्रवेश ८

## १० पार्वती आणि तिची सखी.

(इतक्यांत थोडका वेळ सखी तिला भेटण्यास येते.)

सखी—आर्ये कुशल आहेस कीं ? आज रिकामिशी बसली आहेस ! काम झालें वाटतें ?

पार्वती—काम तरी आहे कशाचें ? कर्मत नाहीं, म्हणून येथें तेथें बसून दिवस घालवावा झालें.

सखी—असें काय म्हणतेस ? बायकांच्या जातीला रिकामपणा कोठुनचा-गृहकृत्याखालीं दिवस पुरत नाहीं; तशांत वेळांत वेळ करावा आणि स्वामीची सेवा करून क्रीडासुख भोगावें; झालें, दिवस सरला.

पार्वती—तूं बाई दैवाची. तुला संसारांत भांडेंकुंडें, वस्त्रप्रावर्ण, दागदागिना सर्व अनुकूल; आणि तुझा पति रंजकभोगी, म्हणून बाई, तुझें कोडकौतूक संसारांत पुरतें. एथें कांहीं तसें आहे ?

सखी—पार्वती तुझें लग्न झाल्यापासून तुझी माझी निवांत गांठच पडली नाहीं. मला कांहीं खबर नाहीं. तुझें आहे तरी कसें काय ?

पार्वती—बाई, काय विचारत्येस? ओंठाबाहेर गेले, म्हणजे कोटाबाहेर जातें. गृहच्छिद्र तर बोलूं नये, असें शास्त्र आहे. प्रमाण श्लोक " आयुर्वित्तं गृहच्छिद्रं मंत्रमैथुनभेषजं ' मानदानापमानंचेच नव गौप्यानि कारयेत्." हें वचन ऐकिलेंस कीं ?

सखी—ऐकिलें. तें बाई खरें; पण जिवलग गडिणीपाशीं सांगावें. तें बाहेर निघायाचें नाहीं. शेर अन्न पोटांत राहतें; मग गोष्ट राहणार नाहीं काय ?

पार्वती—सांगूं तरी काय ? सगळा आनंदच आहे. घरांत दारिद्र्य अठरा विश्वें हें तर बाहेर उघडेंच दिसतें. हातांत खडकपात्रें, कानांत ताडपत्रें.

सखी—असें कां बाइ ? तुझा नवरा धंदा रोजगार करीत नाहीं काय ?

पार्वती—एथें धंदा रोजगार कशाला होतो. धंदा करण्याचा छंद असता तर अशी अवस्था कां होती ? घरांत त्रैलोक्याचा अधिकार असून तें सर्व घालवून आपण रिकामेंच.

सखी—तुझ्या पतीस कोणी फसवलें होय ? असा ठक कोण भेटला ?

पार्वती—दुसऱ्यावर काय दोष आहे आपण हुशार रीतीनें वागलों, तर दुसरा काय करील ? एथें वस्त्राची देखील शुद्धि नाहीं. लोक दिगंबर म्हणतात; त्याची तरी शंका आहे ? शांभवीची सोबत. सारा दिवसरात्र डोळे लावून एकासनावर बसायाचें.

सखी—शांभवी ती काय आहे गे ?

पार्वती—मला तरी काय ठाऊक ? नारळा एवढा हिरवा गार गोळा जोगडे आणतात. त्याचें पाणी करून घेतात तिला शांभवी म्हणतात, असें ऐकत्यें. धूर तर चालू आहेच.

सखी—बाई तो नाद कठीण आमच्या घरीं अशीच सोबत लागली होती; पण मी बोलून बोलून शुद्धीवर आणलें. तूं कांहींच बोलत नाहींस वाटतें ?

पार्वती—इकडे तर बोलण्याची सोई नाहीं. अती तामसी प्रकृति; निमित्त ठेवून डोक्यांत राख घालून जाण्यास उशीर नाहीं. मी समोर बोलतच नाहीं,

भिऊन भिऊन वागत्ये, म्हणूनच निभावणी झाली आहे. मी त्या विष्णूवर प्रीति ठेवूं नका, म्हणून मर्जी पाहून सांगत गेल्ये. पण त्यांनीं कोठें ऐकिलें? ते आपणास विष्णुवल्लभ असें म्हणवतात.

सखी—विष्णूनेंच ठकविलें होय? तो तर कपटीनायक आहे, कसें काय झालें सांग बरें?

पार्वती—यांची प्रकृति भोळी. तो मोठा कारस्थानी. यांस घुलावून घुलावून आमचें सर्व ऐश्वर्य त्यानें घरयांत उतरलें. आमच्या घरच्याची कोणी थोडीशी स्तुति केली म्हणजे पुरे; मग देण्याचा कांहीं सोईसुमार तरी. त्या विष्णूला त्रैलोक्याचा अधिकार देऊन सुदर्शन तें पण दिलें.

सखी—असो. लेणेंलुगडें हें दैवाधीन आहे. परंतु स्वामींची मात्र प्रीति असावी, म्हणजे स्त्रियांच्या जातीला सर्व सौख्य. तेवढें नाहीं तर सर्व असून काय करायाचें?

पार्वती—बाई तें मात्र सुख खरें. माझ्या प्रीतीचें जघन्य (लौकिक) करून अर्धनारीनटेश्वर नांव पावले; म्हणून माहेरीं कधीं जाणेंच नाहीं. त्या प्रीतीमुळें संसारांत दंग आहे. तुझी भेट फार दिवसांनीं झाली; आतां जात्येस तर? पुनः लौकर भेट बरें.

( सखीचा व पार्वतीचा सुखसंवाद झाल्यावर सखी निजगृहीं गेली. नंतर पार्वती शंकराच्या सन्निध जाती झाली. ) पृ. १५।१८

**विनायकशास्त्री नातू** इ. स. १८६५ ( महाराष्ट्र काव्यप्रसारणेच्छु मंडळी )-**श्री भिल्लिणी.**

---

## ३१ [ पंतांची देवाशीं सलगी. ]

आम्ही तुझा विश्रांतीचा घरकुंडा सोडतांच हे आमचे अद्वैतज्ञानाचे पांख आम्हांस तोलत नाहींसे होऊन आम्ही खालीं पडों लागलों. कित्येक जे गर्वानें कांहींसे वर उडाले, त्यांस अधिक धक्का बसून त्यांचा चुराडा झाला. आतां अनुभवास पक्कें आलें कीं तुझ्या मुखांतल्या वाऱ्याच्या सेवनावांचून इतके मोठे पांख झेपण्याचें सामर्थ्य आम्हांस कदापि येणार नाहीं; आणि जरी त्या वाऱ्यानें तसें

सामर्थ्य आलें, तथापि तुझें कोंठ न सोडितां तूं जेथें आम्हांस नेशील तेथें उडून तूं दाखवशील तोच चारा आम्हीं भक्षण करूं, यांतच आमचें सर्व कल्याण आहे; असें म्हणून अद्वैतवादी भक्तिमातेस शरण गेले. परंतु जरीं शरण गेले, तरीं उनाड मुलें जशीं इकडे तिकडे यथेच्छ उड्या मारून भूक लागली म्हणजे आपल्या आई-जवळ खाऊ मागावयास जातात, तसे शरण गेले. अपराधी लोक न्यायाधीशापुढें उभे राहून केवळ सभयतेनें आपला अपराध अंगीकृत करून, त्या कृत अपराधा-विषयीं आपला पश्चात्ताप प्रकट करून मोठ्या विनयतेनें आणि दीनवाणी तोंडानें क्षमा मागावयास जातात तसे गेले नाहींत. मुलें जशीं आपल्या आईबापापाशीं कांहीं वस्तु मागतांना आपला लडिवाळपणा, सलगी, रोष, इत्यादि भाव दाखवितात, तसे या देशांत भक्तजन आपल्या इष्टदेवतेपुढें यथारुचि अनर्गल वाक्पाटवानें अनेक भाव दाखवून वर मागतात. त्यांमध्यें विनयभाव नसतो असें माझें म्हणणें अगदीं नाहीं; हें तर माझ्या वरील लेखावरून वाचकांच्या लक्षांत पुर्तेपणीं आलेंच असेल; परंतु त्या भावाच्या विरजणांत भावांतरांचें पुष्कळ मिश्रण असल्यानें त्या भावास बलहीनत्व येऊन प्रार्थनीय परमेश्वराचें महत्व आणि गौरव यास फार गौणत्व आल्यासारिखें दिसतें असें मला खचित वाटतें. × × ×

आणि या मतदृष्टीनें पाहिलें असतां हें पुढलें आमच्या कवीचें काव्य दोषा-रोपणास पात्र होण्यास योग्य आहे खरें, परंतु ज्या लोकांमध्यें लडिवाळपणानें आणि सलगीनें ईश्वराची प्रार्थना आणि स्तुति करण्याचा सांप्रदाय व्यासाच्या वेळे-पासून पडला आहे, त्यांमध्यें आपल्या कवीसच निवडून काढून या दोषांचा भार त्यांच्या मस्तकावर ठेवण्यास त्यांस पुढें करणें मला योग्य दिसत नाहीं. सर्वांच्या पंक्तींत यथायोग्य त्या भाराचे विभाग करून यांच्या वांटणीस जो यःकश्चित् विभाग येईल तो निराळा काढून ठेवण्याचें जर कोणाच्या मनांत येईल तर भलें येऊं.

× × ×

ज्या देशांत व ज्या लोकांत रसभरित म्हणून प्रसिद्ध काव्यें असतात, त्यांच्या गुणांचें यथायोग्य परीक्षण करण्यास, आणि त्यांची रुचि घेण्यास, त्याच देशाचे डोळे आणि जीभ असली पाहिजे. इतर लोकांच्यानीं तसें यथान्याय परी-क्षण होणें केवळ अशक्य असें माझें म्हणणें नाहीं; कदाचित् ते विशाळ बुद्धीचे

परीक्षक असल्यास योग्य परीक्षा करूं शकतील; परंतु त्यांच्य. रुचीनें जो तद्देशीय सुज्ञांस आनंद होईल, याच मानाचा आनंद अन्यदेशीय विद्वानांस होणार नाहीं, याचीं कारणें बहुत आणि सूक्ष्म आहेत. ज्या लोकांत वंशपरंपरेनें ज्यांचा सहवास असतो, त्यांचा पूर्वापार व्यवहार, रीतीभाती, विद्या, ज्ञान, आचार या सर्व गोष्टींच्या संघट्टनानें त्यांचीं मनें तशीच रंगलेलीं असतात; म्हणून त्यांच्या काव्यानें जे हर्षशोकादि विकार त्यांच्या मनांवर होतील, तसे विकार अशा संघट्टनाच्या अभावामुळें, ज्यांचीं मनें तशीं रंगलीं नसतात त्यांजवर होणार नाहींत. अशा विचारानें पाहिलें असतां हें पुढील स्तोत्र प्रौढ आणि रसिक काव्यांत गणिलें पाहिजे.

× × ×

दादोबा—यशोदापांडुरंगी—इ. स. १८६५

## ३२ [ मुक्तामाला. ]

॥ श्लोक ॥

केले खलांवर बहु उपकार व्हाया ।
संतुष्ट, जाति परि ते समुळीं हि वांया ॥
त्यांचे मनीं वसत नाहिं दया कधीं ही ।
आप्तास ही छळुनि पाडिति दुःखडोहीं ॥ १ ॥

इरावती नगरीचे ठायीं सुप्रभातीं सूर्योदय झाला असतां मोठा चमत्कारिक समारंभ चालला आहे. त्या दिवशीं वटसावित्री होती, म्हणून नगरांतील कितिएक स्त्रिया पूजासामग्री व वायनें घेऊन व उत्तम वस्त्रालंकार लेवून नदीचे तीरीं जात आहेत. कितिएक घांटावरील वडाचे पारावर बसून पूजा करीत आहेत. कितीएक स्नान करिताहेत. कितिएक एकमेकींस हळदकुंकू देत आहेत. ब्राह्मणाची ही पूजा सांगण्याची वगैरे एकच लगबग होऊन गेली आहे. कितिएक ब्राह्मण स्नानें करिताहेत. कितिएक संध्याजपादि करण्यास आसनें घालून बसले आहेत. कितीएक देवपूजा करीत आहेत. अशाप्रकारें एकच गर्दी होऊन थाट बनून राहिला आहे. इतक्यांत दहा पांच चाकर बरोबर असून मुक्तामाला आ-

पत्न्या समवयस्क, कांहीं सख्यांसह वर्तमान तेथें आली. जसा नक्षत्रांत चंद्रमा अशा प्रकारची ती त्या स्त्रीसमाजांत येतांच शोभा दिसूं लागली, तिनें त्या दिवशीं सर्व जडावाचे दागिने घातले होते, तेणेंकरून व कांहीं महिने ही गेल्या-मुळें तिचे शरीराची कांति फारच तेजस्वी दिसूं लागली. त्या कारणामुळें ती त्या दिवशीं जितकी रमणीय दिसली तितकी, पूर्वी कधींच दिसली नव्हती. पुरुष काय, परंतु सर्व स्त्रिया देखील तिच्याकडे पहात च स्तब्ध राहिल्या. असो, तिनें पूजा करून सौभाग्यवायनें दिलीं. मग देवदर्शन करून वाड्यांत जाऊन पोचली. ही जों आंत जाते तों मागाहून एक घोडेस्वार आंत शिरला. त्यास चाकर लोकांनीं कोठून आलास असें विचारतांच मी जयपुराहून आलों असें त्यानें सांगितलें. तें मधुर नांव ऐकतांच मुक्तामालेस मोठा आनंद झाला. मग किंचित् हास्यवदन करून ती आंतील चौकांत गेली. तों तिचा वृद्ध पिता पूजा वगैरे आटोपून नुकताच बाहेर आला होता. त्यास ही आपली कन्या फारच रमणीय दिसते असें वाटून अतिशय आनंद झाला. मग हंसत हंसत कां पूजाबिजा आटपली काय ? असें त्यानें तिला विचारिलें. नंतर तिनें हास्यवदन करून झाली म्हणून सांगितलें, आणि जयपुराहून स्वार आला आहे असें सांगत आहे तों तो ही आंत आला, आणि शातवर्मा ह्यास सलाम करून त्यानें कागद पुढें टाकिला. मग आपली कन्या कागदांतील मजकूर ऐकण्याकरितां उभी राहिली आहे असें समजून त्यानें मोठ्यानें वाचण्यास आरंभ केला.

ल. मो. हळबे–मुक्तामाला. भाग ४ पृ. ४५।४६ दु. आवृत्ति १८७०

---

## २२ [ मंजुघोषेंतल्या इरावतीचा पूल व घाट. ]

तेथें नैष्ठिक विप्रसमुदाय कार्तिकस्नानविधि आटोपून कोणी अघमर्षण करीत, कोणी गोमुखींत हात घालून जपास ध्यानस्थ बसले आहेत. कित्येक शीत-निवारणार्थ शालजोड्या, बनातीच्या टोप्या, घाबळ्या, अंगावर सांवरीत आहेत. गोसाव्याच्या झुंडी डोक्यांवरील जटांचे मुगट बांधून सर्वांगास राख लावून सभोंवतीं ओऱ्यांतून धुन्या लावून बसले आहेत. ब्राह्मणांची संकल्प सांगण्याची गडबड चालू आहे. वरील रमणीय शिवालयाचे आंतील गाभाऱ्यांतून स्त्री-

पुरुषांची एकच गर्दी होऊन कित्येक विप्र त्या हरिहरेश्वरास रुद्रावर्तनें करीत बसले आहेत. सौभाग्यवती स्त्रिया लगबगीनें आपापल्या संकल्पानुरूप कोणी तांदुळाची कोणी तिळांची कोणी सुवासिक पुष्पाची व बेलांची इत्यादि लाखोल्या वहात आहेत. कोणी सौभाग्यवायनें देऊन त्रिपुरवाती व कापूर लावीत आहेत. तेणें करून प्रज्वलित तेज फांकून गेलें आहे व तिकडे जिकडे 'शंभो हर हर' शब्दांचा व दक्षप्रजापतीचे गालवाद्यांचा घोष होत आहे. हांतांत चंबु, काखेंत गवाळी, संबळ्या असून खुडखुडत कित्येकांचा नगरांत प्रवेश होत आहे. शहरांतून शेतकरी लोक खांद्यावर विखणें असूड टाकून नांगरांस बैल जुंपून न्याहारीच्या भाकरीसहवर्तमान कृषिकर्मास जात आहेत. पांथस्थ लोक कोणी गाड्याघोड्यावरून कोणी पादचारी आपापले हेतुस्थलांचा मार्ग क्रमण्यास निघाले आहेत. गौळी लोक दह्यादुधांच्या कावडी खांद्यांवर घेऊन मोठ्या झोंकानें, फुलारी गंधिक पुष्पें व तुळशीबिल्व यांनीं युक्त अशा वेताच्या करंड्या हातांत घेऊन डौलानें; आणि कित्येक स्त्रिया व पुरुष शाखभाज्या, जांभ, द्राक्षें, केळीं, डाळिंबें, निंबें, नारिंगें, चकोत्रे व अंजीर इत्यादि फळफळावळींचे हारे डोकीवर घेऊन गाण्याच्या गजरांत मोठ्या झपाट्यानें शहरांतील मांडवीत नेत आहेत. ( मूळ १८६७ )

**ना. स. रिसबूड**-मंजुघोषा—आवृत्ति १० वी. पृ. ४।५

---

## ३४ मराठी शाळेंतील विद्याभ्यास-प्राकृत धर्मग्रंथाचा अभ्यास.

माझा मराठी अभ्यास बेळगांवांतील सरकारी मराठी शाळेंत झाला. ही शाळा सन १८३० सांत स्थापिली होती. शाळेची जागा गांवातील आदितवार पेठेंत होती तींत खोल्या नव्हत्या केवळ लांबचे लांब घोडसाळ किंवा उतारशाळेप्रमाणें ती होती. तिला एकच दरवाजा असून पायऱ्या मात्र पुष्कळ व उंच होत्या. शाळेंत घड्याळ नव्हतें, सावलीच्या खुणांवरून सुट्टी देत असत. मुलांकरितां सरकारी पाट्या होत्या, कोणी मुलें आपल्या घरच्या पाटया आणून तेथेंच ठेवीत. स्लेटीच्याऐवजीं बहुतेक मुलें टिनाचें तगट वापरीत, त्यावर शाईनें

सरकारी मराठी शाळा

हिशेब मांडीत व ते ओल्या फडक्याच्या बोळानें पुसून टाकीत. स्लेटपेन्सलीच्या ऐवजीं 'बळ्ळू' (कानडी) नावाच्या मातीच्या तुकड्यानें लिहीत. सणांच्या सुट्या फार असत. गावांत रात्रीं कीर्तन किंवा नाटक झालें असतां जर मुलें दुसरे दिवशीं जागरणामुळें शाळेंत आलीं नाहींत, तर त्यांस शिक्षा होत नसे. शिक्षेचे प्रकार जुन्या गांवठी शाळेप्रमाणें होते, म्हणजे घोडीवर चढविणें, पाठीवर पाट्या ठेवणें, कान धरून उठाबशी करायास लावणें, जमिनीवर हाताचें एक बोट टेंकायास व एक पाय मागें उचलावयास लावून ओणवें करणें इत्यादि. वेतानेंहि मुलास खुब बडवीत. अभ्यास म्हटला तर साधारणच, म्हणजे धूळाक्षर, कित्ते वळविणें, खरडे लिहिणें, मोडी कागद वाचणें असा होता. संध्याकाळीं मुलें परवाचा म्हणत. वरच्या वर्गांत कांहीं भूगोल, व्याकरण, गणित शिकवीत. वाचनाकरितां बालगोष्टी, मनोबोध कथा, इसापनीति, लघुहितोपदेश, सिंहासनबत्तिशी, वेताळपंचविशी, पंचोपाख्यान, मराठ्यांची बखर, इंग्लंदचा इतिहास, बाळमित्र, बैठकचावडी, जागतीजोत इत्यादिक पुस्तकें होतीं. व्याकरण शिकविण्यासाठीं बालव्याकरण (बाळगंगाधर शा. जांभेकर यांचें) व दादोबाचें व्याकरण (१ ली आवृत्ति) हीं होतीं. आमच्या अखवानजीला (पंतोजीला) व्याकरण किंवा गणित फार चांगलें येत होतें असें नाहीं, तसेंच त्यांचें मोडी अक्षरही चांगलें नव्हतें, ते ब्राह्मण जातीचे असून त्यास सही करण्यापुरतें इंग्रजी येत होतें. ते फार लालची होते. मुलांस शाळेंत घालतांना सरस्वतीपूजनाच्यानिमित्तानें त्यांस शक्तीप्रमाणें पागोटें वगैरे देण्याची तेव्हां चाल होती; निदान कांहीं दक्षिणा तरी द्यावी लागत असे; शिवाय शाळेंतील मुलांस मिठाई वगैरे वाटीत. आमच्या गुरुपत्नीनें कधींमधीं सधन आईबापांच्या मुलांस घरीं जेवायास बोलवावें. अब्राह्मण मुलांस दूर ओट्यावर बसावें लागत असे, इतकें च नाहीं तर त्यांस त्यांच्या उष्ट्या पत्रावळी बाहेर उचलून टाकून जेवणाची जागा शेणानें सारवून काढावी लागत असे. माझ्या वांटचें हें काम आमच्या घरच्या गड्यानें करावें. ही जेवणावळ स्वार्थाची असे. मुलांस आमच्या गुरुपत्नीस भोजनाच्या दामदुप्पट दक्षिणा चोळखण वगैरे द्यावें लागत असे. आमच्या गुरुजीस बुदबुळें खेळण्याचा फार नाद होता. ते कधीं कधीं मुलांकडें शाळा सोंपून जवळच्या दुकानांत पुष्कळ तास तो खेळ खेळत बसत. एकदां तेथील कलेक्टरसाहेब शाळा पाहण्यास आले असतां हे शाळेंत हजर नसून अशा खेळांत गुंतले होते; त्यावरून त्यांस दंड झाला त्यांस जुगाराचें व गांजा ओढण्याचें व्यसन लागलें होतें, परंतु एका ब्राह्मण सावकारानें

त्यांजपासून गीतेवर शपथ घेववून तें सोडविलें. तरी ते तंबाखू ओढीत. थंडी-वाऱ्याच्या निमित्तानें आमच्या घरीं चहा घेत.

शाळेचे सुप्रिंटेंडंट छत्रे व जांभेकर.

मी शाळेंत असतांना एकदां रा. रा. सदाशिव काशिनाथ छत्रे ( बालमित्राचे भाषांतरकर्ते ) हे मराठी शाळांची देखरेख करायास मुंबईहून आल्याचें मला आठवतें. परंतु त्या वेळीं मी फार लहान होतों. त्यांच्या मागून प्रोफेसर बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर हे मा शाळेंत असतांना दोनदां देखरेखीस आले. त्यांचा लोकांनीं बहुमान केला. त्यांच्या सुधारलेल्या मतांवरून त्यांचा कल ख्रिस्ती धर्माकडे आहे, व ते पावबिस्कुटें खातात, व ग्लासानें पाणी पितात अशी लोकांत कंडी उठली होती. त्यांच्याशीं वाद करायास कित्येक वैष्णवांच्या आचार्यांनीं कंबरा बांधल्या होत्या, परंतु त्यांनीं तो प्रसंग टाळला. हे शास्त्रीबावा तेथील मिशनरींच्या भेटीस वारंवार जाऊन फार वेळ त्यांच्याशीं संभाषण करीत बसत; तसेंच मार्गांतून पालखींत बसून जातांना साहेब लोकांप्रमाणें बुक वाचीत; त्यावरून ते बबल वाचतात असा लोकांनीं तर्क केला होता.

**बाबा पदमनजी**—अरुणोदय—पृ. १०।११ दु. आ. १९०८

---

## ३५ पुण्यांत लायब्ररीची स्थापना.

नंबर ३

प्रभाकर, ता. २६ मार्च १८४८

पुणें येथील पुस्तकगृहाविषयीं वर्तमान आपल्यास लिहितों. पुण्यासारखे शहरांत विद्याशाळा वगैरे बऱ्याच आहेत. परंतु ग्रंथ वाचण्याची जागा अद्याप लोकांस माहीत नव्हती व तिचा उपयोग कोणा नेटिव्ह लोकांस माहीत नव्हता; परंतु सांप्रतचे गवरनरसाहेब सर जार्ज क्लार्क यांणीं लोकांचे सुधारणेकडे लक्ष देऊन जज्जसाहेब हेनरी ब्रौन यास सुचविलें कीं, पुण्यांत लायब्ररी स्थापण्याचा बेत करावा त्याजवरून त्यांनीं तारीख २८ जानेवारी सालमजकुरीं सर्व लोकांची सभा जमवून त्यांस हा मजकूर निवेदन केला. तेव्हां बुधवारचे वाड्यांतील इंग्रजी शाळेंतील अभ्यासी लोकही पुष्कळ हजीर होते. त्या सर्वांनीं अनुमोदन दिलें व अदा-

लतीफडील चाकरमंडळी व सरदार लोक यांणीं हि बरें आहे असें म्हटलें. पुण्यांतील कितीएक आळशी लोकांस लायब्ररी काय हें माहीत नाहीं. याच कारणामुळें सरदार लोकांनीं व कामदार लोकांनीं उदारपणानें पैसा दिला नाहीं. तथापि अजमासें दीड हजार रुपये जमले आहेत...... ४ फेब्रुवारीस दुसरी सभा भरली. त्या वेळेस ... एके गृहस्थानें विद्येचे उपयोगाविषयीं महाराष्ट्र भाषेंत एक निबंध केला होता, तो वाचून दाखविला. पुण्यांतील बहुत गृहस्थांस सांप्रतकाळीं विद्या आणि ज्ञान काय आहे, याविषयीं समजून नाहीं व ते बहुत वर्षे स्वस्थ घरीं बसून इंग्रज सरकारची देणगी खात आहेत. याजमुळें अशा कामांत ते झटून पडत नाहींत व त्यांस किती हि समजून सांगितलें तरी त्यांच्या जा जुन्या व पोकळ समजुती आहेत त्याच ते खऱ्या धरतात व त्या बदलण्यास बहुत दिवस पाहिजेत ...... ७ फेब्रुवारीला लायब्ररी सुरू झाली. अद्याप गृहस्थांपैकीं कोणी ग्रंथ वाचावयास व ज्ञान संपादन करावयास येत नाहींत. शाळेंतील विद्वान् मंडळी, ज्ञानेच्छु व विद्याभ्यासी मात्र येतात. सरदार लोक येत नाहींत. त्याविषयीं मला असें वाटत कीं, आम्ही थोर, चार शिपाई घोडे, अबदागीर बरोबर घेतल्याशिवाय बाहेर कधीं पडत नाहीं तेव्हां लायब्ररींत मुलासारखें शिकण्यास जावयाची त्यांस लज्जा वाटत असेल, परंतु अज्ञानामुळें व अनश्रुतपणामुळें त्याची अशी अवस्था जाहली. तथापि तिच्या परिहारोपाय ते ग्रहण करीत नाहींत, हें आश्चर्य आहे. जांस अन्नवस्त्र मिळतें ते म्हणतात कीं, आम्हांस विद्येची काय गरज आहे व जांस मिळत नाहीं तें पोटापाठीमागें लागतात. तात्पर्य अक्कल वाढविण्याचें काम कोणाच्यानें होत नाहीं ...... सांप्रत काळीं तर आपले शास्त्रांत व देशांत काय आहे व इंग्रज लोक हे कोठून येऊन राज्य करितात व यांची व्यवस्था काय आहे हें कोणास माहीत आहे कां म्हणून विचारिलें तर नाहीं म्हणून बहुतेक शपथ करितील. तेव्हां ... हें ... अज्ञान काय वर्णावें ? विद्येचें सार जें द्रव्य तें आम्हांजवळ आहे... (असें ज्यास) वाटतें ... ते आपल्यास सूर्यचंद्राइतकें उंच समजतात. ही खोडी नेटिव लोक लवकर टाकतील तर बरें...... पुण्यांत पेशव्यांचें राज्य होतें...म्हणून ... त्यांचें ज्ञान व अज्ञान आजपर्यंत दिसलें नाहीं. परंतु आतां तो समय नाहीं ... आपली नीट अवस्था कशान होईल, हें पहाण्याची वेळ आहे ... ... ...

**लोकहितवादी**. प्रभाकर १८४८

*हा उतारा १८४८ तला आहे. मागाहून जोडला; तरी योग्य स्थळीं वाचावा.

## ३६ [ साध्वी रमाबाईचें सहगमन. ]

( टीपः—हा हि उतारा मागाहून जोडला. योग्य स्थळीं वाचावा. )

रमाबाई:—आई, आतां मी येथें राहात नाहीं. माझ्या शिवाय घटकाभर करमत नव्हतें. मलाही करमत नव्हतें. यासाठीं मी जात्यें, मी बरोबर जात्यें मी, सहगमन करत्यें. माझे अवयव मात्र येथें आहेत. जीव सगळा त्या शरीरांत घुटमळला आहे. झाला हाव माझा निश्चय. मी बरोबर जाणार. करा माझी तयारी करा.

इतर बाधा:—बाईसाहेब असें करूं नका. दैवानें व्हावयाचें तें झालें. आम्हांस धनी नाहींसे झाले; आणि आमची धनीणही कां नाहींशी करितां ?

आई: —नको, नको, मग माझा प्राण कसा राहील. घरधनी गेले तेव्हां तुम्हीं दाधे होतां. आतां त्यांनींहि सोडिले माझे आई तूं तरी सोडूं नको. तूं तरी राहा. तुमच्या सर्वांच्या दुःखाचा भार मी कसा वाहूं ऐक ऐक. पुरं. नको हट्ट करूं.

रमाबाई:—आई असें भलतेंच सांगूं नकोस. तुझें म्हातारपण झालें आहे. संसारांतील दुःखांतून तूं लवकरच मुक्त होशील. परंतु माझें आतांसें तारुण्य मी जर आतां तुजकरितां राहिल्ये तर मग एक दोन वर्षांनंतर तूं गेलीस म्हणजे मग हे पाय अंतरलच पण तूंही अंतरशील. मग निराधारी, निराश्रित, हें काळें तोंड घेऊन, वैधव्य पदरीं बांधून लपण्यास देखील जागा उरणार नाहीं. आतां गेल्यें तर लोकांत कीर्ति करून जाइन. मग गेलें तर मजकरितां कुत्रा देखील रडणार नाहीं. आई या मायापाशांत तूं पडूं नको; करा माझी तयारी करा. आणा गे माझें पांढरें पातळ, आणून मला नेसवा. माझी दागिन्याची पेटी आणून सर्व अलंकार मजवर घाला. माझा कुंकवाचा डबा आणून मला मळवट भरा. ओंटीचें तबक आणून माझी ओटी भरा. मला जाऊन लवकर भेटूं द्या. जलदी करा. माझी वाट पहाणें होत आहे. अंबाबाईनें विमान पाठविलें आहे. ( तिला विमान दिसूं लागतें. ) बरोबर गंधर्व आहेत. विमान माझीच वाट पहात आहे आटपा मी निघाल्यें.

( सर्व तयारी झाल्यानंतर स्वाऱ्या निघतात. )

कीर्तने—थो. माधवराव; प्रवेश ७; १८६१

———